मुंबई इलाखा, मध्यप्रांत व वऱ्हाड यांतील शाळांत चालविण्यास
मंजूर झालेली

# वाचनपाठमाला.

## भाग १ ला.

[ इंग्रजी इयत्ता सहा व सात यांकरितां.]

संपादक व प्रकाशक

**कृष्णाजी गोविंद किनरे,**

**मराठी भाषेचे शिक्षक, न्यू इंग्लिश स्कूल, पुणें.**

आवृत्ति सातवी.–प्रती २०००.

जुलै १९२६.

**किंमत १। रुपया.**

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

असा एक सामान्य नियम आहे कीं, जें जें अव्यक्त स्थितींत असतें, तें तें अनुकूल परिस्थिति प्राप्त झाली असतां व्यक्तावस्थेंत येतेंच. ह्याच नियमानुसार प्रस्तुत माला आज जगाच्या निदर्शनास येत आहे. इंग्रजी पहिल्या तीन इयत्तांना मराठी वाचनपुस्तक नेमतांना दरवर्षीं शाळांच्या चालकांना मोठा विचार पडतो, ही गोष्ट बरेच वर्षांपूर्वीं माझ्या लक्षांत आली; व कसलेल्या लेखकांचे ग्रंथांतून विविध विषयांचें ज्ञान देऊन विद्यार्थ्यांना वाचनाची गोडी लावणारे, त्यांच्या ठिकाणीं विद्येची लालसा उत्पन्न करणारे, व त्यांच्या मनांचा सर्व बाजूंनीं विकास करून त्यांला प्रागल्भ्य आणणारे निवडक वेचे काढून, ते तीन इयत्तांकरितां तीन निरनिराळ्या पुस्तकांच्या रूपानें प्रसिद्ध करावे, असा मनाचा तेव्हांच संकल्प झाला. पण अनेक अकल्पित कारणें मध्यें येऊन तो संकल्प इतकीं वर्षें कल्पनासृष्टींत राहिला.

विद्वच्छिरोमणि कै० म. गो. रानड्यांसारख्यांच्या अनेक वर्षांच्या अभिनंदनीय प्रयत्नांनीं विश्वविद्यालयांत महाराष्ट्रभाषावधूचा कांहीं वर्षांपूर्वीं प्रवेश झाला; व गेल्या वर्षीं तिने त्या मंदिरांत आणखी एक पाऊल पुढें टाकून, जणूं काय, आपल्याला एकंदर केवढा प्रदेश व्यापावयाचा आहे, याचा एकदां अजमास पाहून ठेवून मग हळुहळू यथावकाश त्याचें आक्रमण करावे, अशा बेतानें आद्यंतींच्या दोन मर्यादा आपल्याशा करून टाकल्या. आतां मधील प्रदेशावर ती आपली छाप लवकरच बसवील, अशी उमेद बाळगण्यास पुष्कळ जागा आहे. असो. १९०७ सालच्या प्रवेशपरीक्षेस “ स्वभाषा ” हा विषय आवश्यक झाल्याची कर्णमधुर वार्ता कानीं येतांच महाराष्ट्रभाषाभिमान्यांस फार आनंद झाला, हें सांगावयास नकोच. आनंदाचा प्रथमावेग थोडा कमी झाल्याबरोबर शाळांच्या चालकांच्या मनांपुढें एक प्रश्न दत्त म्हणून उभा राहिला. तो हा:—“ वरच्या इयत्तांना मराठी वाचनपुस्तक काय नेमावें ? ” व “ काय करावें ! वाचनपुस्तक नाहीं.” या त्रयोदशाक्षरी मंत्राचा घोष जिकडून तिकडून कानांवर येऊं लागला. तेव्हां माझा उपरि-निर्दिष्ट संकल्प स्फुरण पावून कांहीं वेळानें चांगलाच जागृत झाला. सर्वांची काळजी दूर करण्याचा यथाशक्ति

प्रयत्न करावा, असें मनानें ठरवून मी घाईघाईनें त्या उद्योगाला लागलों व दोनतीन महिन्यांच्या श्रमांचें फळ आज मी विद्यार्थिवाचकांच्या हातांत देत आहें. त्याचा परिपाक कसा काय उतरलेला आहे, हें पाहण्याचें काम विद्वानांचें आहे. मीं यथामति काम करून तें पुढें मांडिलें आहे.

मराठीमध्ये जे नांवाजलेले ग्रंथकार आहेत, त्यांच्या भाषेचे नमुने ह्या पुस्तकांत स्थळानुसार आणण्याचा मीं प्रयत्न केला आहे; तरी "बहुरत्नं वाङ्मयम्." सर्व वाङ्मयाचें मंथन इतक्या अल्पावकाशांत व त्यांतले त्यांत माझ्या अल्प सामर्थ्यानें होणें दुस्तर आहे; आणि यदाकदाचित् मीं तें केलें, तरी त्यांतून निघालेल्या सर्व रत्नांचा संग्रह ह्या चिमुकल्या पुस्तक-मंजुषेंत होणें कठिण. तेव्हां ज्यांच्या पुस्तकांतून मला उतारे घेतां आले नाहींत, त्या लेखकांना मी कमी प्रतीचे लेखतों, असा कोणाचा ग्रह होणार नाहीं, इतकीच मी आशा बाळगतों. ही माला आणखी गुंफण्याची माझी खटपट चालू आहे, तेव्हां त्यांच्या अमोल साह्याचा मी त्या वेळीं आदर करीन, इतकें आश्वासन देण्यापलीकडे मी तूर्त कांहीं करण्यास समर्थ नाहीं, याबद्दल फार दिलगिरी वाटते.

'भिन्नरुचिर्हि लोकः' या न्यायानें पुढील उताऱ्यांसंबधाने मतभेद होणें साहजिक आहे. प्रौढपणीं अंगावर येऊन पडणाऱ्या अनेक जबाबदाऱ्या पार पाडण्याइतकी विद्यार्थिदशेंत बालमनांची तयारी व्हावयाची असते. मनोभूमिका शुद्ध होऊन तिची उत्तम मशागत झाली, तिच्यावर सत्संस्कार झाले, म्हणजे विद्यार्थिपणचें कार्य आटपलें. कोमल बुद्धीची पूर्ण वाढ होण्याला अवकाश मिळाला म्हणजे पुरे आहे, असें माझ्या अल्प समजुतीला वाटते पुढील उतारे ह्या गोष्टी करण्यास साह्यभूत होतील, असा मला बराच भरंवसा आहे. उताऱ्यांसंबंधानें सकृद्दर्शनीं येणारा दोष म्हटला, म्हणजे कांहीं पाठ बरेच मोठे झाले, हा होय. पण वरील इयत्तांतील मुलें प्रौढ असतात; तेव्हां विषयविवेचन जरा विस्तृत व सांगोपांग होणेंच इष्ट आहे. ही गोष्ट मनांत आणिली, म्हणजे तो आक्षेप उडून जाईल, अशी माझी दृढ खात्री आहे.

हा मालेचा पहिला भाग इंग्रजी ६ व ७ इयत्तांकरितां तयार केला आहे. त्याचे सहावे इयत्तेकरितां एक व सातवे इयत्तेकरितां एक, असे दोन विभाग

# अनुक्रमणिका.

## पुस्तक पहिलें.

## पुस्तक दुसरें.

पाडावे, असें एकदां मनांत आलें होतें; परंतु तसे पोटभाग आपण न पाडतां शिक्षकांच्या पसंतीवर तें ठेवावें, हें जास्त इष्ट वाटल्यावरून तशी कांहीं व्यवस्था मुद्दाम केली नाहीं. अशानें शिक्षकांना आपल्या रुचीप्रमाणें पाठांची निवड करण्यास सवड होणार आहे. ही व्यवस्था गैरसोईची होते, असें शिक्षकांनीं कळविण्याची कृपा केल्यास व दुसऱ्या आवृत्तीचा सुयोग आल्यास तसें वर्गीकरण मी मोठ्या आनंदानें करीन.

आतां ही लांबलेली प्रस्तावना पुरी करण्यापूर्वीं एक गोड काम करावयाचें आहे. ते आभारप्रदर्शनाचें होय, ही गोष्ट चतुर वाचकांच्या लक्षांत आलीच असेल. ज्यांच्या ज्यांच्या ग्रथांतून पुढील उतारे घेतले आहेत, त्या त्या ग्रथकारांचा मी फार ऋणी आहे, उतारे घेण्याबद्दल बऱ्याच ग्रंथकारांची मीं परवानगी घेतली आहे, परंतु कांहीं अंशीं घाई झाल्यामुळें व कांहीं अंशीं पत्ते न मिळाल्यामुळें कांहींची परवानगी घेण्याची राहिली, याबद्दल ते माझ्यावर रोष न करितां तरुण पिढीच्या शिक्षणासारख्या पवित्र कार्याकडे लक्ष देऊन उदार मनानें मला क्षमाच करतील, अशी खात्री बाळगून त्यांच्या ग्रंथांचा उपयोग करण्याचें मीं धाष्टर्य केलें आहे.

आमच्या शाळेंतील अनुभविक व वयोज्ञानवृद्ध मराठी भाषेचे शिक्षक व मराठींतील मार्मिक व नांवाजलेले लेखक रा० रा० **रामचंद्र भिकाजी जोशी** यांनीं मला वेळोवेळीं जो पोक्त सल्ला दिला, हे पुस्तक तयार करण्याचे कामीं जे प्रोत्साहन दिले, त्याजबद्दल त्यांचा उतराई होणे फार कठिण आहे.

त्याचप्रमाणे आमच्याच शाळेला जोडून असलेल्या नवीन मराठी शाळेतील शिक्षक रा० रा० **भिकाजी विठ्ठल महाजन** यांनी, हे पुस्तक तयार करण्याचे कामीं इतकी मदत झाली आहे कीं, ती मिळाली नसती, तर मला हातीं धरलेला उद्योग सोडूनच द्यावा लागला असता. तेव्हां त्यांचे आभार कोणत्या शब्दांनीं मानावे, हेंच मला सुचत नाहीं.

पुस्तककार व प्रकाशक हे अन्योन्याश्रयी होत. परस्परांचे साहाय्या-वांचून दोघांचेंही अस्तित्व फारसें शक्य नसतें. आपल्या देशाला तर ही गोष्ट फार लागू आहे. आजकाल जे देश सुधारलेले म्हणून गाजत आहेत,

त्यांत ग्रंथकारांना ग्रंथ लिहिण्यापलीकडे फारसे आयास करावे लागत नाहींत. उलट प्रकाशकच ग्रथकारांच्या कच्छपीं लागतात. आमची स्थिति उलट आहे. प्रकाशकाच्या किंवा पैशाच्या अभावामुळें पुष्कळ विद्वानांचे ग्रंथ घरच्या घरीं अज्ञातवासाचें दुःख भोगीत आहेत, किंवा होतकरू लेखकांना आपली ग्रंथ लिहिण्याची मनीषा मुळांतच दाबून टाकावी लागत आहे. चांगल्या प्रकाशक मंडळ्या स्थापन होऊन काम करूं लागल्याशिवाय मराठी भाषेचें ग्रंथभांडार झपाट्यानें वाढेल, असे माझी मनोदेवता मला सांगत नाहीं. अशा प्रतिकूल स्थितींत **चित्रशाळेच्या धोरणी** व **दक्ष मॅनेजरांनीं** ही माला प्रसिद्ध करण्याचे अंगावर घेतले, याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत

याशिवाय अनेक व्यवसायबंधूंनीं व मित्रांनीं वेळोवेळीं यथासामर्थ्य मला मनापासून साह्य केलें आहे; त्यांचा नामनिर्देश कोठवर करावा ! त्यांनीं माझ्या डोक्यावर हे एक जबरदस्त ऋणच करून ठेविलें आहे.

पुणें, ता. १५।४।१९०७. संपादक.

---

## सातव्या आवृत्तीची प्रस्तावना.



मागील आवृत्तीचे हे केवळ पुनर्मुद्रण आहे. या आवृत्तींत कांहीं कमी जास्त केलेलें नाहीं. ज्या शाळाधिकाऱ्यांनीं आपल्या शाळेत हें पुस्तक सुरू केलें आहे, त्यांचा मी फार आभारी आहें. असाच आश्रय ते चालू ठेवतील, अशी आशा आहे.

पुणें,<br>१० जुलै १९२६. संपादक.

# वाचनपाठमाला.

## भाग १ ला.

## पुस्तक १ लें.

## पाठ १ ला.



### ईश्वराची लीला अगाध आहे !

आपण सर्वांनीं आपलें जें कर्तव्यकर्म आहे, तें सदोदित करीत रहावें; म्हणजे आपली इच्छा परमेश्वर शेवटाला नेल्यावांचून कधींही राहणार नाहीं. आपली आशा परिपूर्ण होण्याचीं मानवी डोळ्यांला कांहीं चिन्हें दिसत नाहींत, म्हणून ईश्वराला तो आपला इच्छित हेतु सफल करतां यावयाचा नाहीं, असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. मनुष्याच्या तर्काची मर्यादा फार आकुंचित आहे, परंतु ईश्वराची कर्तृत्व-शक्ति अनंत आहे. मनुष्याचा तर्क आंधळा आहे. त्याला फारच थोडें दिसतें; आणि यदाकदाचित् कांहीं दिसलें, तरी जें अगदीं थोड्या अंतरावर असेल, तेवढेंमात्र दिसतें. परंतु ईश्वराचें सामर्थ्य अपार आहे, मनुष्याच्या कल्पनेला त्याचें पूर्णत्वानें अवगाहन कधींही करतां येत नाहीं. हिरण्यकशिपु आपल्या मुलाला साधुसंतांचा आणि वैष्णव-भक्तांचा उच्छेद करण्यास सांगत होता, आणि तें त्यानें ऐकलें नाहीं, तेव्हां पर्वताच्या कड्यावरून तो दैत्य आपल्या मुलाला ढकलून देत होता, समुद्रांत बुडवीत होता, हत्तीच्या पायांखालीं चिरडवीत होता, त्याच्या आईकडून त्याला विष पाजवून मृत्यूच्या घरीं

पाठवीत होता. त्या वेळीं हिरण्यकशिपूचा नाश करण्यासाठीं परमेश्वर नारसिंहाचें स्वरूप धारण करण्याची तयारी करण्यांत गुंतला होता, हें मानवी तर्काला कोठें दिसलें होतें? "तुझा देव कोठें आहे तो दाखीव; नाहीं तर या क्षणीं मी तुझा वध करतों," असें हिरण्यकशिपूनें प्रल्हादाला म्हटलें; त्या वेळी प्रल्हाद आपल्या बापाच्या क्रोधाला बळी पडणार, असेंच सर्वांना वाटलें होतें. आपल्या भक्ताचें संरक्षण करण्यासाठीं परमेश्वर खांबामध्यें येऊन बसलेला असेल, असें त्या वेळीं कोणाला तरी वाटलें असेल काय? खांबांतून नारसिंहाची मूर्ति निघेल, ही गोष्ट कोणाला तरी त्याच्यापूर्वीं शक्य वाटली असेल काय? परंतु ती गोष्ट माणसांना शक्य वाटली असो किंवा नसो, परमेश्वरानें ती गोष्ट शक्य करून दाखविली. त्याचप्रमाणें द्यूतानें द्रौपदी ही कौरवांची दासी म्हणून ठरली. तेव्हां तिला सभेमध्यें आणून तिच्या अंगावरील वस्त्राचें हरण करण्याविषयीं दुर्योधनानें दु:शासनाला आज्ञा केली. त्या वेळीं आतां द्रौपदी भरसभेमध्यें विवस्त्र केली जाणार, असेंच सर्वांना वाटत होतें. मानवी तर्काची धाव याच्यापलीकडे गेली नाहीं. एका वस्त्राच्या आंत दुसरें वस्त्र, अशा रीतीनें सहस्त्रावधि वस्त्रांचा पुरवठा भगवान् श्रीकृष्ण आपल्या बहिणीसाठीं करील, असें—ही गोष्ट घडून येण्यापूर्वीं—कोणाच्या स्वप्नांत तरी आलें होतें काय? परमेश्वर अशा रीतीनें द्रौपदीची लाज राखील आणि तिला शत्रूपुढें उघडी पडूं देणार नाहीं, ही गोष्ट मनुष्याच्या तर्काला अगम्य होती; परंतु परमेश्वरानें ती प्रत्यक्ष करून दाखविली. रावण इतका प्रबल झाला होता कीं, प्रत्यक्ष सूर्य आणि चंद्र हे त्याच्या घरीं मशालजींचें काम करीत होते, आणि वायु हातांत केरसुणी घेऊन त्याच्या घरांतील केर काढीत होता. अशा रीतीनें ज्यानें आपला अंमल बसविला होता, त्याचें तें ज़ुलमाचें राज्य लयाला जाईल, असें कोणाला

तरी वाटलें होतें काय ? जो रावण सर्व देवांनाही अजिंक्य झाला होता, त्याला रानांतील माकडें आणि यःकश्चित् माणसें जिंकतील, असें कोणाला तरी वाटलें होतें काय ? मनुष्याच्या अंधुक दृष्टीच्या तर्काला असेंच वाटत होतें कीं, रावणाचा हा देवादिकांवरील जुलूम जगाच्या शेवटापर्यंत असाच चालणार, व सर्व पृथ्वी त्याच्या त्रासानें गाईसारखी दीन होऊन जगाच्या शेवटापर्यंत तशाच दीन स्थितींत राहणार. पण परमेश्वराची इच्छा तशी नव्हती. मनुष्यांना ज्या गोष्टी असंभवनीय वाटत होत्या, त्या परमेश्वरानें आपल्या अलौकिक लीलेनें सिद्ध करून दाखविल्या. त्यानें रामाकडून रावणाला मारविलें आणि सर्व पृथ्वीचा भार हरण केला. ईश्वर हा चमत्काररत्नांचा समुद्र आहे ! परमेश्वराला काय अशक्य आहे ? हिंदुस्थानांत १२०० वर्षांपूर्वीं कुमारिल भट्ट आदिकरून मोठमोठ्या पंडितांनीं कर्ममार्गाचें इतकें स्तोम माजविलें होतें, आणि शाक्यमुनीच्या अनुयायांनीं बौद्ध धर्माचा प्रसार सर्व हिंदुस्थानभर इतक्या झपाट्यानें चालविला होता कीं, ज्ञानमार्ग आणि वैदिक धर्म यांचें आर्यभूमीवर आतां नांवही उरत नाहीं, अशी त्या वेळीं स्थिति येऊन पोंचली होती. जो उठला तो वैदिक धर्माचा तिरस्कार करून गौतमबुद्धाच्या धर्माचा अंगीकार करीत होता. अशा वेळीं ही धर्मांतराची प्रचंड लाट फोडून, तिचे बारीक कण करून ते चारी दिशांना फेंकून देणारा एखाद्या पर्वतासारखा कोणी महात्मा उत्पन्न होईल, असें त्या वेळच्या निराश झालेल्या वैदिक धर्माभिमान्यांना वाटलें होतें काय ? श्रीमच्छंकराचार्य, त्यांचें अलौकिक बुद्धिसामर्थ्य, त्यांची वादिमतखंडनाची हातोटी, त्यांनीं केलेलें धर्मसंस्थापन, त्यांनीं संपादिलेला दिग्विजय, त्यांनीं नाचविलेला विजयध्वज आणि गाजविलेले कीर्तिडिंडिम, ह्यांची त्यांच्या आधींच्या लोकांना

काय कल्पना होती ? भविष्यत्काळाचा पोटांत असलेल्या ह्या असंख्य गोष्टी त्या वेळच्या लोकांना कोठें दिसत होत्या ? पण त्यांना त्या दिसत नव्हत्या, म्हणून त्या घडून आल्या नाहींत, असें नाहीं. परमेश्वरानें—ज्याला सर्वांच्या योगक्षेमाची काळजी वहावयाची असते, त्या परमेश्वरानें—त्या सर्व गोष्टी घडवून आणिल्या.

हें सर्व जर आपण पाहतों, तर मग आपल्यालाच निराश होण्याचें काय बरें कारण आहे ? ज्यानें प्रल्हादाला संकटांतून वांचविलें, ज्यानें द्रौपदीची लज्जा रक्षण केली, ज्यानें गाईप्रमाणें दीन झालेल्या पृथ्वीला रावणाच्या जुलुमांतून मुक्त केलें, आणि ज्यानें शंकराचार्यांच्या मिषानें आर्यधर्माचें आर्यभूमंडळामध्यें फिरून संस्थापन केलें, तो परमेश्वर आपल्यालाही आपल्या अवनतावस्थेमधून बाहेर काढणार नाहीं काय ? एखादा राजा चांगला असतो, त्याच्या वेळीं चांगलीं कृत्यें होतात; परंतु त्याच्यामागून दुसरा वाईट राजा आला असतां, पूर्वींच्यासारखीं सत्कृत्यें त्याच्या वेळीं होत नाहींत. अशासारखी देवाची गोष्ट नाहीं. प्रल्हादाच्या, द्रौपदीच्या, रावणाच्या किंवा शंकराचार्यांच्या वेळीं, जो दीनाचा कनवाळू परमेश्वर होता, तोच हल्लींही स्वर्गांतील सिंहासनावर विराजमान आहे. इतकेंच नव्हे, तर याच्यापुढेंही जे जे कोणी अवनतीला जाऊन संकटांत पडतील, त्यांना त्यांना त्यांतून वर [illegible] तो परमेश्वर अनंत काळपर्यंत तेथें बसलेला असेल. तर मग आपल्याला निराश होण्याचें कारण काय आहे ?

आपण उन्नतावस्थेला येणार हें खास. आपण हिंदुस्थानांतील लोक मोठे होणार, याबद्दल संशयच नाहीं. वाट चालत असतां आपला एखादा सोबती पुढें जाऊन बसतो आणि आपली वाट पहात असतो, त्याप्रमाणें आपला अभ्युदय हा आपल्या प्रगतीच्या मार्गांत आपली वाट पहात बसलेला आहे. तेव्हां ही वाट चालतां चालतां तो आप-

त्याला केव्हां तरी भेटणार, हें खास. सौख्य, संपत्ति, उत्कर्ष, विद्या, शौर्य, धैर्य, साहस, सत्यप्रियता, दीर्घायुष्य, आरोग्य, अप्रतिहत तेजस्विता इत्यादि इहलोकच्या असंख्य संस्पृहणीय वस्तु आपल्यासमोर अंतरिक्षामध्यें अदृश्य रीतीनें आपल्यासाठीं परिणत होऊन बसल्या आहेत. जे आपण ह्या आर्यभूमीच्या उदरांत जन्माला आलों आहों, त्या आपल्याला खात्रीनें पुढें सुख आहे. भविष्यत् काळ हा आपला आहे; त्यांत आपण जसे सत्य धर्मानें वागूं, त्याप्रमाणें सुख तेथें लिहून ठेवलेलें आहे. आपण जर गुडघ्यांत मान घालून निराशेचे सुस्कारे टाकीत बसलों, तर त्यापासून आपण आपलें काय हित साधून घेणार आहों ? निराशा म्हणजे दुर्बळत्व होय. प्रत्येक सुस्काऱ्याबरोबर आपण आपली कर्तृत्वशक्ति आपल्या शरिरांतून बाहेर घालवीत असतों. निराशा ही मनुष्याचे असलेले हातपाय मोडते; परंतु आशा ही परमानंद माधवाच्या कृपेप्रमाणें लंगड्या माणसालाही गिरीचें उल्लंघन करण्याला प्रवृत्त करते. आशा हीच मनुष्याची शक्ति आहे, आणि आशा हाच मनुष्याचा जोर आहे. ज्याच्या मनाला आशा नाहीं, त्याला भविष्यकाळ असून नसून सारखा. यासाठीं आपण आशा धरली पाहिजे व आपलें जें कर्तव्यकर्म आहे, तें आपण सतत करीत राहिलें पाहिजे. म्हणजे आपला उत्कर्ष आपल्यापासून फारसा लांब आहे असें नाहीं. अशक्यतेच्या कल्पनेनें आपलें मन निराशेच्या स्वाधीन होऊं न देतां भावी उत्कर्षाच्या आशांनीं आणि महत्त्वाकांक्षांनीं आपलें मन पूर्णपणें भरून ठेवून ईश्वराला अनन्यभावें शरण गेलें पाहिजे; म्हणजे तो सर्व कांहीं गोष्टी —मग त्या आपल्याला कितीही अशक्य वाटत असोत—घडवून आणील, यांत शंका नाहीं. ईश्वराची लीला अगाध आहे !

शि. म. परांजपे. —— का० नि० निबंध.

## पाठ २ रा.



### उद्योग.

सध्यां ज्या लोकांचा अंमल आपणांवर आहे, त्यांची स्थिति आपल्या स्थितीहून किती भिन्न आहे? विलायतेंत व युरोपांतील इतर देशांत जी इतकी सुधारणा झाली आहे, तिचें कारण इतकेंच कीं, तेथील प्रत्येक मनुष्यास स्वतंत्रतेची स्पृहा आहे, व तीकरितां तो उद्योग करितो. हे दोन गुण इंग्लिश लोकांमध्यें विशेषेंकरून आढळतात. मोठ्या घराण्यांतीलही जो कोणी उद्योग करीत नाहीं, त्याची लोक निर्भर्त्सना करितात. सरदारांचे मुलगेसुद्धां उद्योग करितात. फार काय, राजपुत्रसुद्धां स्वस्थ बसत नाहींत. आपली महाराणी व्हिक्टोरिया इच्या पुत्रांपैकीं एक सेनेमध्यें व एक आरमारामध्यें आहे! आपल्या राजेरजवाड्यांस किंवा सरदारांस जर हें सांगितलें, तर त्यांस मोठा चमत्कार वाटतो. ते म्हणतात, "काय त्यांना भीक लागली आहे, म्हणून ते उद्योग करितात? ईश्वराच्या दयेनें घरीं श्रीमंती असून ते घर सोडून बाहेर उद्योग करण्यास जातात, हा मूर्खपणा नव्हे काय?" त्यांस, "तुम्ही आपल्या मुलांबाळांस विद्यादान करा," असें जर म्हटलें, तर ते म्हणतात, "काय त्यांना रोजगार करावयाचा आहे, तर शाळेंत पाठवावें? ज्यांना घरीं खाण्यास मिळत नाहीं, त्यांनीं विद्या शिकावी. आम्हांस तिची काय जरुरी आहे!" हे विचार फक्त श्रीमंत लोकांचेच असतात, असें नाहीं. गरीब लोकांचेही असेच विचार होऊन गेले आहेत. यामुळें उद्योगानें ते जरी श्रीमंत झाले, तरी ते आपल्या मुलांस उद्योग करूं देत नाहींत. ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. भर्तृहरि कवि स्वतः राजा होता. त्याचा श्लोक हा पहा:—

आलस्यं हि मनुष्याणां शरीरस्थो महारिपुः ।
नास्त्युद्यमसमो बन्धुः कृत्वा यं नावसीदति ॥ १ ॥

याचा अर्थ असा कीं, " आळस हा मनुष्याच्या शरिरांत राहणारा मोठा शत्रु आहे. उद्योगासारखा दुसरा बंधु नाहीं. उद्योग केल्यानें मनुष्य कधींही नाश पावत नाहीं." याकरितां आपल्या लोकांनीं उद्योग स्वीकारावा. उद्योग्यास काय असाध्य आहे? सर्व कांहीं त्यास साध्य आहे.

विलायतेंत उद्योगानें इतके पुरुष उदयास आले आहेत कीं, त्यांची गणती नाहीं. ज्याचा त्याचा आपल्या उद्योगावर भरंवसा असतो; व ते आत्मसंयमन करितात. लहानथोर, गरीबश्रीमंत, सर्व जण उद्योग करितात. जरी लहान व गरीब अशा लोकांचें नांव अद्याप राहिलें नाहीं, तरी देशाचें त्यांच्या उद्योगापासून बरेंच हित झालें आहे. त्या त्या वेळचे लोकांत ज्यांस त्यांची माहिती होती, त्यांस त्यांचा चांगला कित्ता घेतां आला, व तेही त्याप्रमाणें उद्योग करूं लागले. या लोकांचीं चरित्रें लिहून ठेविलीं, तर त्यांपासून फार उपयोग होणार आहे. विघ्नें आलीं असतां त्यांचें निवारण कसें करावें, उद्योग केल्यापासून काय फायदे होतात, एकमेकांचीं चांगलीं कृत्यें पाहून मनुष्यास कसें उत्तेजन येतें, अशा प्रकारचे उपयोग या चरित्रां-पासून होणार आहेत. उद्योगी, आरंभशूर नसून कार्यसिद्धीपर्यंत धैर्य खचूं न देतां टिकणारे, व इतकें असूनही सचोटीनें वागणारे, असे लोक इंग्लंडांत फार होऊन गेले आहेत. यांच्या चरित्रांवरून प्रत्येकास असें दिसून येईल कीं, स्वतःच्या प्रयत्नावर पुष्कळ हित करून घेतां येईल; आणि स्वाभिमान व स्वावलंबन यांच्या जोरावर, गरिबींत जरी मनुष्य असला, तरी तो लवकर उदयास येईल व पोटापुरता पैसा मिळवील. सारांश, यांचीं चरित्रें वाचून प्रत्येकास

असें कबूल करावें लागेल कीं, " किं दूरं व्यवसायिनाम् ?" म्हणजे उद्योगी मनुष्यांस अगम्य म्हणून कांहीं नाहीं.

प्रत्येक मनुष्य उद्योगावर भरंवसा ठेवूं लागला, व त्याचें अनुकरण दुसरे लोक करूं लागले, म्हणजे सर्व देशाचें हित होतें. पुस्तकें वाचून ज्ञान होतें; पण उदाहरणें पाहून जें ज्ञान होतें, तें फार चांगलें मनांत ठसतें. या म्हणण्यास अपवाद मुळींच सांपडणार नाहीं. याला प्रमाणें पुष्कळ कवींचीं वाक्यें देतां येतील. केवळ वाक्पांडित्यानें लोकांच्या मनांवर इतका ठसा उमटत नाहीं. करून दाखविलें असतां कांहीं उपयोग आहे मनुष्य आपापले धंदे करण्यास समर्थ होतो, तो पुस्तकें वाचून होत नाहीं. तीं कामें करण्यामध्यें कांहीं वर्षें गेलीं पाहिजेत, म्हणजे पुस्तकांपासून प्राप्त झालेलें ज्ञान दृढ होतें. बंधारे कसे करावे, किंवा नौका तयार कशा कराव्या, याविषयींचें एखादें पुस्तक वाचिलें, तर मला त्याविषयीं कांहीं ज्ञान होईल खरें; पण बंधारे बांधावयास गेलों, किंवा नौका तयार करूं लागलों, तर माझ्या हातून तें काम होईल काय ? अर्थात् होणार नाहीं. मी जर एखाद्या कारागिराच्या हाताखालीं राहिलों नाहीं, तर मला त्यांत कांहींही साधावयाचें नाहीं. कांहीं वर्षें त्याच्या हाताखालीं राहून काम केलें पाहिजे; माझ्या ज्या ज्या चुका होतील, त्या त्या दुरुस्त करून घेतल्या पाहिजेत; तेव्हां सरासरीनें तें काम मला करितां येईल. नंतर स्वतः तें काम चालवून त्यामध्यें प्रवीणता मिळविली पाहिजे.

असें ज्ञान इंग्लिश लोकांस फार असतें. दुकानांत जा, पेठेंत जा, गल्ल्यांत जा, चौकांत जा, पाहिजे त्या ठिकाणीं जा; स्वतःच्या श्रमांवर पोट भरणारे लोक त्यांच्यांत फार आढळतील. पोटाकरितां ते कोणच्या देशांत जाणार नाहींत ? अमेरिकेंत, आफ्रिकेंत, हिंदु-

स्थानांत, पासिफिक महासागराच्या बेटांत,-पाहिजे त्या ठिकाणीं जातील. देश थंड असो, उष्ण असो, पर्वतमय असो, सपाट असो, बेट असो, समुद्रापासून फार लांब असो, त्या ठिकाणीं जाण्यास ते मागेंपुढें पाहाणार नाहींत. परकी देशांतही ते आपल्या देशांतल्याप्रमाणें वागतात; म्हणजे आपण परदेशांत आहों, असें त्यांस वाटतच नाहीं. आमचे लोक याच्या अगदीं उलट आहेत. त्यांस घर सोडून जाणें म्हणजे प्राणसंकट वाटतें. घरीं राहून भीक मागतील; पण परदेशाचें नांवच नको. हेंच नव्हे, पण शेजारच्या प्रांतांत उदरनिर्वाह होण्याचा संभव असला, तरीसुद्धां ते जाणार नाहींत. आमचे सर्वच लोक याप्रमाणें आहेत, असें आमचें म्हणणें नाहीं. परंतु एकंदरीत पाहिलें असतां आमच्या लोकांची इंग्लिश लोकांशीं स्वतःच्या प्रयत्नांत तुलना होणार नाहीं, असें म्हणणें आम्हांला भाग पडतें. इंग्लंडांत ज्यांनीं आपलें नांव गाजविलें आहे, ते एकाच वर्गाच्या लोकांतून निघाले आहेत असें नाहीं. सर्व ज्ञाति, सर्व वर्ग यांतून कोणी ना कोणी तरी निघाले आहेत, असें दिसून येईल. कवि, तत्त्वज्ञानवेत्ते, यंत्रशास्त्रवेत्ते, न्यायाधीश, मोठाले शोध लावणारे, यांतून बहुतेक गरिबींतूनच वर आले आहेत. आपणांमध्यें असे लोक निपजले नाहींत, असें नाहीं; तरी त्यांची संख्या इंग्लंडांतील लोकांच्या मानानें पाहिलें असतां थोडी आहे.

अलीकडे आमचे लोक उद्योग करूं लागले आहेत, तरी स्वतःवर त्यांचें अवलंबन नाहीं, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे लोकांनीं त्यांस पगार दिला, म्हणजे ते उद्योग करितात. स्वतः एखाद्या धंद्यांत शिरून सर्व जोखीम आपल्या शिरावर घेतील, असे लोक फार थोडे. मुळींच नाहींत, असें आमचें म्हणणें नाहीं. पूर्वीं पेशवाईंत दीर्घप्रयत्नी लोक पुष्कळ होते, तसेच आतां मुंबई आदिकरून व्यापाराच्या

ठिकाणीं आहेत. मुंबईचे भाट्ये, मारवाडी व विशेषेंकरून पारशी या लोकांनीं या हिंदुस्थानांतच नव्हे, तर सर्व जगांत व्यापाराच्या संबंधानें आपलें नांव गाजविलें आहे. सर जमशेटजी जिजीभाई बारोनेट या नामांकित गृहस्थाचें नांव या पृथ्वीच्या कोणत्या भागावर माहीत नाहीं, असें असेल काय ?

वि. मो. महाजनी. स्वतःचा प्रयत्न.

---

## पाठ ३ रा.



## राष्ट्रीय बळ कशांत असतें ?

चीन देशाचें स्वराज्य एशिया, युरोप, आफ्रिका, अमेरिका आणि आस्ट्रेलिया ह्या पांचही भूखंडांतील सगळ्या राज्यांपेक्षां प्राचीन असून, तें आज चार हजार वर्षेपर्यंत टिकलें आहे. मिश्री, हेलेणी रोमन, हिंदुस्थानी इत्यादि प्राचीन राज्यें लयास गेलीं. त्यांपैकीं कांहीं परदेशी शत्रूंच्या पायांखालीं चुरडत आहेत, कांहीं बलिष्ठ पर-राज्यांच्या अर्ध्या वचनांत वागत आहेत; आणि कित्येकांचें नांवा-वांचून दुसरें कांहीं चिन्ह राहिलें नाहीं; पण चीनदेश अद्यापि स्वतंत्र आहे. त्यांत स्वराज्य आहे. एखादे वेळीं प्रबल पाश्चात्त्य शत्रूपुढें जरी त्या राष्ट्राला मान झुकवावी लागते, तरी त्याला आपल्या प्रजेची व देशाची उन्नति करून पाश्चात्त्य राष्ट्रांशीं टक्कर मारण्याचें सामर्थ्य अंगीं आणण्याची शक्ति आहे, व त्याप्रमाणें तें आपली सुधारणा करून घेतही आहे. अमेरिकन, इंग्रज आणि दुसरे युरोपियन लोक चिन्यांचा पाहिजे तितका अनादर करोत, थट्टा करोत किंवा निंदा करोत; तरी ते चिन्यांस भिऊनच वागतात. आजमितीस चिनाला परचक्रापासून भय बाळगिण्याचें कारणच नाहीं. आतां नव्या काल-

मानाप्रमाणें नव्या मनुष्यस्थितीला उपयोगीं पडणारे असे कांहीं फेरबदल करून चीन जर आपल्या राष्ट्राला आंतून बळकटी आणील, तर बाहेरून येणाऱ्या अनिष्टांनीं त्याचें कांहीं अहित होणार नाहीं,असें खास दिसतें. त्या राष्ट्रास इतकी बळकटी, इतका स्थाईकपणा व इतकें महत्त्व येण्याचें कारण काय ? " विद्या असल्यास जातिभेद राहणार नाहीं," असें चिनीलोकांचा गुरु कन्फ्यूशस याचें म्हणणें होतें. त्याच्या उपदेशाप्रमाणें चिनीलोकांनीं अमुक एक जात श्रेष्ठ आहे, असें न मानतां मनुष्याची विद्या व सुनीति हींच त्याच्या श्रेष्ठतेचीं खरीं कारणें होत, असें समजून अमीरउमरावांच्या किंवा विशिष्ट जातीच्या हातीं राज्यकारभार न देतां, ज्याची जशी विद्या आणि वर्तणूक असेल, त्याला तशा योग्यतेचा अधिकार देण्याची चाल पाडली. त्यामुळें चिनांतील गरीब, अप्रसिद्ध व नीच कुळांत जन्मलेल्या मनुष्यालासुद्धां विद्या व नीतिमत्ता यांच्या योगानें मोठ्या योग्यतेला चढण्याची आशा असते. चिनांतील पुरुषजातींत विद्येचें प्राधान्य आहे. तेथलि साधारण मजूरमोलकऱ्यांसदेखील लिहितां वाचतां येतें. ज्याला लिहितां किंवा वाचतां येणार नाहीं, असा पुरुष फार विरळा. ह्याप्रमाणें विद्येवर ज्या देशाचा राज्यकारभार स्थापला आहे, तो बळकट कां असणार नाहीं ? जे लोक सतत उद्योगधंदा करण्यांत तत्पर आहेत, जे कधीं आळशी भिकाऱ्यांचे लाड करीत नाहींत, जे विद्येची चहा करितात, त्यांच्या देशांत स्वराज्य असल्यास नवल नाहीं. तें नसणें हीच मोठ्या आश्चर्याची गोष्ट होय. प्लुतार्क नांवाच्या विद्वानानें म्हटलें आहे कीं, " नुमानें बांधलेली न्यायरूपी सुरेख इमारत पडून गेली; कारण ती विद्यारूपी पायावर बांधिलेली नव्हती." ज्यांत इतर सर्व गोष्टी चांगल्या आहेत, अशा राज्याची अवनति होण्याचें कारण दुसरें काय ? त्याच्या राज-

नीतीला विद्येचा दृढपाया आधारभूत नव्हता, ह्यापेक्षां त्याच्या पतनाचें बलवत्तर कारण दुसरें कोणतें असावें? ज्या राष्ट्रांत थोडेसे लोक विद्या शिकतात—आणि तेही एकदोन निवडक जातींचे—व जेथें बाकी लक्षावधि, कोट्यवधि रहिवासी अज्ञानांधकारांत गढलेले असून, त्यांस वरिष्ठ पद मिळण्याची नुसती आशा बाळगण्यासदेखील जागा नाहीं, अशा राष्ट्राचा मोड झाला नाही, तरच मोठें नवल म्हणावयाचें.

चिनाप्रमाणेंच युनायटेड स्टेट्सच्या राज्यकार्यधुरंधरांस व नीत्युपदेशकांस विद्येची योग्यता कळून आली आहे. राष्ट्रांतील सगळ्या रहिवाश्यांस लिहितां वाचतां तरी यावें, त्यावांचून आपलें स्वराज्य टिकणार नाहीं, असें त्यांस चांगलें माहीत आहे; आणि अलीकडे तर त्यांना स्त्रियांसही पुरुषाप्रमाणेंच विद्या मिळविण्याचे मार्ग मोकळे करून देणें अत्यावश्यक आहेसें वाटूं लागलें आहे. ह्या गोष्टींत त्यांची चिनावर तोड आहे. स्त्रीशिक्षणाचें महत्त्व केवढें आहे, हें हळुहळू चिनादिक सर्व राष्ट्रांस कळून येईल. युनायटेड स्टेट्सचें राष्ट्रीय बळ खड्या फौजेंत, तोफांत आणि तरवारींत नाहीं. तें त्या राष्ट्राच्या रहिवाश्यांच्या विद्यावत्तेंत आणि उद्योगप्रियतेंत आहे.

पंडिता रमाबाई. युं० स्टे० लोकस्थिति व प्रवासवृत्त.

---

## पाठ ४ था.



### प्रातःसमय—तापीतटाक.

[इ. सन १९०० साली, श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांची स्वारी सोनगड प्रांतांत पटाईत वाघाचे शिकारीस गेली होती. बरोबर लवाजमाही मोठा होता. तेव्हां श्रीमंतांनी के० विष्णु गोविंद चिपळूणकर यांस 'चित्रकार' या

नात्यानें आपल्याबरोबर नेलें होतें. त्यांनी त्यांच्या शिकारस्वारीचें सुंदर 'शब्दचित्र' प्रसिद्ध केलें आहे, त्यांतून पुढील उतारा घेतला आहे. श्रीमंतांनीं ता. २७ मार्च रोजी एक भली मोठी वाघीण मारिली. त्या दिवशीं झोंपेची वेळ टळल्यामुळें कै॰ चिपळूणकर यांस झोंप न लागतां ते अंथरुणावर तळमळत राहिले. पुढें जवळील पोलीसचौकीवर (छावणीतील) घड्याळांत पांचांचे ठोके पडलेले ऐकून ते प्रातर्विधि उरकण्याकरितां जवळच असलेल्या तापी नदीवर गेले. तेथील प्रातः-समयींच्या रम्य देखाव्याचें पुढील उताऱ्यांत त्यांनीं काव्यमय वर्णन केलें आहे.]

कांहीं वेळानें पोलीसच्या चौकीवरील घड्याळाचे ५ ठोके ऐकूं आले. या सुमारास सभोंवारच्या रानांत व तापीच्या कांठच्या वृक्ष-वल्लीवर रात्रीं विश्राम घेण्याकरितां बसलेले पक्षीही किलबिल करूं लागले. या वेळीं सर्वत्र शांत असल्यानें त्यांच्या मंजुळ शब्दांनीं सर्व वनप्रदेश नादावून गेल्यासारखा झाला. हे पक्ष्यांचे शब्द नव्हत, तर जणूं समस्त वृक्षवल्लींनाच वाचा फुटली असून, त्या, "रात्रीचें गाढ तम आवरून, आतां पुनः दैनिक जगद्व्यापार सुरू करण्याचें सामर्थ्य दे," अशी जगदुत्पादकाची प्रार्थना करीत आहेत, अथवा भूपाळ्या म्हणून त्यास आळवीत आहेत, अशी कल्पना मनांत आली; व या स्तवनानें संतुष्ट होऊन जगच्चैतन्यरूप सूर्यनारायण आतां लवकरच उदय पावेल, अशीं चिन्हें दिसूं लागलीं. आम्हीही एकदां डोकें वर करून तंबूच्या पडद्याच्या फटीतून पाहिलें, तों झुंजुमुंजू झालें आहे असें दिसलें, व यामुळें अंथरुणावर उगीच लोळत पडण्यापेक्षां आतां उठावें, असें मनांत आणून उठलों व तापीचे कांठीं येऊन सर्व प्रातर्विधि उरकून एका उंच दरडीवर शोभा पहात बसलों.

पूर्व दिशा हळुहळू सुप्रकाशित होऊं लागली. उजेड जसजसा वाढत गेला, त्या मानानें पक्ष्यांची किलबिलही अधिकाधिक मोठ्यानें ऐकूं येऊं लागली. आतांपर्यंत ते बसल्या फांदीवरूनच शब्द करीत होते; पण जसें अधिकाधिक दिसूं लागलें, त्या मानानें ते त्याच

वृक्षाच्या अथवा वल्लीच्या या फांदीवरून त्या फांदीवर उडूंबागडूं लागले. आतांपर्यंत वृक्षवनस्पति यांचे जागीं कांहीं काळ्या आकृति-मात्र दिसत होत्या. पण आतां प्रभा फाकूं लागली, त्या मानानें हळुहळू मोठ्या वृक्षांच्या फांद्या, फांद्यांस फुटलेल्या लहान फांद्या, त्यांस फुटलेलीं पानें व फुलें इत्यादि अवयव क्रमाक्रमानें अधिकाधिक स्पष्ट दिसूं लागले; व सृष्टि जणूं आतांच निर्माण होत आहे कीं काय, अशीही कल्पना मनांत आल्यावांचून राहिली नाहीं! एखादा चित्रकार एखाद्या चित्रपटावर आकाश, वृक्षवनस्पति, नद्या, पर्वत इत्यादींच्या बाह्यरूपरेषा प्रथम एकदां भराभर रेखाटतो, व मग त्या चित्रांत दाखविलेल्या वस्तूंचे बारीक भाग स्वस्थपणें कोरीत व रंगवीत बसतो, त्याप्रमाणें रात्रीं पसरलेल्या काळ्या पटावर प्रथम-दर्शनीं आसपासचे डोंगर, खडक, नदीचे तट व त्यांवरील उंच उंच व महान् वृक्ष यांच्या अस्पष्ट आकृति दिसूं लागल्या, व प्रकाश हळुहळू वाढत गेला, त्या मानानें त्या प्रत्येकाचे सूक्ष्म भाग व रेखींव कडा क्रमाक्रमानें सुव्यक्त होऊं लागल्या. पूर्वीं सर्वत्र जेथें एकच काळा रंग दिसत होता, त्याचे जागीं आतां कोठें हिरवा, कोठें तांबडा, कोठें भगवा, कोठें पिंवळा, असे निरनिराळे रंग व त्या प्रत्येकाच्या पोटच्या व प्रत्येकाच्या दुसऱ्याशीं संयुक्त झालेल्या अनेक छटा दिसूं लागल्या! हे रंग मूळचे त्या पदार्थांचे अंगीं असतात, अथवा ते सूर्याचे किरणांत गुप्त असून पदार्थांच्या संसर्गानेंमात्र प्रकट होतात, हे कांहींच कळेना. एखादा गारोडी आपले समक्ष आंब्याची कोय पुरून, अल्पकाळांत तिचें झाड करून त्यास आंबे आणून दाखवितो, व एकसारखें आपलें ढोलकें पिटून स्वतःची तारीफ करीत असतो; तेव्हां तो आरंभीं या खेळावर पांघरून घालून त्याची सर्व क्रिया आपणांस पाहूं व कळूं देत नाहीं, व हा सर्व तमाशा नजरबंदीचा

आहे, असें आपण समजतों व म्हणतों; तरी त्यामुळें आपण अतिशय चकित होऊन जातों व त्याची प्रशंसा करीत सुटतों; परंतु सृष्ट्युत्पत्तिस्थितिनाशाचा अतिशय मनोरंजक खेळ करणारा गारोडी, खेळावर पांघरूण न घालतां त्यांतील सर्व सूक्ष्मासूक्ष्म क्रिया, आरंभापासून आतांपर्यंत, प्रत्यहीं आपले समक्ष करीत असतो; इतकेंच नाहीं, तर त्या आपणांस चांगल्या समजाव्या व दिसाव्या, म्हणून तो आपल्यास बुद्धि व दृष्टि देत असतांही, आपण त्या लक्षपूर्वक पहात नाहीं; एवढेंच नव्हे, तर तो करणारा आपलें ढोलकें आपणच वाजवीत सुटत नाही, या त्याच्या थोरवीमुळें त्याची खरी थोरवी आपण जाणत नाहीं, व त्याची प्रशंसा तर राहो, पण नित्य स्मरण करण्यासही कसे चुकतों, हे विचार या वेळीं मनांत आले ! गारोड्याच्या खेळांत कोईचें झाड त्यानें हातचलाखीनें कसें करून दाखविलें, एवढेंच ओळखण्याचें असतें; पण मी पहात होतों अशा प्रसंगीं ह्या अनंत वृक्षवल्ली, हे पक्षी, हे अत्युच्च डोंगर, हा अगाध व अस्खलित वाहणारा जलप्रवाह, एकंदरींत ही अगाध सृष्टि, कशी व केव्हां निर्माण झाली व हीस उत्पन्न—व्यक्त—करणारा कोण, केवढा, कसा, कोठें असेल व तो कसा प्रतीत होईल, हेच विचार मनांत घोळूं लागले व मनही गोंधळून गेलें !

आणखी पांचदहा मिनिटें अशींच गेलीं. पक्षी आपआपल्या चाऱ्याच्या शोधार्थ, कांहीं थवेच्या थवे करून, कांहीं एकाकी, कांहीं जोडप्यांनीं, उडून जाऊं लागले. प्रातःकाळच्या वाऱ्याच्या झुळुकांनीं झाडांच्या खांद्या हललेल्या दिसत, त्यावरून त्यांत चैतन्य गोचर झालें, किंवा त्यांस जणूं धुगधुगी येऊं लागली, असा भास होई. क्रमाक्रमानें पूर्वदिशेची रक्तिमा कमी कमी होत जाऊन ती जास्त उजळली; क्षितिजाकडे रक्तवर्ण व विशाल सूर्यबिंब दिसूं

लागलें. आणखी थोड्या वेळानें त्याची ही रक्तिमा व आकार हीं कमी कमी होऊं लागून त्यांत पिंवळेपणा मिसळूं लागला. पिंवळ्या रेशमाच्या धाग्यांसारख्या किंवा सुवर्णाच्या बारीक तारांसारख्या अनंत पीतवर्ण किरणरूप तंतूंचें जाळें सृष्टीवर पसरलेलें आहे कीं काय, अथवा रात्रीं सृष्टीस आलेली मलिनता, किरणरूप सोन्याच्या तारांचे कुंचल्यानें काढून टाकून उजाळाच दिला जात आहे कीं काय, अथवा सूर्यबिंबापासून निघणारे किरण हे सूर्यरूप हजाऱ्यांतून गळणाऱ्या सुवर्णजलाच्या धारा अथवा चिळकांड्याच उडत असून, त्यांनीं तमोरूप मळ धुतला जात आहे की काय, असा भास झाला. सुवर्णाभिषेक झाल्यानंतर सृष्टिदेवी रात्रीं परिधान केलेल्या कृष्णवस्त्राचा त्याग करून, पिंवळ्या रंगाचें तकतकीत व झिरझिरीत पातळ नेसल्यासारखी दिसूं लागली; व ती तापीचे पात्रांत प्रतिबिंबित झालेली पाहून, जशी कांहीं वेणीफणी करून व पिंवळा शालू नेसून आपलें प्रसन्न मुख, या महानदीचा विस्तृत जलौघ, हाच कोणी आदर्श, ह्यांत पहात आहे कीं काय, अशी उत्प्रेक्षा मनांत आली.

वि. गो. चिपळूणकर. मृगयाकुतूहल.

---

## पाठ ५ वा.



### आम्ही कसे आहों ?

फार प्राचीनकालीं हिंदुस्थानचे लोक महापराक्रमी, ज्ञानसंपन्न व दीर्घोद्योगी होते हें खरें; परंतु त्या त्यांच्या उच्च स्थितीस अलीकडे सुमारें दोन हजार वर्षें उतरती कळा लागून त्यांच्या पुढील वंशजांस महानिद्रा लागत चालली. त्यांच्यांत नानाप्रकारचीं पाखंडें, आळस,

व अशक्तपणा उत्पन्न झाला; तर्कदीप अगदीं मालवला; त्यांचें धैर्य, वीर्य व पराक्रम नष्ट होऊन ते अन्यदेशीय लोकांचे तावडींत सांपडले गेले. आपण कोण, आपला देश केवढा विस्तीर्ण, किती सुपीक, किती धनाढ्य, केवळ सुवर्णभूमि, किंबहुना प्रत्यक्ष कल्पवृक्षच, हें त्यांच्या ध्यानींमनींही येईनासें झालें. त्यांच्यामध्यें अनेक भेद, फांटाफुटी, वैषम्यें व मत्सर ह्यांचें प्राबल्य होऊन ते परस्परांचे शत्रु बनले. विचारशून्य, अज्ञानी व दांभिक लोकांनीं जें सांगितलें, तें त्यांनी बिनतक्रार मुकाट्यानें ऐकून, त्यावर विश्वास ठेविला; इतकेंच नाही, तर त्याप्रमाणें ते वर्तणूकही करूं लागले. उत्तरोत्तर आपणांस वाईट स्थिति कशानें येत चालली, ह्याचा दूरवर विचार न करितां, त्यांनीं ह्या दुःस्थितीचें व अवदशेचें सर्व निमित्त कालावर ढकललें. कोणी चालू काळास " कलियुग " म्हणूं लागून आपणांस दुर्दशा येण्याचें कारण या कलियुगाचा प्रभाव हें होय, असें म्हणूं लागले. अन्यायाचे व बाष्कळपणाचे प्रघात पाडून शिमग्यासारखे बीभत्स सण प्रचारांत आणिले, आणि त्यांत निर्लज्जपणानें मनसोक्त व्यापार करूं लागले. गतभर्तृकांचें केशवपन करून त्यांतच मोक्षधोरण मानूं लागले. मुलांचीं लहानपणीं लग्नें करून सर्व प्रजा निःशक्त व निर्वीर्य करून टाकिली. आपसांतील उत्कर्ष सहन न होऊन ते चहाडखोर बनले. परकीय राजांस सामील होऊन त्यांजपुढें गोंडा घोळूं लागले. त्या परकीय राजांनी तरी, आपल्या पायांनीं आपल्या घरीं चालत आलेल्या लक्ष्मीस पाठ कशी द्यावी ? मग त्यांनींही ह्यांजशीं गोड बोलून व ह्यांच्या पोटांत शिरून यथेच्छ हात मारून घेऊन आपला स्वार्थ साधला. हे परकी राजे देशांत घुसल्यामुळें खातींपितीं व खानदानींतलीं अशीं शेंकडों कुळें देशोधडीस गेलीं. संपत्तीचा सर्व प्रकारें ऱ्हास झाला.

आपणांस आर्य म्हणविणाऱ्या लोकांनीं, आपण कोण, कोणाचे वंशज, आपले पूर्वज कसे व किती विद्वान् होते, त्यांनीं नानाविध शास्त्रांत कशी पारंगतता संपादन केली होती, त्याचप्रमाणें त्यांनी शास्त्रीय असे केवढाले गहन विचार करून, त्यांवर काय काय ग्रंथ लिहून ठेविले आहेत, इत्यादि गोष्टीचा शोध करण्याचें सोडून, "चाललें आहे तेंच ठीक आहे," अशावर समाधान मानून, कांही एक हालचाल न करितां, "जसा वारा येईल, तशी पाठ दिली पाहिजे." या असमंजस सिद्धान्तावर सर्व भिस्त ठेवून, ते निरुद्योगी बनले. त्यांच्यांत विद्येविषयीं अरुचि उत्पन्न झाली, विद्वानांचा सन्मान नाहींसा झाला, वेदग्रंथांत सर्व कांही भरलें आहे, अशा वेडगळ समजुतीनें ते त्यांचीच घोकंपट्टी करीत राहिले; आणि ज्यास वेद येतात, तोच काय तो विद्वान् असा त्यांचा मिथ्या ग्रह झाला. अशा प्रकारें सर्वत्र अज्ञानांधकार पसरत चालल्यामुळें भंगड, गंजड, अफीमे, वगैरेंची साधूंत व योग्यांत गणना होत चालली. बाष्कळ व आपस्वार्थाच्या दंतकथा सांगणारे धर्माध्यक्षतेचा टेंभा मिरवूं लागले. प्रजेची अशी निकृष्ट स्थिति झाल्यामुळें तिचे पालनकर्ते राजेही जुलमी, स्वार्थी, दुष्ट, अन्यायी व लुटारू बनले; लांचखाऊ, त्रासदायक, आप्पलपोट्ये व हांजी हांजी करणारे असे लोक त्या राजांचे दिवाण व मुत्सद्दी झाले. याप्रमाणें सर्व प्रकारें उतरतीकळा लागली. हल्ली इंग्रज लोकांचे सहवासानें लोकांचे कांहींसे डोळे उघडून उद्योग कसा करावा, व्यापार कसा करावा, राज्यरीति कशी असावी, प्राचीन काळीं हा देश कसा होता, एकंदर पृथ्वीवर कोणकोणत्या धर्मांचे व जातींचे लोक राहतात, इत्यादि गोष्टींचें अंशतः प्रत्यक्ष दर्शन व तर्काचा साक्षात्कार होऊन, त्यांच्यांत कांहींशी हालचाल व चळवळ सुरू झाली आहे. आतां ही चळवळ व हालचाल या भरतखंडास

कोणत्या योग्यतेला नेऊन पोंचवील, हें आतांच निश्चयानें सांगवत नाहीं हें खरें; परंतु हल्लीं सुरू असलेली चळवळ चढत्या प्रमाणावर अशीच अखंड चालू राहील, तर निश्चयानें 'घटीयंत्र' न्यायानें रितें मडकें भरल्यावांचून राहणार नाहीं. म्हणजे आपल्याला व आपल्या देशाला प्रस्तुत प्राप्त झालेली उतरती कळा नष्ट होऊन चढती कळा आल्यावांचून राहणार नाही. पण प्रयत्नांतमात्र कसूर होतां उपयोगी नाही.

**लोकहितवादी.** सुराष्ट्रदेशाचा ससाक्ष इतिहास.

---

## पाठ ६ वा.



## शरीरसामर्थ्य.

### भाग १ ला.

शरीरसामर्थ्य हें सर्व सुखांचें साधन आहे. मनुष्यजन्म घेऊन ह्या जगांत जे चार पुरुषार्थ साधावयाचे, त्यांचें मूलकारण हेंच आहे. "धर्मार्थकाममोक्षाणामारोग्यं कारणं यतः" असें म्हणून आपले पुरातन वैद्यकाचार्य आयुर्वेद सांगण्यास प्रारंभ करितात. ऐहिक सुखांचा लाभ व उपभोग, शरीर सुदृढ व निरोगी असल्याशिवाय होत नाहीं; तसेंच परमार्थसाधनाचे जे ऋषिप्रणीत तीन मार्ग ज्ञान, कर्म व उपासना असे सांगितलेले आहेत, त्यांची सिद्धिसुद्धां शरीरसामर्थ्यावर अवलंबून आहे. ह्या जगांत मनुष्यास जीं जीं म्हणून कर्तव्यें आहेत, म्हणजे जें जें कांहीं स्वतःसाठीं किंवा समाजासाठीं त्यानें केलें पाहिजे, तें तें सर्व शरीरसामर्थ्याशिवाय होणें अशक्य आहे. ज्ञान-संपादन, द्रव्यप्राप्ति, स्वतःचें व समाजाचें रक्षण व स्वतःच्या आणि समाजाच्या उन्नतीसाठीं सतत आणि अव्याहत प्रयत्न, हीं करण्यास

शरीरसामर्थ्य अवश्य पाहिजे. इतकेंच नव्हे, तर हल्लींच्या युगांत जो भयंकर जीवनार्थ कलह चालला आहे, त्यामध्यें कोणत्याही समाजानें किंवा देशानें टिकाव धरणें ह्यास शरीरसामर्थ्य अवश्य पाहिजे. नाहीं तर अमेरिकेंतील 'रेड इंडिअन्स'सारखी अवस्था केव्हां, कोणत्या लोकांची होईल, ह्याचा भरंवसा नाहीं. म्हणून शरीरसामर्थ्य उत्तम प्रकारानें ठेवणें, हें अगदीं अवश्य आणि अतिमहत्त्वाचें आहे; आणि त्या सामर्थ्याचा दुसऱ्या प्रकारची सामर्थ्यें मिळविण्याकडे विनियोग केला पाहिजे; म्हणजे शरीरबलाच्या मानानें ज्ञानबल, उद्योगबल व व्यापारबल आणि सामाजिक व राष्ट्रीय बल जेव्हां संपादन करावें, तेव्हां कोठें ह्या भयंकर जीवनार्थ कलहांत आपला टिकाव लागणार! याकरितां या सर्व बलांचें एक प्रकारें मूलकारण जें शरीरबल, त्याचा आज आपल्यासंबंधानें विचार करावयाचा आहे.

हल्लीं आपल्या लोकांत शरीरसामर्थ्य फार कमी आहे, असें जें आपण म्हणतों, तें सर्व मराठे, शेतकरी, कोष्टी, माळी, वगैरे शरीरकष्ट करून पोट भरणाऱ्या लोकांपेक्षां पांढरपेशे म्हणजे कारकुनी करून पोट भरणाऱ्या लोकांस जास्ती लागू पडतें. वाई-साताऱ्याकडचे मराठे व रामोशी, किंवा बेळगांव-धारवाडकडचे शेतकरी वगैरे लोक इतर इंग्लंड वगैरे सुधारलेल्या देशांतील त्याच स्थितींतल्या लोकांशीं शरीरसामर्थ्यानें कदाचित् बरोबरी करूं शकतील. पण ज्यांच्यावर देशोन्नतीचा मुख्य बोजा पडतो, व ज्यांस ज्ञानबल, उद्योगबल व व्यापारबल, सामाजिक व राष्ट्रीय बल संपादन करून दुसऱ्या देशांच्या त्याच स्थितींतल्या लोकांशीं टक्कर मारावयाची असते, त्या देशांतील पुढारीपण घेऊं पाहणाऱ्या व आपणांस उच्च वर्गीतील म्हणविणाऱ्या पांढरपेशा म्हणजे ब्राह्मण, परभू वगैरे लोकांची शरीरसामर्थ्याविषयींची स्थिति फार निकृष्ट व शोचनीय झाली

आहे. ह्याकरितां आजच्या विषयाचा विचार या लोकांच्यासंबंधानें मुख्यत्वेंकरून करावयाचा आहे.

ही शरीरसंबंधी निकृष्ट व शोचनीय स्थिति कांहीं अनिवार्य कारणांमुळें आली आहे, असा कित्येकांचा ग्रह आहे. प्रथमतः सर्व देशभर पसरलेली आपल्या लोकांची दरिद्रावस्था, हीच त्यांच्या शरीरस्थितीचें कारण असावेंसें वाटतें. पण सर्व देशाच्या दरिद्रावस्थेचें चिंतन करून दुःख करीत बसण्यांत काय अर्थ आहे? ती दरिद्रावस्था दूर करण्याकरितांच शरीरशक्ति चांगली पाहिजे आहे; तर आपली जी हल्लींची स्थिति आहे, तीतच आपण काय करूं शकूं, तें पाहिलें पाहिजे आणि तसें केलें पाहिजे. कोणताही एखादा परिणाम घडून येतो, तो अनेक कारणांनीं घडून आलेला असतो. त्यांपैकीं कांहीं अनिवार्य असतात, कांहीं दुःखानें निवारण होतील अशीं असतात, व कांहीं स्वल्प आयासांनीं निवारण होतील अशीं असतात. तर हा परिणाम दूर करण्याची इच्छा असल्यास अनिवार्य कारणांकडे बघून हताश होऊन दुःख करीत बसण्यापेक्षां निवारण करतां येण्याजोगीं असतील, तीं दूर करण्याच्या खटपटीस लागणें उद्योगशील मनुष्यास प्रिय व रास्त वाटेल. त्यांतून हीं जीं अनिवार्य कारणें आहेत, त्यांपेक्षां निवारण करितां येण्याजोग्या कारणांवरच, तो परिणाम जास्ती अवलंबून आहे असें दिसून आलें, तर तो परिणाम दूर करूं इच्छिणाऱ्यांस अधिक उमेद येईल. आपल्या शरीरस्थितीची गोष्ट यांतलीच आहे. आपल्या शोचनीय शरीरस्थितीचीं जितकीं अनिवार्य कारणें मनांत आणून लोक हताश होऊन बसतात, त्यांपेक्षां निवारण करितां येण्याजोगीं कारणें बलवत्तर आहेत; म्हणजे अनिवार्य कारणें एकीकडे ठेवूनसुद्धां विचार व खटपट केली असतां आपली शरीरस्थिति पुष्कळ सुधारतां येण्याजोगी

आहे. आपल्या देशाची दरिद्रावस्था इतक्यांत बदलतां येण्याचा संभव नाहीं; म्हणून ती बदलण्याकरितां फार उपयोगीं पडणारें शरीरसामर्थ्य आपल्याला वाढवितां येणार नाहीं असें मुळींच नाहीं. कारण दरिद्रावस्थेशिवाय अनेक कारणांनीं आमचें शरीरसामर्थ्य निकृष्टावस्थेस येऊन पोहोंचलें आहे. तीं कारणें सध्यां दूर केलीं, म्हणजे शरीरस्थिति पुष्कळ प्रकारें सुधारेल, यांत संशय नाहीं. आम्ही गरीब लोक आहों. आम्हांस पोटभर व चांगलें खावयास मिळत नाही म्हणून आम्ही अशक्त आहों, असें आपणांपैकीं कितीकांस म्हणतां येईल बरें ? एखाद्या मोळीविक्याविषयीं, किंवा काबाडकष्ट करूनसुद्धां मुलांमाणसांच्या व स्वतःच्या पोटापुरती जाडी-भरडी भाकरदेखील ज्यास नेहमीं मिळूं शकत नाहीं, अशा एखाद्या गरीब कुणब्याविषयीं, अथवा एखाद्या वारकरी अथवा मधुकरी मागून जेवणाऱ्या विद्यार्थ्याविषयीं बोलतांना दरिद्रस्थिति हें शरिराच्या अशक्ततेचें कारण आहे, असें म्हटलें तर शोभेल. पण पांढरपेशे गृहस्थांपैकीं व इतर वर्गांतील मध्यमस्थितींतल्या लोकांपैकीं किती लोकांना हें कारण लागू पडेल ? आमचे सरदार व जहागिरदारवर्गांतील लोक, आमचे शेठसावकार, आमची सरकारी बडी व साधारण कामगार मंडळी व या वर्गांतील नवीन प्रजा यांचीं शरिरें असावीं तशीं सुदृढ व निरोगी आहेत काय ? आणि नाहींत, तर द्रव्याच्या कमतरतेशिवाय दुसऱ्या कारणांनीं त्यांचीं शरिरें रोगी व क्षीण झालीं आहेत असें म्हणण्यास काय हरकत आहे ? शिवाय साधारण स्थितींतल्या लोकांसदेखील आपलें व आपल्या प्रजेचें शरीरसामर्थ्य चांगलें राखावें, हें फार उपयोगी, सुखावह व महत्त्वाचें आहे, असें वाटूं लागल्यास दुसऱ्या चालू पण अवश्य खर्चांतून काटकसर करून, किंवा चैनीचे अनावश्यक खर्च कमी करून, शरिरास योग्य व पुरतें

अन्न पुरविण्यास अशक्य होईल काय? असें जर नाहीं, तर आपले देशाची निकृष्ट पण अनिवार्य दरिद्रावस्था असूनही, आपण आपल्या शरीरस्थितीचीं दुसरीं कारणें शोधून काढून तीं दूर करण्यास झटलों असतां आपली शरीरस्थिति पुष्कळ अंशांनीं सुधारूं शकूं, यांत कांहीं संशय नाही.

जशी दरिद्रावस्था असली म्हणजे शरिरें निःसत्त्व होतात, किंवा शरिरें निःसत्त्व असलीं म्हणजे दरिद्रावस्था येते, तसें परराज्य असलें म्हणजे आळस आणि घरग्युजेपणा वाढतो, किंवा आळस आणि घरग्युजेपणा असला, म्हणजे स्वराज्य जाऊन परराज्य होतें. पण अनिवार्य कारणांविषयीं शोक करीत बसण्यापेक्षां निवारण करतां येतील, अशीं कारणें लक्षांत आणून तीं दूर करावी, हें जास्ती श्रेयस्कर आहे; म्हणून आळस आणि घरग्युजेपणा घालविण्याचा यत्न करणें इष्ट आहे; आणि तें होण्यासारखें आहे. तालमीचा शोक, व्यायामाची हौस, धाडसाचें काम करण्यांत मौज वाटणें हें लहानपणापासून शिकवितां येईल, हें निर्विवाद आहे. परराज्य आहे म्हणून आम्हांस क्षत्रियकर्मांची संवय सुटावी, हें म्हणणें रास्त होणार नाहीं.

## पाठ ७ वा.



## शरीरसामर्थ्य.

### भाग २ रा.

तसेंच, 'आमचा देश उष्ण कटिबंधांत आहे, म्हणून आम्ही आहों असेच अशक्त असावयाचे', असें म्हणण्याचा प्रघात पडला

आहे. पण हें म्हणणें शास्त्रीय दृष्ट्या अगदीं अशुद्ध आहे. जीवन-शक्तिविशिष्ट पदार्थांचे दोन वर्ग आहेत. एक वनस्पतिवर्ग आणि दुसरा प्राणिवर्ग. ह्या दोन्हीं वर्गांतल्या व्यक्ति जशा उष्णकटिबंधांत वाढतात व जोर धरतात, तशा शीतकटिबंधांत धरीत नाहींत. वड, आंबा, चिंच, नारळ इत्यादिकांसारखीं विस्तीर्ण, जोरदार व चिरायु झाडें शीतकटिबंधांत होणें, सृष्टिक्रमाविरुद्ध आहे. तसेंच, सिंह, वाघ, हत्ती किंवा रानडुकर ह्यांचें वसतिस्थान उष्ण कटिबंधांतील प्रदेशच होऊं शकतात; शीतकटिबंधांतील प्रदेश होऊं शकत नाहींत. पण शीतकटिबंधांत मनुष्यप्राणीमात्र चांगला वाढावा, आणि उष्ण-कटिबंधांत वाढू नये, हें चमत्कारिक नव्हे काय? लंडन येथील 'क्यू' नामक बागेंत विस्तीर्ण कांचगृह करून, आंत उष्णतामापक यंत्र ठेवून व हवी तशी माफक उष्णता उत्पन्न करून फार काळजीनें लावून वाढविलेलें आंब्याचें झाड घेतलें, आणि आपल्या देशांतल्या माळावर लागलेलें, गुरांनीं त्याचीं पानें खुडून खावीं, किडीनें बुंध्यांत प्रवेश करून रस शोषण करावा, वाटसरूंनी कोंवळे मोहोर व फळें तोडून न्यावीं, धड पुरतें पाणी त्यास मिळूं नये, अशा स्थितींतलें बिनवारशी आंब्याचें झाड घेतलें; आणि त्यापेक्षां तें विलायतेंतील झाड मोठें व जोमदार दिसलें, म्हणजे आंब्याचीं झाडें उष्णकटिबंधांत वाढायचींच नाहींत, अशींच खुरटीं आणि निःशक्त असावयाचीं, शीतकटिबंधांतमात्र तीं चांगलीं वाढावयाचीं व जोर धरावयाचीं, असा सिद्धान्त करणें रास्त होईल काय? शीत-कटिबंधांतील कांहीं प्रदेशांतल्या लोकांनीं शरीरवृद्धीस अपायकारक असे हवापाण्यांतले दोष आपल्या बुद्धिमत्तेनें, आपल्या सद्वर्तनानें, आपल्या दूरदर्शित्वादि गुणांनीं अनपायकारक केले; आणि मोठ्या कष्टांनीं, श्रमांनीं व काळजीनें, ते सशक्त बनले; आणि आम्हीं

आपल्या निष्काळजीनें, अज्ञानानें, दुर्वर्तनानें आणि सृष्टि-नियमांचें उल्लंघन करून आपलीं शरिरें निःशक्त आणि क्षीण केलीं, म्हणजे उष्ण प्रदेशांत तीं अशींच असावयाचीं, शीतकटिबंधांतील प्रदेशांतच तीं चांगलीं वाढावयाचीं, असें का ठरतें? भूगोलांतील राष्ट्रीय इतिहासदेखील असल्या सिद्धान्तांच्या विरुद्ध साक्ष देतो. भूगोलपृष्ठावर भरभराटीस आलेलीं राष्ट्रें जर पाहिली, तर तीं सर्व शीतकटिबंधाच्या बाहेरचीं. प्रथम इजिप्त, नंतर ग्रीस व इराण, नंतर इटली व अरबस्तान, त्याचप्रमाणें आपलें पूर्वीचें आर्यावर्त आणि चीन, या देशांतील लोकांनी जीं बुद्धीचीं आणि शौर्याचीं कामें केलीं आहेत, तीं सर्व विसरून एक इंग्लंड देशाच्या उदाहरणा-वरून जर आपण आज म्हणावयास लागलों कीं, आपला देशच उष्ण, आम्ही असे गुलामस्थितींतच राहण्यास योग्य असणार, आमच्यानें कसला पराक्रम होतो? तर हें म्हणणें आपणांस शोभेल काय? दिलीप-रघूसारखे पराक्रमी राजे जेव्हां आमच्या देशांत होते, तेव्हा आमचा देश काय जास्त थंड होता? आणि आतांच उष्ण झाला व आम्हीं अशक्त झालों? तर नाहीं, ह्याचा सर्व दोष आपणां-कडे आहे. आपण सृष्टिनियमांचें उल्लंघन करतों, शरीरशास्त्रास झुगारून देतों, वाटेल तसे वागतों, ह्याचा हा परिणाम आहे. ह्या उत्तम हवेच्या देशाचा वारसा (हक्कानें कां होईना) आपणांस मिळाला, याबद्दल आनंद मानावयाचा सोडून आपण दुःखी असलों, तर तें आपलें केवळ अज्ञान, दुसरें कांहीं नाहीं.

आपल्या शरीरक्षीणतेचें आणखी एक कारण कांहीं लोकांच्या बोलण्यांत कधीं कधीं ऐकूं येतें, तें आपल्या आहारासंबंधानें. ते असें म्हणतात कीं, 'जोंपर्यंत आपला आहार मांसाचा नाहीं, तों-पर्यंत मांसाहारी लोकांची बरोबरी करणें व्यर्थ आहे'. कांहीं लोकांस,

मद्य व मांस हीं दोन्ही शरीरपोषणास अत्यंत उपयोगी आहेत, आणि तीं जोंपर्यंत जे लोक सेवन करीत नाहींत, तोंपर्यंत ते क्षीण-बल आणि निस्तेज रहावयाचेच, असें वाटतें. आतां हा विचार व ग्रह अगदी चुकीचा व भ्रममूलक आहे, हें सर्वांनीं ध्यानांत धरावें. त्यांतून मद्यपान शरीरपोषणास अगदीं निरुपयोगी आहे, इतकेंच नव्हे, तर पुष्कळ प्रकारानी तें अपायकारक आहे, हा शरीरशास्त्राचा पक्का सिद्धान्त ठरला आहे, आणि ह्याबद्दलची चर्चा हल्लीं जिकडे तिकडे चालू आहे. मांसाविषयीं इतकें ध्यानांत धरलें पाहिजे कीं, तें [illegible] जरी योग्य आहे, तरी आवश्यक आहे असें नाही. मांसांत जी तत्त्वें आहेत, तीं किंवा त्याच योग्यतेचीं तत्त्वें पुष्कळ वनस्पतींच्या भागांत सांपडतात, ही गोष्ट अगदी [illegible] आहे. त्यांतूनही आपल्या देशांत मांसाहारी थोडे आहेत असें नाहीं; व त्यांची शरीरस्थिति मांस न खाणाऱ्या-पेक्षां चांगली असते असेंही नाहीं. मुंबईतील खत्री व परभू लोक मांस खाणारे असून त्यांची बाकीची गृहस्थिति आमच्यासारखीच असते; पण ते त्यांच्या आहारभेदानें मांस न खाणाऱ्यापेक्षां जास्ती सशक्त किंवा सतेज असतात, असें मुळींच नाहीं. शिवाय मांस न खाणारे प्राणी जर आपण मनांत आणले, तर आपल्यास दिसून येईल कीं, हत्ती व गेंडे यांच्यासारखी शरिराची वाढ, रानडुकर किंवा घोडा यांच्यासारखी शक्ति, किंवा काळविटासारखी चपलता उत्पन्न करण्याला वनस्पतींच्या अन्नांत योग्यता पूर्णपणें आहे. फक्त एका प्रकारचें क्रौर्य, किंवा उन्मत्तता मांस न खाणाऱ्या प्राण्यांत उत्पन्न होत नाहीं, एवढेंमात्र दिसतें. पण ह्या गुणाची मनुष्यामध्यें किती आवश्यकता आहे, हेंमात्र विचार करण्याजोगें आहे; एकंदरींत ह्या वादांत हल्लीं न शिरतां इतकेंमात्र म्हणण्यास हरकत नाहीं कीं, ह्या

आहाराशिवाय शरीरपोषण कांहीं अडावयाचें नाहीं; आणि त्यांतूनही हिंदुस्थानांतील सर्व लोक मांसाहार करीत नाहींत असेंही नाहीं; याकरितां ह्या एवढ्या कारणानें आम्ही सर्व अशक्त, निस्तेज व निरुत्साह झालों असें म्हणणेंमात्र चुकीचें होईल.

जर आपली दरिद्रावस्था, आपल्यावरची परराज्यसत्ता, आपल्या देशाची उष्ण हवा, किंवा आपलें आहारभिन्नत्व, हीं आपल्या शरिराच्या निकृष्टावस्थेला सबळ कारणें आहेत, असें ठरत नाहीं, हें निर्विवाद आहे, तर मग आपली अशी अवस्था कशानें झाली? ह्याचा विचार फार बारकाईनें केला असतां असें दिसून येईल कीं, आपण शारीरशास्त्राच्या ठोकळ आज्ञादेखील बरोबर पाळीत नाहीं, म्हणून आपली ही अशी अवस्था झाली आहे. शारीरशास्त्राच्या आज्ञा अनुल्लंघनीय आहेत. त्या मोडल्या असतां त्यापासून वाईट परिणाम होणार हें उघड आहे; म्हणून त्या कळणें अवश्य आहे. आणि त्या बरोबर कळल्या असतां कोणी त्या पाळणार नाहीं, असें होणार नाहीं. कारण, शरीरसुस्थिति सर्वांस आवडती आहे. ह्या अगत्याच्या आज्ञांचें अज्ञान हेंच आपल्या शरिराच्या निकृष्टावस्थेचें मुख्य कारण आहे, असें मला वाटतें. शारीरशास्त्राच्या नियमांप्रमाणें बरोबर चालल्यानें शरीर दृढ व सशक्त होईल, ह्यांत अगदीं संशय नाहीं. तर शारीरशास्त्राच्या नियमांप्रमाणें चालणें म्हणजे काय, ह्याचें थोडक्यांत विवेचन आज करणें आहे. ह्या सद्वर्तनाचीं अनेक अंगें आहेत. त्यांत मुख्य अंगें तीन आहेत. हीं तीन अंगें नीट ध्यानांत धरून त्यांच्या अनुरोधानें चाललें असतां शरीरास्थिति उत्तम राहील व शरीरसामर्थ्य विपुल प्राप्त होईल, हें निःसंशय आहे. या सद्वर्तनाचीं आहार, व्यायाम व ब्रह्मचर्य हीं तीन मुख्य अंगें आहेत. आहार, व्यायाम व ब्रह्मचर्य ह्या त्रिकुटावर शरिराच्या

सुस्थितीची रचना झाली पाहिजे. हे तीन आधारभूत स्तंभ मजबूत असले, म्हणजे शरीर उत्तम प्रकारें सदृढ व सशक्त बनवितां येतें. ह्या तीन अंगांची आपल्यांत फार हेळसांड होते, म्हणून आपली हल्लींची शारीरिक स्थिति शोचनीय झाली आहे. योग्य आहार, यथाशक्ति व्यायाम, आणि यथाकाल ब्रह्मचर्यपालन झालें असतां शरिराची वृद्धि व शक्ति दर्शनीय होईल, यांत अगदीं संशय नाहीं.

डॉ० मो. गो. देशमुख. व्याख्यान.

---

## पाठ ८ वा.



### तीन पहारे.

कोणताही नवीन प्रघात रूढ होण्यापूर्वी त्याला तीन पहाऱ्यांतून जावें लागतें. पहिला पहारा मनाचा, दुसरा वाणीचा, आणि तिसरा आचरणाचा. यांपैकीं प्रत्येक पहाऱ्यांतून जात असतां त्याला 'मज्जाव' झाल्याखेरीज रहात नाहीं! लोकोत्तर पुरुषांची गोष्ट एकीकडे राहूं द्या; शेंकडा नव्याण्णव लोकांस नवीन कल्पना सुचत नाहीं, व सुचली तर तिला डोक्यांत थारा द्यावा, असें त्यांस वाटत नाहीं. सामान्य मनुष्याचें डोकें पूर्वापार चालत आलेल्या व लहानपणापासून अनेक द्वारांनीं संपादिलेल्या साधारण कल्पनांनीं ठिक्कीसारखें गच्च भरून गेलेलें असतें. त्यांत एखादी नवीन कल्पना शिरूं देण्यास त्याला अतिशय प्रयास पडतात. खचून भरलेल्या व सुतळीनें तोंड शिवलेल्या पोत्याचे दोनतीन टांके तोडून त्यांतील पायली दोन पायली धान्य बाहेर काढल्याशिवाय ज्याप्रमाणें त्यांत नवीन धान्य सांठविणें शक्य नसतें, त्याप्रमाणें वेड्यावांकड्या विचारांनीं ज्याच्या मनांतील तिळानतीळ जागा

व्यापून टाकली आहे, त्याच्या मनांतील वतनदार होऊन बसलेल्या कांहीं विचारांस हुसकून लाविल्याशिवाय तेथें नवीन विचारांची डाळ मुळींच शिजत नाहीं! कोणतीही गोष्ट आचारांत आणण्यापूर्वीं किंवा तिजविषयीं लोकांत चर्चा सुरू करण्यापूर्वीं ती चांगली आहे, अशी ज्याच्या त्याच्या मनांत खात्री झाली पाहिजे. एकान्तांत बसला आहे, स्वच्छ उदकाप्रमाणें किंवा आरशाप्रमाणें मनाचें दर्पण पुढें मांडिलें आहे, आणि त्यांत प्रतिबिंबित झालेल्या विचारांचें व कल्पनांचें हुबेहूब स्वरूप अवलोकन करीत आहे, अशा स्थितींत एखाद्या आगांतुक विचाराचें प्रतिबिंब त्या दर्पणांत पडूं देऊन त्याच्या रूपाची व आकाराची इतरांच्या रूपांशीं व आकारांशीं तुलना करण्यास भीति कशासाठीं वाटावी? अभ्यासाच्या खोलीचें दार लावून घेऊन मनाच्या कपाटाचीं दारें खुलीं टाकण्यास व त्यांतून पाहिजे त्या विचारास बाहेर पडूं देण्यास व पाहिजे त्यास आंत शिरूं देण्यास ज्याची छाती होत नाहीं, तो मनुष्य कुसक्या कम्पटापेक्षांही नादान होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण असलेच मनुष्य जगाच्या सांप्रत स्थितींत जेथें तेथें फार आढळतात; निदान हिंदुस्थानांत तरी ते असाव, त्यांपेक्षां फार फाजील आहेत; आणि हा फाजीलपणाच आमच्या चिरकालीन दैन्यावस्थेस आद्यकारण झाला आहे. स्वतंत्रपणें विचार करतां करतां तो बोलून दाखविण्याचें धैर्य येतें, व बोलतां बोलतां क्रिया करण्याचीही इच्छा उत्पन्न होते. मनाच्या देवडींतून जी कल्पना जोरानें निसटते, ती वाचेच्या किंवा कायेच्या देवडीवरील रखवालदारांस फारशी डगणारी नसते! मनांतल्या मनांत पाहिजे त्या विषयाविषयीं हवा तसला विचार करण्यास कशाचीही भीति नसतां पुष्कळांचीं मनें तसें करण्यास कां कचरतात कोण जाणे! बहुधा

त्यांना अशी दहशत वाटत असेल कीं, जे विचार लोकमतानें अश्लाध्य किंवा त्याज्य मानले आहेत, त्यांना आपण आपल्या मनांत आश्रय दिला, तर कदाचित् आपल्या मनांतील चांगल्या विचारांस ते हुसकून लावून त्यांची जागा बळकावतील; आणि या आगातुकांचें एकदां कां वर्चस्व झालें, म्हणजे आपल्या तोंडावाटे ते बाहेर पडूं लागतील, आणि न जाणों आपल्या आचरणावरही त्यांचा परिणाम होऊं लागून त्याबद्दल लोक आपणांस दूषण देऊं लागतील. नवीन विचारांविषयी मनुष्यांच्या मनांत जी दुर्मुखता दृष्टीस पडते, तिचें खरें कारण हेंच असेल, व त्यामुळें इतके लोक विचाराच्या कामीं गतानुगतिक होत असतील, तर आज आम्हांस जी स्थिति प्राप्त झाली आहे, ती अगदीं स्वाभाविकपणें प्राप्त झाली आहे, असें वाटल्यावांचून गत्यंतर नाहीं. कारण या देशांत अशाच लोकांचा भरणा फार आहे; या भरण्याचें प्रमाण असेंच राहणार असेल, तर या देशाचें डोकें वर निघण्याची आशा करणें शुद्ध वेडे-पणा होय. पृथ्वीवर आजपर्यंत जे सुखी व स्वतंत्र देश होऊन गेले, आणि आजमितीस ज्या देशांत तीं सुखें नांदत आहेत, त्या देशांत मधून मधून स्वतंत्रपणें विचार करणारे अनेक पुरुष होऊन गेले व होत आहेत, हें स्पष्टपणें दाखवितां येणार आहे. अशा पुरुषांकडून वेळोवेळीं बऱ्यावाइटाची चर्चा झाल्याखेरीज कोणत्याही देशाची प्रगति होण्याचा संभव नाहीं. अपसर्गकारी कारणांचा लय आणि उत्सर्गकारी कारणांची उत्पत्ति व अभिवृद्धि झाल्याशिवाय जिला आपण सुधारणा म्हणतों, ती कशी होणार ? ज्या गोष्टींपासून त्रास किंवा अडचण होते, त्या दूर करणें, आणि ज्यांपासून सोय व सौख्य होतें, त्या जवळ आणणें याचेंच नांव सुधारणा. तेव्हां चांगल्या गोष्टी कोणत्या व वाईट कोणत्या, याचा विचार करण्या-

सच जर कोणी तयार नसेल, व यदाकदाचित् तसें करण्यास कोणी प्रवृत्त झाला असतां त्याची विटंबना होईल, तर चांगल्या-वाइटाचें परीक्षण होणार कसें, आणि जें चांगलें असेल, तें लोकांपुढें येऊन तें त्यांच्या अंगीकारास पात्र होणार कसें? कोणतीही गोष्ट अंमलांत आणण्यापूर्वीं तिचा हवा तितका खल करण्यास आमची बिलकूल हरकत नाहीं; इतकेंच नाहीं, तर तसें झाल्याखेरीज सामान्य लोकांनीं कोणत्याही नवीन गोष्टीचा स्वीकार करूं नये, असें आमचें मत आहे. पण जेवढें जुनें तेवढें निर्दोष व चांगलें, असा आग्रह धरून बसून जर कोणी नवीन गोष्टींचें चिंतन व चर्चा करणार नाहीं, तर रूढ विचारांतले व आचारांतले प्रमाद दूर होणार कसे, व नवीन विचारांचे व आचारांचें चांगुलपण प्रस्थापित होऊन ते रूढ होणार कसे? आपल्या देशांतील लोकांस नवीन विचारांची जशी भीति वाटते, तशी दुसऱ्या कोणत्याही देशांतील लोकांस वाटत नसेल.

गो. ग. आगरकर. निबंध–संग्रह.

---

## पाठ ९ वा.



## श्रीरामकृष्णांची कामगिरी.

[ श्रीरामकृष्ण हे सत्पुरुष बंगाल्यांत होऊन गेले. हे ता. २० फेब्रुवारी सन १८३४ सालीं जन्मून ता. १६ ऑगस्ट सन १८८६ सालीं समाधिस्थ झाले आर्यधर्माचा झेंडा त्रिभुवनांत नाचविणारे श्रीमत्स्वामी विवेकानंद यांचे हे गुरु.]

या धर्मभूमीत काळीं काळीं जे सत्पुरुष उत्पन्न होतात, ते तत्त्वतः नवीन असें कांहींच सांगत नाहींत. श्रुतिस्मृतिपुराणोक्त तत्त्वेंच

ते कालानुसार नवीन तऱ्हेनें विशद करून सांगतात. तत्त्वें जुनीं, मांडणीमात्र निराळी. एकाच धान्याचीं अनेक रुचिकर व खमंग पक्वान्नें करण्यासारखेंच हें आहे. असें जरी आहे, तरी प्रत्येक सत्पुरुषाचा कांहीं तरी विशेष हा असतोच. परिस्थितीप्रमाणें कांहीं तत्त्वांवर तो विशेष जोर देऊन समाजाची बिघडलेली घडी पुन्हा नीट बसवून निघून जातो. या नियमाला अनुसरून श्रीरामकृष्णांनीं विशेष काय केलें? रजोगुणप्रधान पाश्चात्त्य ज्ञानमदिरेनें बेहोष झालेल्या आधुनिक सुशिक्षितांच्या डोळ्यांत त्यांनीं चरचरीत अंजन घातलें. त्याच्या प्रभावानें त्यांच्या डोळ्यांवरील धुंदी पार नाहींशी झाली. पाश्चात्त्य सुधारणेची किंमत कळली. ईश्वराचें अस्तित्व मान्य झालें. सगुणोपासनेचें महत्त्व लक्षांत भरलें. पुस्तकी विद्येचा पोकळपणा ध्यानांत आला. भक्तीच्या बळावर अगदीं निरक्षर मनुष्य कोणत्या दिव्य पदावर जाऊन बसतो, हें प्रत्यक्ष पहावयास मिळालें. एवंच, मनुष्यजन्माचें खरें साफल्य कशात आहे, हें आधुनिक सुशिक्षितांना प्रत्यक्ष दाखवून श्रीरामकृष्णांनीं त्यांचीं बहकलेलीं मनें स्थितीवर आणली. अशा रीतीनें धर्मसंस्थापनेचें कार्य त्यांनीं केलें. ही त्यांची एक कामगिरी; व राष्ट्रीय दृष्ट्या ही किती महत्त्वाची आहे, हें सनातन धर्माच्या परंपरेंत वाढलेल्या लोकांना सांगायला पाहिजे असें नाहीं.

आसुतेहिमाचल आपला देश आज एकछत्री अंमलाखालीं आहे. अशी स्थिति त्याला पूर्वीं कधींही आली नव्हती. हा योग अपूर्व आह. पण या अपूर्व योगावर सर्व हिंदवासीयांनीं सर्व देशांत एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न होण्याकरितां झटून प्रयत्न करणें, ही गोष्ट अत्यावश्यक आहे. अशी एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न झाल्यावांचून जें काय आपल्याला राजकीय बाबतींत करावयाचें आहे,

त्यांतलें कांही करितां येणार नाहीं. जूट हा राष्ट्राचा प्राण आहे. जिथे जूट नाहीं तिथे राष्ट्रही नाहीं. तेव्हां हिंदुस्थानाला राष्ट्रीयत्व येण्याला आपण सगळे जण एक आहों,—एका कुटुंबांतील माणसां-सारखे आहों,—या भावनेचा संचार देशाच्या चारही कोपऱ्यांत झाला पाहिजे. मग जूट आपोआप होईल; व जूट झाल्यावर काय साधणार नाहीं ? पण आपलेपणा उत्पन्न होऊन सर्वांची अशी जूट बनण्याला ज्या कांही अडचणी आहेत. त्यांत धर्मभेदाची अडचण फारच मोठी आहे. हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती व पारशी असे चार प्रमुख धर्मभेद या देशांत आहेत; शिवाय एका हिंदुधर्माचे शेंकडों पंथ असून त्या प्रत्येक पंथाच्या शाखा व उपशाखा आहेतच. बरें, या सगळ्यांचा परस्परांत विषमभाव आहे. हा विषमभाव दूर करण्याची खटपट करणें म्हणजे एकराष्ट्रीयत्वाचा पायाच भरणें आहे. हें काम श्रीरामकृष्णांनीं फारच उत्तम प्रकारें केलें. एका ठिकाणीं पोहोंचण्याला ज्याप्रमाणें अनेक मार्ग असतात, त्याचप्रमाणें भिन्न भिन्न धर्मांची अवस्था आहे. एका परमेश्वराकडे जाणारे ते केवळ अनेक मार्ग आहेत. त्यांत श्रेष्ठकनिष्ठभाव अगदीं नाहीं. निरनिराळ्या भाषांतले लोक एकाच पदार्थाला निरनिराळीं नावें देतात; तेवढ्या-वरून त्या मूळ पदार्थांत जसा बदल होत नाहीं, तसेंच परमेश्वराचें आहे. सगळ्यांचा परमेश्वर एकच आहे. त्याला निरनिराळ्या धर्मांचे लोक निरनिराळीं नांवेंमात्र देतात. इत्यादि सर्व धर्मांच्या समतेचीं तत्त्वें सर्व लोकांच्या मनांवर ठसविण्याचा श्रीरामकृष्णानीं, संधि सांपडली तेथें, जोराचा प्रयत्न केला; व जो सूक्ष्म दृष्टीनें पाहील, त्याला तो प्रयत्न यशस्वी झाल्याचीं चिन्हेंही स्पष्टपणें दिसतील; तेव्हां सर्व धर्मांचें समत्व विशेषेंकरून लोकांच्या मनांवर ठसविणें, ही श्रीरामकृष्णांची दुसरी राष्ट्रीय कामगिरी होय. त्यांच्या एकंदर

कामगिरींत ही कामगिरी विशेष महत्त्वाची होय, असें म्हणावयाला हरकत नाहीं.

ज्ञानयोग, कर्मयोग व भक्तियोग असे परमेश्वरप्राप्तीचे तीन मुख्य मार्ग आपल्या शास्त्रांत सांगितले आहेत. त्यांत संसारी जनांनीं कोणता अनुसरावा, हें स्पष्टपणें सांगण्याचें काम श्रीरामकृष्णांनीं फारच ठांसून केलें आहे. ज्ञानमार्ग व कर्ममार्ग यांचें काठिण्य वेळोवेळी दाखवून संसारी जनांनीं भक्तिमार्गाचेंच अवलंबन करावें, असें त्यांनी आपल्या अधिकारी वाणीनें सांगितलें आहे, व त्यांत तथ्य नाही असें कोण म्हणेल बरें? वेदान्ताच्या व कर्मयोगाच्या गोष्टी संसारी जनांनी बोलूंच नयेत, असें त्यांनी अनेक ठिकाणीं प्रतिपादिलें आहे. वेदान्ती शब्दाचा उगीच काथ्या कुटणारांनीं, किंवा "कर्मण्येवाधिकारस्ते" असें वेळी अवेळी म्हणणारांनीं हा परमहंसांचा उपदेश लक्षांत घेण्यासारखा आहे. माझ्या दृष्टीनें ही त्यांची तिसरी कामगिरी होय. भक्तिमार्ग हा सोपा असल्यामुळें संसारी जनांनीं तोच घ्यावा, असें जरी परमहंसांनीं म्हटलें आहे, तरी तो सोपेपणा सापेक्ष आहे, हें विसरतां कामा नये. ज्ञानमार्ग व कर्ममार्ग यांच्याशीं तोलून पाहिला असतां तो सोपा आहे. पण एरवीं तो सोपा नाहीं. हें नवविधा भक्तींचें अल्पही विवरण ज्यांनीं वाचलें असेल, त्याना सांगावयाला नकोच.

कमळ फुलल म्हणजे भ्रमरांना आमंत्रणाची जरूर नसते. ते त्याच्या परिमलानें मोहित होऊन त्याच्यावर आपोआप झडप घालितात. तद्वत् श्रीरामकृष्णांच्या विज्ञानाचें कमल ज्या वेळीं विकसित झालें, त्या वेळी त्याच्या परिमलानें मोहित होऊन अनेक मुमुक्षु जन त्यांच्याभोंवतीं गोळा झाले, व कृतार्थ होऊन गेले. आपल्या गुरुदेवाचें प्रत्यक्ष उदाहरण पाहून खऱ्या सुखाचा मार्ग

त्यांनीं तेव्हांच उचलला. संसारावर लाथ मारून धर्म-प्रसाराचें काम करण्यांत आपलें आयुष्य वेंचण्याचा, व अशा स्तुत्य रीतीनें आपल्या गुरूचें स्मारक करण्याचा विडा अनेक शिष्यांनीं उचलला. त्यांनीं आपल्या प्रिय गुरूचीं देवळें बांधलीं नाहींत, किंवा त्याचे पुतळेही उभारले नाहींत !

जी कामगिरी करण्यांत थोर पुरुष आपलें आयुष्य खर्चून कृतार्थ होऊन जातात, तीच कामगिरी त्याच जोमानें पुढें चालविणें हेंच थोर पुरुषांचें खरें स्मारक होय त्यांच्या शिष्यांनीं 'रामकृष्णमिशन' नांवाची लोकोपयोगी संस्था स्थापन करून व आपण संन्यस्त वृत्तीनें राहून परोपकारार्थ देह झिजविण्याचें व लोकांना धर्मोपदेश करण्याचें पवित्र कार्य उत्तम प्रकारें चालविलें आहे. मद्रास इलाख्यांत व उत्तर-हिंदुस्थानांत या मिशनच्या अनेक शाखा आहेत. त्यांनीं शाळा चालविल्या आहेत, गरिबांकरितां अनेक फुकट दवाखाने चालविले आहेत, वाचनालयें उघडलीं आहेत, सेवाश्रम स्थापन केले आहेत. अशा अनेक बाजूंनीं देशकल्याणाचें कार्य त्यांनीं चालविलें आहे. अग्नि, पूर, भूकंप, प्लेग, दुष्काळ अशा आपत्तींत सांपडलेल्या 'नारायणांना' सर्व प्रकारें मदत करण्याला या मिशनचे संन्यासी हाल-अपेष्टा भोगूनही तयार असतात. मिशनच्या या अनेकांगी कामगिरीबद्दल लोक तर त्याची वाहवा करून त्याला यथाशक्ति द्रव्य-साहाय्य करीत आहेतच, पण सरकारी अधिकाऱ्यांनीं-ही या कामगिरीबद्दल वेळोवेळी प्रशंसापर उद्गार काढिले आहेत. आपल्या गुरूचें नुसतें देऊळ बांधून तेथें टाळ कुटीत बसण्या-पेक्षां गुरुदेवाच्या ऋणांतून अंशतः मुक्त होण्याचा सगळ्यांत हा उत्तम मार्ग आहे, हें कोणीही सांगेल. 'जे कां रंजले गांजले' इत्यादि अभंगवाणीनें श्रीतुकाराममहाराजांनींही भगवद्भक्तीचा हाच

मार्ग लोकांना दाखवून दिला आहे, हें प्रसिद्धच आहे. तात्पर्य, निष्क्रिय भक्ति निदान हल्लींच्या देशाच्या परिस्थितीत तरी देशाला घातक आहे. तेव्हां भक्तीला असें वळण दिलें पाहिजे की, तिनें उत्तम समाजसेवा होऊन परंपरेनें राष्ट्रोद्धाराच्या कार्याला मदत होईल. श्रीरामकृष्णांचे अनुयायी यांनीं आपल्या भक्तिमार्गाला अशा प्रकारचें समाज-हित साधक वळण दिलें, याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत. महाराष्ट्रांत असें कांही तरी व्हावें, अशी इच्छा असल्या-मुळेंच मिशनच्या या नमुनेदार कामगिरीचा येथें उल्लेख केला आहे.

कृ. गो. किनरे. रामकृष्ण-वाक्सुधा-प्रस्तावना.

---

## पाठ १० वा.



### धावडशीकर स्वामींचा मठ.

नित्यनियमाप्रमाणें वैशाखमासी एके दिवशीं प्रातःकाळी समाधि-विसर्जन करून स्वामी आपल्या शिष्यवर्गास पाठ सांगत बसले होते. अहाहा! काय त्या स्थलाचें त्या वेळचें वर्णन करावें! मठांतील भूमिका झाडसारव करून स्वच्छ केल्या आहेत; मठाच्या आंत व बाहेर अशुचि किंवा अमंगल पदार्थांचें नांव नाहीं. त्याच्या-सभोंवतीं दर्भ, दुर्वा, तुळशी व फुलझाडें लावलेलीं आहेत. त्यांज-वर वसंतऋतु स्वेच्छ क्रीडा करीत आहे. मठाच्या समोर एक लहानसा ओढा असून त्याचें स्वच्छ व निर्मळ पाणी झुळझुळू वाहात आहे. बालार्काचे आरक्त किरण मठद्वारांतून स्वामींच्या पायांपर्यंत पसरले आहेत. व्याघ्रांबरावर हे सुवर्णकांति महापुरुष पद्मासन घालून अधिष्ठित झाले आहेत. त्यांनीं अंगास चर्चिलेल्या भस्माचा

आणि दोहों बाजूंस केळीच्या पानांवर ठेविलेल्या तुळशीफुलांचा घमघम सुवास सुटला आहे. गळ्यांत, हातांत व दंडांत रुद्राक्षांच्या माळा रुळत आहेत. हातांत स्मरणी हालत आहे. कटीस कौपीन आणि अंगावर काषायवस्त्रें परिधान केलीं आहेत. स्नानसंध्येचीं काष्ठमय पात्रें मांडलेलीं आहेत. लाक्षारसानें रंगविलेला लाल कमंडलू स्फटिकवत् स्वच्छोदकानें ओतप्रोत भरलेला आहे. स्वामींच्या सन्मुख दर्भासनें घालून ठेविलीं आहेत. त्यांजवर स्नानसंध्यादि ब्रह्म-कर्म आटपून शिष्यवर्ग पुढें पोथ्या सोडून बसला आहे इतर ब्रह्मवृंद, भक्तजन व श्रोतृमंडळ यांचीही दाटी झाली आहे. स्त्रियांनीं आंत प्रवेश करूं नये, अशी मठाची मर्यादा असे. त्याप्रमाणें त्या मठद्वारांतून पायांचें दर्शन घेत आहेत. दोन्हीं अंगांस वेद, शास्त्रें, पुराणें, भाष्यें, यांच्या पोथ्या भगव्या वेष्टनांत गुंडाळून पाटा-वर एकीवर एक रचून ठेविल्या आहेत. स्वामींच्या अग्रभागीं सामवेदांतर्गत छांदोग्योपनिषदाची पोथी असून तींतून 'एकमेवा-द्वितीयम्' या महावाक्यावर त्यांचें व्याख्यान चाललें आहे. त्यांची भाषण करण्याची आणि उपपादन करण्याची सर्वोत्कृष्ट शैली पाहून श्रोते चित्रासारखे तटस्थ बसले आहेत. स्वामींची मधुर वाणी उपदेशामृत स्रवत आहे, आणि उत्कंठित श्रोत्यांचे तृषित कान त्याचें पान करण्यास्तव आ पसरून बसले आहेत. त्या समयीं त्यांस असें वाटे कीं, सेवकजनांवर अनुग्रह करण्यासाठीं स्वामींच्या जिव्हाग्रीं शारदादेवी, पार्श्वभागीं ऋद्धिसिद्धि आणि अग्रभागीं वेदश्रुति ह्या साक्षात् आपले वरदहस्त पुढें करून बसल्या आहेत ! वा ! काय या मठाची योग्यता ! हें रम्य स्थळ केवळ प्रतिबदरिकाश्रमच होय. संसारदुःखानें गांजलेले, नाना विपत्तींनीं रंजीस आलेले आणि महदपराध करून संतप्त झालेले पापात्मे, यांस या मठांत येण्याबरोबर

स्वस्थितीचा व स्वकृत कर्मांचा खेद व पश्चात्ताप होऊन ते म्हणत, " जळो तो संसार ! पुरे ती यातायात ! आग लागो त्या धनाला ! आतां सर्वसंगाचा परित्याग करून या वैराग्यनिधि मठांतच निरंतर वास करूं."

ना. वि. बापट. पाहिले बाजीराव पेशवे.

---

## पाठ ११ वा.



### निःस्पृहस्य तृणं जगत्.

भुखानकवि हे दिल्लीस पादशहापाशीं त्यांचे बंधु चिंतामणकवि मनोरंजन करून होते, त्यांचे घरीं असतां, 'घरांतच राहतात', असें कोणी घरच्यानें म्हटलें. तेव्हां, 'आम्हांस यवनांचें अन्न भक्षावयाचें नाहीं', म्हणून निघाले. ते कमाहूचे पाहाडांतील राजे यांजकडे जाऊन चतुरपणें त्यांचें मनोरंजन करीत होत्साते राहिले. त्यानें यांचा बहुत सन्मान करून लक्ष रुपये दक्षिणा घरास जाण्यास निरोपसमयीं दिले, आणि गर्वेंकरून भाषण केलें कीं, 'ऐसा दाता पृथ्वीवर दुसरा कोण आहे ?' असें बोलला. तें कवीनें ऐकून त्याजवर तत्काळ उत्तर केलें कीं, 'ऐसे दाते शतंभीष्म बहुत आहेत; परंतु ऐसा याचक कोणी तुम्हीं पाहिला नसेल, कीं लक्ष रुपये तुमचे गर्वोक्तीनें दिलेले तुच्छ समजून या द्रव्यास स्पर्श करावयाचा नाहीं'. असें म्हणून ( कवि ) निघाले, ते दक्षिणप्रांतीं शिवाजीमहाराज यांची कीर्ति श्रवण केली होती, तेथें येऊन महाराजांची भेट त्यांनीं घेतली, आणि महाराजांस विचारलें कीं, 'यवनांचा शत्रु कोणी असेल त्याजपाशीं आम्ही राहणार'. तेव्हां महाराजांनीं उत्तर केलें कीं, 'मी यवनांचा काळ आहें'. त्यावरून महाराजां-

पाशीं राहून मनोरंजन बहुत प्रकारें कविता करून करिते झाले; आणि महाराजांचे प्रताप पाहून नूतन ग्रंथ 'शिवभूखन' म्हणून कविताबद्ध करिते झाले. महाराजांची मर्जी बहुत प्रसन्न क्षणक्षणाचे ठायीं करिते झाले. ऐसी वाहिवाट पांचचार वर्षें झाली. नंतर महाराजांची आज्ञा घेऊन दिल्लीस घरास जाण्यास निरोप घेतला. महाराजांनीं भूषणें, वस्त्रें, हत्ती, घोडे, जवाहीर, लक्षावधि रुपये देऊन पुन्हा येण्याविषयीं आग्रह केला. त्यांनींही, 'लवकर येतों'. असें मान्य करून गमन केलें. दिल्लीस गेल्यावर तें वर्तमान पादशहास समजलें कीं, भुखानकवि शिवाजीराजे यांजकडून सन्मान पावून आले आहेत. असें ऐकून त्यांचे बंधु चिंतामणकवि यांस आज्ञा केली कीं, 'तुमचे बंधु भुखानकवि येथें आले आहेत, त्यांस भेटीस आणावें'. त्याजवरून चिंतामणकवि यांनीं सांगितलें कीं, 'आमचे यजमान आपणांस बोलावतात'. ते समयीं भुखानकवि यांनीं उत्तर केलें कीं, 'आमचे यजमानाचे हे शत्रु होत, त्यांचें दर्शन आम्हांस कशाला पाहिजे? कारण, आमचे मुखांतून शिवाजीमहाराजांच्या प्रतापावांचून दुसरें निघावयाचें नाहीं. त्या योगेंकरून यांस क्रोध येईल'. तेव्हां चिंतामणकवि यांनीं बहुत प्रकारें सांगितलें; आणि पादशहास अर्ज केला जे, 'कवि दर्शनास येतील, परंतु शिवाजीमहाराज यांचे प्रताप वर्णितील. आज्ञा झाली तर आणतों'. तेव्हां बादशहानें घेऊन येण्याविषयीं आज्ञा केली. त्याजवरून चिंतामणकवि भुखानकवि यांस घेऊन गेले; आणि भेट झाली. ते वेळीं पादशहाचा हुकूम झाला कीं- 'कांहीं वर्णन करावें'. तेव्हां यांनीं सांगितलें कीं, 'आम्ही वर्णन वीररसपर करूं, ते समयीं आपला हात मिशांवर जाईल'. ते समयीं बादशहा बोलले जे, 'आमचा हात मिशांवर न गेला असतां शिरच्छेद करूं'. तेव्हां भुखानकवि यांनीं वीररसपर

कविता म्हणण्यास आरंभ केला. त्यांत आधीं महाराजांचा प्रताप वर्णिला. तेव्हां पादशहानें, 'आम्ही सार्वभौम. सर्व राजे आम्हांस करभार देतात, तेव्हा ते मांडलिक राजे असें वर्णावें', म्हणून आज्ञा केली. त्यावरून पृथ्वीतील सर्व राजे पुष्पवृक्ष होत आणि पादशहा भ्रमर, सर्वांचा मधु सेवन करणारे, असें वर्णन करून त्यांत शिवाजीमहाराज हे चंपकवृक्ष म्हणून वर्णिलें; कारण, चंपकवृक्षास भ्रमर स्पर्श करीत नाहीं. नंतर पादशहानें, 'मिशांवर हात जाणारें वीररसपर कवन वर्णावें', म्हणून सांगितलें. तेव्हां सहा कवितांत उत्कृष्ट वर्णन केलें. सातवे कवितेंत पादशहाचा हात आवेशेंकरून अकस्मात् मिशांवर जाता झाला तें पाहून कवित्व आटोपिलें; आणि पादशहाही बहुत खूष झाले; आणि सन्मान, बक्षीस, वस्त्रें, जवाहीर, हत्ती दिले, गौरव केला. हें वर्तमान महाराजांकडील वकील यानें लिहिलें. त्यावरून महाराज बहुत प्रसन्न होऊन त्यास येण्याविषयीं आज्ञा पाठवून आणविलें. याप्रमाणें महाराजांनी एक एक मनुष्य रत्नाप्रमाणें परीक्षा करून वाढविलें व संग्रह केला; तसेंच, नानाप्रकारचे गुणीजन यांचा संग्रह केला.

म. रा. चिटणीस. शिवाजीचे सप्तप्रकरणात्मक चरित्र.

---

## पाठ १२ वा.



## इतिहासापासून फायदे.

**भाग १ ला.**

इतिहासाचा उपयोग काय ? हा प्रश्न दिसतांच असमंजस दिसून कोणी करीत नसतीलसें प्रथमतः वाटतें. कां कीं, दुसरा कोणताही उपयोग नाहीं म्हटला, तरी मनुष्याच्या मनास अत्यंत स्वाभाविक

अशी जी जिज्ञासा ती तरी त्याच्या योगानें तृप्त होते. हाच काय थोडा उपयोग आहे? हा अगदीं निदानपक्षीचा उपयोग सांगितला. दुसरे जे इतिहास वाचल्यापासून मोठमोठे नफे आहेत, ते पुढें मांगण्यांत येतीलच. असो. पण असें असतांही इतिहासांत ज्यांस कांहीं एक अर्थ दिसत नाही, जे त्याचा तिरस्कार करतात, असे मनुष्य आढळतात ज्यांच्या मनांत ज्ञानानें कधीं प्रवेश केला नाहीं, किंवा तो व्हावा असा ज्यांविषयी ईश्वरीसंकेतच दिसत नाहीं, अशांनीं वरील मतें प्रगट केल्यास कांहीं नवल नाहीं. पण नवल हें कीं, ज्यांच्या ठायीं विचारशक्ति चांगली प्रखर दृष्टीस पडते, जे समंजसतेचा मोठा आव घालतात, अशांमध्येंही इतिहासावरची अप्रीति पुष्कळ वेळा दृष्टीस पडते. इंग्रज लोकांतला प्रसिद्ध ग्रंथकार जॉनसन हा अशाविषयीचें एक मोठें उदाहरण आहे. एकंदर इतिहासाविषयी, व विशेषत: प्राचीन इतिहासाविषयीं हा आपला तिरस्कार वारंवार प्रगट करीत असे. ह्या थोर ग्रंथकाराच्या ज्या कित्येक विलक्षण समजुती होत्या, व जे हेकडपणाचे कित्येक ग्रह त्याच्या मनास साऱ्या जन्मभर खिळून राहिले होते, त्यांपैकींच वरचा होय. असो. आपणांमध्येंही असे पुष्कळ म्हणणारे सांपडतील कीं "अहो! मागील काळाशीं आपणांला काय करावयाचें आहे? ते लोक गेले, मेले, पार झाले. आतां त्यांची कर्मकटकट आपणांस कशाला हवी? बाजीरावानें दिल्ली घेतली, नाना फडनविसानें अशी अशी युक्ति लढविली, आपणांला त्यांत काय लभ्य आहे? सध्यां चाललें आहे तें खरें! ज्यांत आपला कांहीं नफा नाहीं व तोटाही नाहीं, अशा मागच्या गोष्टी मिळवायाच्या, जुने लेख पहावयाचे वगैरे विनाकारण जी यातायात करावयाची, तींत काय अर्थ? साहेबलोकांस कांहीं उद्योग नसतो, त्यांचीं हीं कामें! असा

रिकामा उद्योग कोणीं करीत बसावें? त्यांत निष्पन्न काय?" खरेंच! जीवमान आहे तोंवर खाऊन घ्यावें, पिऊन घ्यावें, दुपारची वामकुक्षी चुकूं देऊं नये; संध्याकाळच्या खाशा वेळीं शानदारसा पोशाक करून बाहेर पडावें; मग गंध्याचें दुकान, किंवा (विद्येचा शोक अथवा सुधारणेंत पुढारीपणा दाखविणें असल्यास) लायब्ररी, अशा ठिकाणीं चार घटका साऱ्या जगाच्या उलाढाली करून नंतर रमत रमत घरीं यावें! अशा प्रकारचा स्तुत्य आयुष्यक्रम ज्यांनीं निरंतर अबाधित चालवावा, अशा थोर लोकांपुढें बाजीराव काय आणि मोठा शिकंदर बादशहा झाला म्हणून तो तरी काय!! जन्मास आल्याचें चीज जर कोणास करून घेणें असेल, तर त्यांनीं अशाच सद्गुरूचे पाय धरावे; कां कीं, एकंदर तत्त्व असें यांनींच ओळखलें. मग काय उशीर? तुकारामबोवा म्हणतात, अशांची थोरवी काय वर्णावी!

**आपणांसारिखे करिती तात्काळ।**
**नाहीं काळ वेळ तयांलागीं ‡॥**

असो. तर याप्रमाणें इतिहासास नाक मुरडणारे वर सांगितलेले दोन प्रकारचे लोक असतात. एक वरचे वामकुक्षीवाले. यांच्या मतांत अर्थातच मुळी अर्थ नाहीं; व यांचें मत कोणीं न मानलें, तर त्यांतही त्यांस मोठी मानहानि झालीशी वाटणार आहे, असेंही नाही. यांचें चमचमीत भोजन, वामकुक्षी, तंबाखू, गप्पा, यांस जोंपर्यंत कांहीं हरकत होत नाहीं, तोंपर्यंत इतर कशासही ते मोजीत नाहींत! हा एक वर्ग; व हा फार मोठा आहे, यांत संशय

‡ वरचा अभंग कवीनें असा व्याजोक्तीनें लिहिलेला नाहीं. त्याचा मूळचा अर्थ सरळच आहे. पण प्रस्तुतसारख्याच प्रसंगीं लोक तो भाषणांत आणतात हें बहुधा सर्वांस माहीत असेलच.

नाहीं. दुसरा वर्ग जॉनसनसारख्या दुराग्रही व स्थूलबुद्धि लोकांचा. यांचीं मतें इतर विषयांवर केवढींही मान्य असलीं, तरी ज्यांवर त्यांनीं कधीं व्यासंग केला नाहीं, व ज्यांचा आस्वाद घेण्यास त्यांची स्थूलबुद्धि स्वभावतःच समर्थ नाहीं, अशा विषयांवरचीं त्यांचीं मतें असमंजस मानण्यास कांहीं हरकत नाहीं. कित्येक इंग्लिश कवींच्या ग्रंथांवर दिलेले अभिप्राय जॉनसनचे जितपत खरे आहेत, किंवा गाण्याबजावण्यावर त्यानें आपलें मत दिलें असतें, तर तें जितपत यथार्थ असण्याचा संभव होता, तितपतच त्याचें प्रस्तुत विषयावरचें मत ग्राह्य होय. असो. तेव्हां, ह्या दोन्ही लोकांचे आक्षेप मनास आणण्यासारखे नाहींत. आतां इतिहासाचे उपयोग कोणकोणते आहेत, याविषयीं लिहितों.

एक तर वर मांगण्यांत आलाच आहे. कोणता ? तर जिज्ञासातृप्ति. ईश्वरानें ही मनोवृत्ति मनुष्याच्या ठायीं मोठी प्रबळ ठेविली आहे. हिच्या अंगचा जोर कितपत आहे, हें सुधारणेच्या वेळीं चांगलें दिसून येत नाहीं. कां कीं, अशा काळीं मनुष्याच्या मनाची मूळची कळा त्याच्या शरिराप्रमाणें लोकाचारांखालीं पुष्कळ दबली जाते; म्हणजे मूळची जशी तिची स्वेच्छाप्रवृत्ति असते, तशी पुढच्या काळीं राहात नाहीं. पहा बरें; मनुष्याचा अंतरालांतील गोलांशीं काय संबंध आहे ? पृथ्वी फिरत असली, कीं सूर्य फिरत असला, चंद्र स्वयंप्रकाश असला, कीं परप्रकाशित असला, ग्रहमालेचा मध्य पृथ्वी असली, कीं सूर्य असला, तारे कितीही असले, कांहीं असले, तरी त्यांत मनुष्याचें काय बरें हिताहित आहे ? मागें सूर्य फिरतो असें लोक मानीत होते, आतां पृथ्वी फिरते, असें लोक मानतात; म्हणून मनुष्यें काय रोग्यांचीं निरोगी झालीं ? कीं दरिद्र्यांचीं संपन्न होऊन बसलीं ? एवढी उठाठेव करून, दुर्बिणीची कल्पना

काढून, नानाप्रकारचीं गणितें करून, निरनिराळीं प्रमाणें एकत्र करून ज्योतिष्यांस किंवा जगास कोणता फायदा झाला ? खरें आहे, एका कवडीचाही झाला नाहीं ! हाच उपदेश सर्व मनुष्यांत शहाणा म्हणून जो निवडला गेला, त्या सॉक्रेटिसानें आपल्या शिष्यांस व सर्व जगास केला. पण एवढ्या महापंडिताच्या सांगण्यानेंही लोक राहिले आहेत काय ? सूर्यबिंबाचा चंद्रानें ग्रास केला, किंवा शुक्र सूर्याच्या आड आला, कीं लोक कोणी हिंदुस्थानांत, कोणी अमेरिकेंत, कोणी दक्षिण समुद्रांत, असे धाव घेतातच कीं नाहींत ? जिवावर उदार होऊन केवळ जिज्ञासाप्रेरित होत्साते तोफेच्या गोळ्यांत बसून चंद्रलोकावर स्वारी करतात कीं नाहींत[1] ? असो. तेव्हां मनुष्याचे ठायीं जिज्ञासा ही मोठी उच्छृंखल आहे. हिचा मुळींच अभाव असता, तर जगाच्या मूळच्या स्थितींत आज फारसा फरक पडता ना, हें उघड आहे. असो. तेव्हां सांगावयाचें काय कीं, अंतरालांतील दूरदूरच्या गोलांविषयीं जर मनुष्याच्या मनांत जिज्ञासा उत्पन्न होते, तर ज्या गोलावर तो वास करतो, त्यावर निरनिराळ्या ठिकाणीं काय काय वृत्तान्त घडले, ते समजून घेण्याची त्यास उत्कंठा होणार नाहीं काय ?

वर सांगितलेला इतिहासाचा उपयोग सर्वांत पहिला, साधा व लहान असा होय. तरी इतिहासाची प्रवृत्ति मुळारंभीं पडण्यास तोच कारण आहे, असें दिसून येईल. त्याहून वरचढ दुसरा उपयोग म्हटला म्हणजे नीतिबोध. सज्जनांचा जय व दुर्जनांचा अपजय, असेंच जरी नेहमीं इतिहासांत आढळत नाहीं, तरी एकंदरींत

---

१ हें वर्तमान हल्लीं कित्येक पत्रांतून समजतें. तें खरं असेलसें बहुधा वाटत नाहीं. तरी मनुष्याचें धाडस व जिज्ञासा हीं काय करतील, याचा नेम सांगवत नाहीं.

परिणाम असाच दृष्टीस पडतो. शिवाय दुसरें हेंही लक्षांत येतें कीं, भलेपणानें वागूनही जरी नेहमीं परिणाम लागतोच असें नाहीं, तरी पण दुष्टपणा केल्यानें तर तो नाहींच नाहीं लागत ! मनुष्याचें सर्व प्रकारें हित होणें तें केवळ याच मार्गानें व्हावयाचें; कुमार्गाने तें व्हावें, हें वस्तुगत्याच शक्य नव्हे. याप्रमाणेंच मोठ्या प्रसंगींही ज्यांचे धैर्यबळ ढळत नाही, असे थोर पुरुष तर विपत्तीतही जें सुख पावतात, तें दुष्ट व कुत्सित मनांच्या लोकांस मोठ्या भाग्यशाली-पणांतही लाधत नाहीं. सारांश, या संसाररूप महानाटकांत आज-पर्यंत कोणकोणती पात्रें आपआपली भूमिका आटपून निष्क्रमण करती झाली, हें चित्तावर चांगलें ठसलें असतां चांगला मार्ग कोणता, वाईट कोणता, हें सुज्ञ मनुष्यास सहज निवडतां येतें. खरें सुख, खरें समाधान, खरी प्रतिष्ठा कशांत आहे, हेंही कळूं लागतें. सहस्रावधि मनुष्यांचा अनुभव थोडक्यांत त्यास आलासा होतो; त्याच्या योगानें त्याची दृष्टि फांकते आणि तो जर तसा समजुतीचा व दृढनिश्चयाचा असेल, तर लौकरच तो कोणाचा तरी कित्ता उचलून, खलाशी लोक ध्रुवाच्या ताऱ्यावरून जसे नौकेचें नियमन करितात, त्याप्रमाणें तो त्या निवडलेल्या पुरुषाच्या चारित्रावर सारखी नजर ठेवून तदनुरूप आपलें आयुष्यक्रमण करतो. याप्रमाणें इतिहासा-पासून सदुपदेश प्राप्त होतो; व म्हणूनच एका थोर ग्रंथकारानें 'इतिहास हा प्रत्यक्ष उदाहरणें दाखवून केलेला बोध होय', असें यथार्थ म्हटलें आहे.

---

## पाठ १३ वा.



### इतिहासापासून फायदे.

#### भाग २ रा.

इतिहास हा मनास उन्नति व प्रसन्नत्वही देणारा आहे. म्हणजे त्याच्या निरंतर वाचनानें चित्त शांत व स्थिर राहतें आणि थोर होतें. याचें कारण उघडच आहे. एका चतुर ग्रंथकाराचें असें वचन आहे कीं, 'इतिहास म्हणजे या जगांत जे महापुरुष होऊन गेले त्यांचीं चरित्रें आहे'. म्हणजे अशा पुरुषांनीं जीं कृत्ये केलीं, त्यांनींच इतिहास भरला आहे; तीं काढून निराळीं केलीं. तर त्यांत काय उरेल ? अर्थात् कांही नाहीं. तेव्हां आजपर्यंत या जगतीस भूषणभूत जीं रत्नें निरनिराळ्या देशांत निपजलीं, त्यांचा सहवास जर अक्षयीं घडेल, तर त्यापरता लाभ कोणता ? प्लूटार्क नामेंकरून एक नामांकित इतिहासकार ग्रीस देशांत होऊन गेला. त्याचा अत्यंत प्रसिद्ध व सर्व जगाचा प्रीतिपात्र झालेला असा ग्रंथ 'थोर लोकांचीं चरित्रें' या नांवाचा आहे. त्यांत त्यानें ग्रीस व इटाली देशांत जीं मोठमोठीं प्रकरणें होऊन गेलीं, त्यांचा वृत्तान्त लिहिला आहे. त्याच्या प्रस्तावनेंत त्यानें असें म्हटलें आहे कीं, "मला या लोकांच्या उज्ज्वल चरित्रांचें मनन केल्यापासून जो लाभ झाला तो सांगतां पुरवणार नाहीं. जेव्हां जेव्हां कांहीं अनुचित कृत्याकडे माझ्या मनाचा कल होई, किंवा सदाचरणाविषयींचा उत्साह कमी झालासा वाटे, तेव्हां तेव्हां मी यांचीं चरित्रें वाचीं; तेणें-करून मला पुनः हुषारी वाटे." असो. सत्समागमाचा महिमा असाच आहे. आपल्या मराठी व संस्कृत कवींनीं या महिम्याविषयीं निरनिराळ्या कथानकांनीं व दृष्टान्तांनीं पुष्कळ लिहिलें आहे. या दृष्टान्तांपैकीं

तुकारामादि मराठी कवींची फार आवडती जी 'लोहपरिसाची' उपमा, ती या ठिकाणीं फार सुंदर व समर्पक होय. लोखंड मूळचें किती हलकें असतें व दिसण्यांत किती भिकार दिसतें, पण परिसाशीं वरच्या वर संघटन जसजसें घडेल, तसतसें त्याचें सर्व धातूंत श्रेष्ठ व यथार्थनाम जें सुवर्ण, तें बनत जातें! आणि वस्तुतः मनुष्य कसाही चांगला-वाईट निपजणें, हें पुष्कळ अंशीं ज्या ज्या स्थिति त्यास प्राप्त होत जातात, त्यांचेंच फल असतें. कोणी कोणी तर तें सर्वथाच त्यांचें फल होय, असेंसुद्धां म्हणतात. इंग्लंडांत सुमारें दोनशें वर्षांपूर्वीं लॉक नामेंकरून एक मोठा विख्यात तत्त्वज्ञ होऊन गेला; त्यानें हें मत स्थापिलें. या मताच्या लोकांचें म्हणणें असें आहे कीं, मनुष्याचें मन हें आरंभीं एखाद्या स्वच्छ आरशाप्रमाणें किंवा कोऱ्या कागदासारखें शुद्ध असतें. त्यास प्राक्तनसंस्कार म्हणजे आधींचे बरेवाईट विकार कोणतच घडलेले नसतात. ते पुढें ज्याच्या त्याच्या स्थितिविशेषानुरूप त्यास जडून त्याचा कल चांगल्याकडे किंवा वाइटाकडे फिरतो. असो. हे कांहींही असो, पण इतकें खचित आहे कीं, या पुढच्या स्थिती-प्रमाणें मन बहुधा चांगलेवाईट विकार पावत असतें. संस्कृतांत एक वाक्य आहे.—

अतृणे पतितो वन्हिः स्वयमेवोपशाम्यति ।

'गवताशिवाय एखाद्या जाग्यावर जर अग्नि पडला, तर तो आपोआपच विझला जातो'. याप्रमाणेंच मनुष्याचे चांगलेवाईट गुण पूर्णपणें विकास पावण्यास तशा प्रकारची स्थिति त्यास अनुकूल असावी लागते. पहा बरें, सध्यां आपल्या देशांत शिवाजीसारखा किंवा हैदरासारखा राज्यकर्ता कां निपजत नाहीं! किंवा नाना फडनविसासारखा राजकारणी पुरुष कां होत नाहीं? कारण

उघडच आहे कीं, तसे गुण असले, तरी त्यांचा विकास होण्यास हल्लीच्या स्थितींत मुळींच अवकाश नाहीं. असो. तेव्हां मनुष्याच्या अंगच्या गुणांचा उत्कर्ष व्हावयास तशी स्थिति त्यास अनुकूल असावी लागते.

इतिहासापासून चवथा उपयोग, मनाचें रंजन. निरनिराळ्या देशांत घडलेले वृत्तान्त समजल्यानें व त्यांचें मनन केल्यानें मागें सांगितल्याप्रमाणें जिज्ञासावृत्तीचें समाधान तर होतेंच; पण जर ते इतिहास तशा शैलीनें लिहिले असतील, तर त्यांच्या वाचनानें वाचकांस आल्हादही होईल. असे इतिहासग्रंथ ग्रीक, ल्याटिन, फारशी या भाषांत आहेत; तसेच अलीकडे झालेले ह्यूम, गिबन, मेकॉले यांचेही ग्रंथ सर्वत्र प्रसिद्ध आहेतच. अशा इतिहासांची भाषासरणी, यथास्थित ग्रंथरचना, कथानकाची जुळणी, गहन विचार, तऱ्हेतऱ्हेची माहिती मध्यें घालून देण्याची खुबी, यांच्या योगानें सर्व प्रकारच्या वाचणारांस ते मान्य होतात. ज्यांस केवळ भाषाच शिकावयाची असते, त्यांस तिचें अत्यंत रमणीय रूप त्यांत पहावयास सांपडतें; ज्यांस विषयाची मांडणी कशी करावी, याची समजूत करून घ्यावयाची असते, त्यांस ती धाटणी त्यांतून उचलतां येते; केवळ गोष्टवेल्हाळच जे असतात, त्यांस कादंबऱ्यांप्रमाणें त्यांत चमत्कृति भासते; जे तत्त्वजिज्ञासु असतात, त्यांस पोक्तपणाचे व खोल असे विचार त्यांत सादर केलेले असतात; आणि ज्यांस चमत्कारिक व मौजेच्या गोष्टींचा संग्रह करावासा वाटतो, त्यांस तो त्यांतून सहज करतां येतो. याप्रमाणें इतिहास अनेक प्रकारांनीं मनोवेधक होतो.

इतिहासापासून पांचवा उपयोग, राजकारणी पुरुषांस म्हणजे मुत्सद्द्यांस होय. इतिहासाचा मुख्य उपयोग, वास्तविक पाहतां, हाच असून याचकरितां इतिहासकार पूर्ववृत्त लिहून ठेवितात. व्यक्तिभूत

मनुष्यास जितका चरित्रांचा उपयोग, तितकाच मुत्सद्द्यांस इतिहासाचा. म्हणजे 'पुढच्यास ठेंच, मागला शहाणा' या मराठी म्हणीप्रमाणें पूर्वी होऊन गेलेल्या मनुष्यांचा अनुभव जसा पुढच्यांस उपयोगी पडतो, त्याचप्रमाणें या पृथ्वीवर आजपर्यंत जी अनेक राज्यें होऊन गेलीं, त्यांचा अनुभव हल्लीच्यांस कामास येतो. राज्यास हितकर गोष्टी कोणत्या, अपायकारक कोणत्या, त्यावर अरिष्टें आलीं असतां कोणत्या युक्तिप्रयुक्तींनें त्यांचें निवारण करावें, तंटेबखेडे कशामुळें उत्पन्न होतात, प्रजेस सुखी ठेवण्याचे मार्ग कोणते, कायदेकानू कशा प्रकारचे असावे, वगैरे शेंकडों गोष्टी पूर्वींच्या इतिहासावरून सध्यांच्या राज्यकर्त्यांस समजल्या आहेत. एखादें जुनाट वडाचें झाड अवाढव्य विस्तार पावून शेवटीं वठलें असतां त्याचे नवे सोट जसे वाढत जाऊन मूळच्या झाडाच्या जागीं होतात, त्याचप्रमाणें रोमच्या अफाट पसरलेल्या बादशाहींतून हळुहळू अलीकडचीं युरोपांतील अनेक राज्यें उद्भवलीं. भाषा, रीतरिवाज वगैरेंचें मूळ जसें तें राज्य होय, तसेंच राज्यव्यवस्थेचा पायाही सध्यांच्या राष्ट्रांचा तेथपासूनच आहे. हा बळकट आधार नसता, तर युरोपची स्थिति आज कोणत्या प्रकारची असती, हें सांगणें कठिण आहे ! पहा बरें; पंधराव्या शतकांत ग्रीक व रोमन विद्येचें पुनरुज्जीवन होऊन तिचा प्रसार युरोपभर होतांच त्या खंडांतील सगळ्या राष्ट्रांस एकदम किती जोर आला ! हरएक गोष्टींत तेथील लोकांचा पगडा साऱ्या पृथ्वीवर जो तेव्हांपासून बसला आहे, त्यास मुख्य कारण पाहूं जातां वर सांगितलेल्या प्राचीन राष्ट्रांनीं ग्रंथांत सांठवून ठेवलेलें अमोलिक ज्ञानभांडार एकदम त्यांच्या हातास जें लागलें तेंच होय. राज्यरीति, सैन्यव्यवस्था, कायदेकानू वगैरे सर्व वरील जुन्या लोकांमध्येंच पूर्णदशेस आलीं असल्यामुळें तीं अलीकडील राष्ट्रांस आयतींच उपयोगीं

पडलीं. तेव्हां हा त्यांस केवढा लाभ झाला! पूर्वीं नशिरवान नामें-करून एका पारसदेशच्या राजानें मुद्दाम एक वकील हिंदुस्थानांत पाठवून आपल्या संस्कृत 'हितोपदेशा'चें फारसी भाषेंत भाषांतर करविलें; रोमच्या सेनेट सभेनें तसेच वकील अथेन्स शहरांत पाठवून तेथून सोलनचे कायदे आणविले; लैकर्गसही स्पार्टन लोकांस राज्य-व्यवस्थेचे नियम बांधून द्यावे, या उद्देशाने एशियामैनर, इजिप्त या दूरदूरच्या देशांत जाऊन हिंदुस्थानांतही आला होता, असें म्हणतात. असे दीर्घ प्रयत्न त्या वेळच्या लोकांस राज्यनीतिविषयक ज्ञान मिळ-वायास पडत असत! आणि तेवढेही त्या ज्ञानाची योग्यता जाणून लोक करीत! मग अलीकडच्या हजारों नव्या सोईच्या योगानें तेंच अमोलिक ज्ञान जर सर्वांस सुलभ झाले आहे, तर हा लाभ लहान-सहान काय? मागें इतिहासाचे जे आक्षेपक सांगितले, ते एवढाही विचार करीत नाहींत कीं, मुळांशिवाय जशी झाडाची स्थिति संभवत नाहीं, किंवा पायावांचून जसें घर राहणें अशक्य, त्याप्रमाणेच प्राचीन स्थितीशिवाय कोणत्याही राष्ट्राची त्या त्या वेळची नवी स्थिति आली नसते. नुसत्या वर वर पाहाणाराची दृष्टि मुळापर्यंत न पोंचल्यामुळें त्यास वाटतें की, सध्यां जें रूप दिसतें आहे, तें स्वयंभूच आहे; त्यास आदिकारण किंवा आधारभूत असें कांहींच नाहीं. ही मूर्ख समजूत मनांत धरून असे लोक आपल्या अज्ञानास, अरसिकतेस किंवा आळसास, इतिहासाचा मुळीं तिर-स्कारच करून लपवूं पाहतात. असो. तेव्हा एखाद्या राष्ट्राविषयीं

---

१ संस्कृत ग्रंथांचा कालक्रम समजण्यास कांही गोष्टी ठोकींव माहीत आहेत;– जसें सिकंदराची स्वारी, काश्मीरच्या श्रीहर्षराजाचा शक (सन १११३), चिनी प्रवाशांचे ग्रंथ. यांपैकींच वरील राजाचा शक (सुमारें इ. सन ५६०) हा आहे यावरून कालिदासादिकांसही जे आठव्या शतकापर्यंत ओढतात, त्यांनीं अंमळ जपून लिहावें.

पूर्ण साद्यंत ज्ञान ज्यास संपादन करावयाचें असेल, त्यास त्याची त्या वेळचीच स्थिति पाहिल्यानें तें कधीं होणार नाहीं. अगदीं मुळारंभापासून कसकसे फेरफार होत गेले, तें पूर्णपणें जेव्हां तो लक्षांत आणील, तेव्हांच त्या वेळच्या स्थितीविषयीं त्यास यथार्थ ज्ञान होईल. तसेंच, त्याच्या भावी स्थितीविषयीं जर त्यास अटकळी बांधावयाच्या असतील, तर तेंही वरील समग्र ज्ञान असल्याखेरीज त्याच्यानें होणार नाहीं.

---

## पाठ १४ वा.



## इतिहासापासून फायदे.

### भाग ३ रा.

इतिहासाचा शेवटला एकंदर उपयोग म्हटला, म्हणजे मनाचें पोषण होय; म्हणजे त्याच्या वाचनानें व मननानें मनाच्या निरनिराळ्या शक्ति प्रगल्भदशेस पोंचतात. एक तर स्मरणशक्ति. शक, मिति, स्थलांचीं नांवें, एकंदर मजकूर ही अगदीं बरोबर ध्यानांत ठेवावीं लागल्यामुळें या शक्तीचें काम पडून ती उत्तरोत्तर अवश्य वाढत जाते. दुसरी कल्पनाशक्ति. इतिहास म्हणजे अर्थातच गतगोष्टींचा वृत्तान्त असल्यामुळें तो मनांत यथास्थित आणण्यास कल्पनेचें काम पडतें. ज्या काळाचा, ज्या देशाचा इतिहास वाचावयाचा त्याची विशेषस्थिति पूर्णपणें लक्षांत आणल्यावांचून तो कधीं समजत नसतो. यास्तव तसें होण्यास वाचणाराची कल्पनाशक्ति चांगली चलाख असावी लागते. ही चलाख कल्पना व मोठी पोक्त किंवा सूक्ष्म बुद्धि या एक नव्हत. यास्तवच कविता, कादंबऱ्या, नाटकें इत्यादिकांचा तिरस्कार करणारे

जसे बुद्धिमानही आढळतात, तद्वतूच मागें सांगितल्याप्रमाणें जॉन-मनसारखे इतिहासास तुच्छ करणारे पंडितही आढळतात. पण या त्यांच्या अवहेलनेनें ते स्वतःस जितका अपाय करून घेतात, तितका वरील कवितादिकांच्या अधिदेवतांस होत नाहीं! त्यांचें मनोहर सौंदर्य लेशमात्रही कमी होत नाही, व त्यांच्या रसलुब्ध खऱ्या भजकांतूनही एकाचीसुद्धां भक्ति लवमात्रही उडत नाहीं. हे अवहेलना करणारेमात्र कल्पनेचे जड ठरून उपहास्य होतात. पुरुरवा राजानें उर्वशीस प्रथमच पाहिलें असतां तिला निर्माण केल्याच्या संबंधानें तो ब्रह्मदेवास उद्देशून जें म्हणतो, तेंच अशा पंडितांस निराळ्या संबंधानें लागेल![1] असो. तेव्हा इतिहास—त्यातूनही विशेषतः दूरच्या देशांचा किंवा काळाचा—यथास्थित समजण्यास व त्याची पुरतेपणीं गोडी लागण्यास वाचकाची कल्पना जागृत असली पाहिजे. असें असल्या-विना त्या त्या इतिहासपात्राशीं तादात्म्य पावून तो तो वृत्तान्त केवळ प्रत्यक्षसा मनास भासणें, हें घडत नाहीं. तेव्हां ही शक्ति इतिहास वाचणाराच्या अंगीं मूळची असली पाहिजे. ती

---

१ अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूच्चंद्रो नु कांतिप्रदः
शृंगारैकरसः स्वयं नु मदनो मासो नु पुष्पाकरः।
वेदाभ्यासजडः कथं नु विषयव्यावृत्तकौतूहलो
निर्मातु प्रभवेन्मनोहरमिदं रूपं पुराणो मुनिः॥

—वि० अंक १.

"हिला निर्माण करते वेळीं चंद्र प्रजापति झाला असावा, किंवा वसंत झाला असावा, अथवा एकथा शृंगारांतच जो नेहमी रमतो, असा साक्षात् मदनच प्रजापति होऊन त्यानें हिला घडलें असावें! कां कीं, सदासर्वकाळ वेद घोकून घोकून ज्याच्या बुद्धीस जाड्य आलें व ज्यास विषयांची प्रीति भासेनाशी झाली, तो जुनाट ऋषि [ब्रह्मदेव] असें मनोहर रूप उत्पन्न करण्यास कसा समर्थ होईल?"

असली म्हणजे मग अर्थातूच याच वाचनानें ती पुढें वृद्धिंगतही होत जाते. इतिहासांत नानाप्रकारचे देश, पुरुष, प्रसंग यांचें वर्णन असल्यामुळें कल्पनाशक्तीस रमण्यास हवा तेवढा अवकाश सापडतो, व त्यामुळें तिचें अर्थातूच अधिकाधिक पोषण होत जातें. शिवाय दुसरी गोष्ट ही की, इतिहासांतील हकीकत सगळी अक्षरशः खरी असल्यामुळें—कारण तशी ती असेल तरच तो इतिहास—कादंबऱ्यांच्या असत्यतेमुळें जो एक रीतीनें त्यांपासून मनास खेद होतो, तो यापासून होत नाहीं. पहा बरें, 'आरबी भाषेंतील गोष्टी'तल्या सिंदबाद दर्यावर्दीच्या निरनिराळ्या सफरी वाचल्या असतां मनास मोठा चमत्कार वाटून कल्पनाशक्ति त्यांत अगदी चूर होऊन जाते! पण काय? वाचणें संपतांच लागलेंच मनांत येतें कीं, या सर्व गोष्टी मोठ्या मौजेच्या खऱ्या, पण शेवटीं काय—येथून तेथून खोट्या! पण त्याच कोलंबसाच्या सफरी वाचा; म्हणजे मनाची कशी स्थिति होते? पहिल्याच्या सफरी आजपर्यंत लक्षावधि लोकांनीं वाचल्या असतील, व तशाच दुसऱ्याच्याही वाचल्या असतील, पण पहिल्या वाचल्याबरोबर कोणी मनुष्य गलबत तयार करून त्याच्यासारखे हिरे आणण्यास निघाला असेलसें वाटत नाहीं! पण दुसऱ्यांचा परिणाम काय झाला तो कोणासही—विशेषतः हिंदूंस तर—सांगावयास नकोच! त्याच जगप्रसिद्ध पुस्तकांत अल्लाउद्दिनाच्या वाड्याचें वर्णन आहे, आणि इतिहासांत ताजमहालाचें वर्णन आहे. पण दोहोंच्या वाचनानें वाचकांच्या मनांत किती भिन्न वृत्ति उद्भवतात! याप्रमाणेंच यक्षानीं, राक्षसांनीं केलेलीं अद्‌भुत कृत्येंही त्यांत घातलीं आहेत; पण ती वाचून मनास कांहीं करमणूक होते इतकेंच. इकडे वायुवेगानें चालणारे अग्निरथ, तेलाशिवाय, बत्तीशिवाय जळणारे दिवे, एक ठोका मुंबईस तर दुसरा ठोका लंडनास अशा मनाच्या वेगानें धाव-

णारी वीज, हत्तीच्या अंगासारख्या धोंडी एकीवर एक रचून उभा रलेले मनुष्यकृतीचे पर्वत,-कीं जे आतां जितके जुने भासतात तितकेच हिरॉडोटसास भासले,-डोंगर कोसकोस पोंखरून कोरून काढलेलीं विशाल मंदिरें-ज्यांनीं आपल्या प्रचंडतेपुढें निष्ठुर, हेवेखोर व दुराग्रही अशा यवनांसही हात टेंकावयास लावून त्यांकडून त्यांचा दुष्ट हट्ट सोडविला,-इत्यादि मानवी बुद्धीचे व प्रयत्नांचे अद्भुत प्रभाव जेव्हां मनुष्य पाहतो, तेव्हां त्यास वरील खोट्या गोष्टी पोर-कट वाटूं लागतात ! असो. तेव्हां सांगावयाचें काय कीं, मनुष्याच्या मनास स्वभावतःच सत्य आवडत असतें. यास्तव खऱ्या इतिहासाकडे त्याची प्रवृत्ति जितकी सहज व जितक्या प्रेमानें होईल, तितकी कल्पित कादंबऱ्याकडे होणार नाहीं; व म्हणूनच मनुष्याची कल्पना इतिहासवृत्तांत मोठ्या आवडीनें निःशंक रमते; कारण, त्यांत असत्यता दोष मुळींच नसल्यामुळें त्यांत यथेच्छ विहार केल्यास तीस अगदीं शीण वाटत नाहीं. तसेंच, इतिहासांतील विषय पुष्कळ प्रत्यक्ष इंद्रियगोचर होण्यासारखे असल्यामुळें त्यांचा ठसा मनावर जितका ठळठळीत उठण्यासारखा असतो, तितका कल्पित कथांतील विषयांचा अर्थात्च नसतो. असो. तर याप्रमाणें कल्पनाशक्तीस रंजविण्याच्या संबंधानें कादंबऱ्यांत व इतिहासांत इतकें अंतर आहे. तेव्हां इतिहासाच्या वाचनानें वाढली जाणारी दुसरी मानसिक शक्ति कल्पना होय. तिसरी विचारशक्ति. ही इतिहासाच्या ज्ञानानें वाढते, हें अगदीं उघड आहे.-फार तर काय, पण हें नुसतें लिहिणें म्हणजे-सुद्धां, 'सूर्य तेजाळ आहे'. 'पाण्याच्या अंगीं प्रवाहीत्वधर्म आहे'. इत्यादि वाक्यांप्रमाणें अत्यंत प्रसिद्ध अर्थाचा अनुवाद केल्याप्रमाणें असमंजस दिसतें. तथापि ती कां वाढते व कशी वाढते, यावर अंमळ विस्तार करणें जरूर आहे. एक तर इतिहासांत तऱ्हेतऱ्हेची माहिती

असल्यामुळें मनाच्या कोठारांत पुष्कळ नव्या गोष्टींचा भरणा होतो. त्या तर्क चालविण्यास किंवा हातीं घेतलेल्या विषयास वैचित्र्य किंवा विशदत्व देण्यास उपयोगीं पडतात. दुसरें, इतिहासांत निरनिराळ्या पात्रांचे निरनिराळे गुणदोष, निरनिराळे स्वभाव, निरनिराळ्या कृति स्पष्ट दाखविल्या असतात. यास्तव मानवी स्वभावाचीं अनेकविध अशीं चित्रविचित्र रूपें वाचकांच्या दृष्टीस पडून त्यांचें व्यवहारांत अत्यंत उपयोगी असें मार्मिक व पूर्णज्ञान त्यांस होतें. निरनिराळ्या देशांतील लोकस्थिति, राज्यव्यवस्था, रीतरिवाज, धर्मादि विषयांवरील समजुती, वगैरे कळल्या असतां मनुष्याची नजर दूरवर फांकते. त्यामुळें बुद्धीची पों ३ वाढून एकंदर वस्तुमात्राविषयी त्यास पहिल्याहून विशेष यथार्थ ज्ञान होऊं लागतें. एकच स्थितिविशेष नेहमीं दृष्टीसमोर असल्याच्या योगानें बुद्धीवर जो संकुचितत्वाचा वाईट संस्कार घडलेला असतो, तो मोडण्यास दोनच मार्ग आहेत. एक, देशोदेशीं हिंडून परराष्ट्रांविषयीं प्रत्यक्ष माहिती करून घेणें; आणि याच्या खालोखालचा दुसरा मार्ग म्हटला, म्हणजे अर्थात्च तसें ज्यांनीं केलें आहे, त्यांपासून भाषणद्वारा किंवा लेखनद्वारा तें ज्ञान मिळविणें. आतां पहिला मार्ग व दुसऱ्यांतील पहिली सोय हीं फारच थोड्यांस अनुकूळ असतात. यास्तव एकंदर लोकांच्या उपयोगाचा मार्ग म्हटला, म्हणजे इतिहास, देशांतरवर्णनें, प्रवासाच्या हकीकती वगैरेच होत. यांचा यथास्थित अभ्यास केला असतां 'कूपमंडूक' किंवा 'उंबरांतले किडे' यांसारखी सदोदित अवस्था असल्याच्या योगानें ज्या मूर्ख समजुती व जे दुराग्रह मनास स्वभावतःच जडून कालेंकरून त्यास अगदीं खिळून जातात, ते दूर होतात. शहाणे काय ते आम्ही; रीतभात उत्तम म्हणजे काय ती आमचीच; सर्व सुधारणेचें आगर म्हणजे आमचाच देश; खरा व

सदाचारप्रवर्तक असा आमचाच धर्म; बाकीच्यांचे म्हणजे निव्वळ थोतांड व लोक भ्रष्ट; आमची भाषा उत्तम; आमची विद्या, आमच्या कला याच बाकीच्या साऱ्या जगास वंद्य; फार तर काय, पण आमची पोषाकाची तऱ्हा, आमची नेसणानेसणाची तऱ्हा, आमची तोंड धुण्याची तऱ्हा, ह्यासुद्धां सर्वांत उत्कृष्ट; अशा प्रकारच्या ज्या निराधार कोत्या समजुती, त्या नाहीतशा होऊन इतिहासाच्या योगानें आपणांविषयीं व इतर राष्ट्रांविषयी यथार्थ ज्ञान वाचकांस होतें. आपली मोठी मानवजाति, जी साऱ्या भूमंडळावर पसरली आहे, व एकेक राष्ट्र केवढेंही ज्ञानसंपन्न किंवा थोर असलें, तरी तें जिचा केवळ एक कोपरा असतें, तिचें सर्वांशीं जेव्हां पर्यालोचन करावें, तेव्हांच तिचें एकंदर खरें स्वरूप लक्षांत येतें. मनुष्यस्वभावाच्या नित्य व शाश्वत स्वरूपापासून त्याचें आगंतुक, म्हणजे देशकाल-विशेषजन्य स्वरूप निवडतां येण्यास अर्थात् असेंच एकंदर सर्व राष्ट्रांचें मनानें आकलन झालें पाहिजे. असो. तेव्हां मनाचा दृक्प्रदेश वाढवून कोत्या समजुतींपासून व भ्रमापासून इतिहास त्यास मुक्त करितो व आपणांविषयीं व इतरांविषयीं यथार्थ बुद्धि मनांत आणून देऊन इतरांशीं सलोख्यानें वागण्यास तो आपणांस शिकवितो. हाही त्याच्या अध्ययनानें होणारा एक मोठा लाभ आहे.

**वि. कृ. चिपळूणकर.** निबंधमाला.

---

# पाठ १५ वा.



## 'म्हण' म्हणजे काय?

### भाग १ ला.

हा विषय मोठा गहन आहे, आणि त्याची मनोरंजकता प्रायः प्रतिपादन करणावर अवलंबून असते; म्हणजे प्रतिपादन करणारा जितका विद्वान् व बहुश्रुत, तितका हा विषय अधिक मनोरंजक होतो; परंतु सकृद्दर्शनीं कोणी असें म्हणतील कीं, म्हणी हा विषय गहन कसचा, आणि मनोरंजक तरी काय असणार? परंतु पुढें जे विचार आम्ही सादर करणार आहों, त्यांचें पर्यालोचन केलें असतां हा विषय किती गहन आहे, हें वाचकांस कळून येईल. तसेंच, त्यांस त्याची गोडीही लागेल. पण तसें न झाल्यास ती म्हणीच्या आंगची कमतरता न समजतां वाचकांनीं आमच्याकडून यथोचित विवेचन झालें नाहीं, इतकेंच समजावें.

प्रथम 'म्हण' म्हणजे काय, याचा विचार करूं. आपण मनास वाटतील त्या पांचपन्नास म्हणी गोळा केल्या, उदाहरणार्थ, 'करील तो भरील'. 'दिव्याखालीं अंधेर'. 'थोडी तों गोडी, फार तों लबाडी'. 'थेंबें थेंबें तळें सांचे'. इत्यादि किंवा दुसऱ्या कोणत्याही, आणि त्या साऱ्यांत साधारण असें काय आहे, तें पाहूं गेलों, तर आपणांस कळून यईल कीं, हें एक शहाणपणानें भरलेलें वचन होय; म्हणजे ज्या ज्ञानापासून आपणांस हरएक प्रसंगीं उपयोग होईल, आणि म्हणून जें लक्षांत ठेवण्यास योग्य आहे, असें ज्ञान देणारें वचन. आपण कोणतीही जरी म्हण घेतली, तरी तिच्यांत कांहीं ना कांहीं तरी ज्ञान सांठवलेलें आपणांस आढळेलच. संसारांतील

कोणतीही घडामोड घ्या. तिच्यांत असलेल्या लोकांस उपयोगीं पडणाऱ्या निदान १०१९ म्हणी तींत सांपडावयाच्याच नाहींत, असें बहुशः व्हावयाचें नाहीं. व्यापार, शेतकी, चाकरी यांविषयीं; हरएक धंदा, रोजगार, यांविषयीं; आईबाप व मुलें, बहीणभावंडें, नवराबायको, सास्वासुना, गुरुशिष्य, इत्यादिकांनीं एकमेकाशीं कसें वागावें, याविषयीं; तसेंच, न्याय, दया, प्रीति, विनय, विवेक इत्यादिकांपासून होणाऱ्या सुखाविषयीं; तसेंच, काम, क्रोध, लोभ, मद, मत्सरादिकांपासून होणाऱ्या दुःखाविषयीं; उद्योग, दीर्घप्रयत्न, टापटीप, व्यवस्थेशीरपणा, वक्तशीरपणा, इत्यादिकांपासून संसारांत होणाऱ्या असंभाव्य लाभाविषयीं; वैभव प्राप्त झालें असतां कसें वागावें, आपत्कालीं कसें वागावें, ह्याविषयीं; आपलें स्वतःचें अंतःस्वरूप व जगाचें अंतःस्वरूप ह्यांविषयीं; व तसेंच दुसऱ्या हजारों बारीकसारीक गोष्टीविषयीं ज्ञान, माहिती व अनुभव म्हणींत दृष्टीस पडतो. फार काय सांगावें? ह्या संसारात असें कोणतेंही संकट नाहीं, कीं जें एखादे म्हणीप्रमाणें आपण वर्तन केलें असतां आपणांस टाळतां येणार नाहीं. असो. तेव्हां एकंदरींत सांगावयाचें म्हणून इतकेंच कीं 'म्हण हें एक ज्ञान देणारें वचन आहे'. येथें वाक्य हा शब्द न घालतां वचन शब्द मुद्दाम घातला आहे. याचें कारण असें आहे कीं, बहुतेक म्हणी जरी एकवाक्यात्मक असतात, तरी बऱ्याच दोन, तीन, चार वाक्यांच्या झालेल्या असतात. व कित्येकांत वाक्याची सांगता करण्यासाठीं अध्याहृत शब्द घेऊन वाक्य बनवावें लागतें. उदाहरणार्थ, 'दैव देतें, कर्म नेतें'. 'वर न्हाला वाफा शिंपला'. 'घरच्या भयानें घेतलें रान, वाटेवर भेटला मुसलमान, त्यानें घेतले नाककान'. 'खिळ्यामुळें नाल गेला, नालामुळें घोडा गेला, घोड्यामुळें स्वार गेला, एवढा अनर्थ खिळ्यानें केला'. 'कामा-

पुरता मामा'. 'चोराच्या हातची लंगोटी'. 'जळत्या घराचा पोळता वांसा'. 'कोल्हा कांकडीला राजी'.

असो. येथवर जें विवेचन केलें आहे, त्यावरून इतकें सिद्ध झालें कीं, म्हणींत कांहीं ना कांहीं तरी ज्ञान सांठविलेलें असतें. परंतु एवढा एकच गुण असला, म्हणजे कोणतेंही वचन म्हणीच्या योग्यतेस पावतें असें नाहीं. तर जें ज्ञान दिलेलें असतें, तें चटकदार रीतीनें दिलें असलें पाहिजे. नाही तर त्या वचनास 'म्हण' असें म्हणतां यावयाचें नाही. उदाहरणार्थ, आपण ही म्हण घेऊं, 'चोराला चावला विंचू, चोर करीना हूं कां चूं'. या म्हणींत, 'निंद्य कर्म करणारावर एखादें संकट आलें असतां त्यास तें बाहेर सांगतां येत नाही'. हा अर्थ आहे; पण पहा तोच किती खुबीनें, किती मजेदार रीतीनें आणला आहे बरें ? समजा कीं, ह्या म्हणीच्या ऐवजीं आपण असें म्हटलें,—'वाईट कर्म करीत असतां मनुष्यास कांहीं दुःख प्राप्त झालें, तर तें त्यास निमूटपणें सोसावें लागतें'. तर वरील म्हणींत जो अर्थ आहे, तोच अर्थ या वाक्यांत आहे; पण म्हणींत जी खुमारी आहे, ती या वाक्यांत नाहीं. म्हणीच्या पुढें हें वाक्य फिक्कें दिसतें. आणि जरी त्याचा खरेपणा शंकाबाह्य आहे, तरी तें म्हणीइतकें आपल्या अंतःकरणास संतुष्ट करीत नाहीं; किंवा तें लक्षांत ठेवण्याविषयींही स्फूर्ति आपणांस होत नाहीं. अतएव, या वाक्यास 'म्हण' ही संज्ञा प्राप्त होणार नाहीं.

आतां आपण दुसरी एक म्हण घेऊं. 'हातच्या कांकणास आरसा कशाला ?' ह्या म्हणींतील अर्थ किती मजेदार रीतीनें आणला आहे ? ज्या गोष्टीची सत्यता किंवा योग्यता आपणांस सहज सिद्ध करतां येईल, त्या गोष्टीच्या खरेपणाविषयीं किंवा खोटेपणाविषयीं आपली खात्री करून घेण्यास खटाटोप व दुसऱ्याचे आर्जव

कशास पाहिजेत? हा अर्थ किती सफाईनें व चटकदार रीतीनें आणला आहे! ही म्हण जशी अंतःकरणास प्रसन्न करील, तसेंच या अर्थाचें दुसरें वाक्य करील काय? कधीं नाहीं. सारांश, आपल्या अंतःकरणावर छाप बसवून टाकण्याचा मोहक गुण म्हणींत असला पाहिजे.

आतां शेवटचें म्हणून तिसरें उदाहरण घेतों. 'खायाला आजी आणि करायाला शेजी'. हें वचनदेखील किती चटकदार आहे पहा. ही म्हण ऐकून कोणास हंसूं येणार नाही? समजा की, आपण असें म्हटलें की, "कित्येक लोक मोठेपणाच्या सुखाचा उपभोग घेण्यास तयार असतात; परंतु मोठेपणाच्या अंगभूत दुःखांचा अनुभव घेण्याची पाळी आली की, मागें हटतात." तर म्हणीनें आपलें दिल जितकें खुष होईल, त्याच्या शतांश तरी वरील वाक्यानें होईल काय? म्हणीनें 'शेजीबाई' जशी खजील होईल, तशी वरील प्रौढ सिद्धान्तानें होईल काय? किंवा म्हण जशी स्मृतिमंदिरांत चिरस्थायी होईल, तसा वरचा सिद्धान्त होईल काय?

---

## पाठ १६ वा.



### 'म्हण' म्हणजे काय?

#### भाग २ रा.

येथवर म्हणीच्या दोन गुणांचें विवेचन झालें. म्हणजे म्हणींत कांहीं तरी ज्ञान भरलें असलें पाहिजे, आणि तींत कांहीं खुबी पाहिजे. पण एवढ्या दोन गुणांनींच म्हण होते, असें नाहीं. तिसरा एक गुण आहे, तोही म्हणीत अवश्य असला पाहिजे. तो गुण हा

कीं, अर्थाच्या मानानें शब्द थोडे असावेत; म्हणजे पुष्कळ अर्थाचा समावेश अगदीं थोड्या शब्दांत केला असावा. उदाहरणार्थ, 'मूठभर मिया आणि हातभर दाढी'. या म्हणींत एखाद्या मनुष्यानें आपल्या योग्यतेपेक्षां अधिक डामडौल केला, तर तो कसा हास्यास्पद होतो, हें थोडक्यांत सांगितलें आहे. पण हाच अर्थ ४।५ शब्दांत आणला आहे; तेणेंकरून त्यांस कांहीं अपूर्व शोभा येते; आणि म्हणूनच त्यांस '**म्हण**' ही संज्ञा प्राप्त होते; ती त्याच अर्थाच्या लांबलचक वाक्यास प्राप्त व्हावयाची नाहीं. येथें हें सांगावयास नको कीं, म्हणीमध्यें अतिशय अर्थसंकोच झालेला असतो खरा, परंतु तो अर्थ अगदीं स्पष्ट असून अशिक्षित लोकांसदेखील समजण्याजोगा असतो, आणि म्हणूनच सर्व लोकांस,—पुरुषांस व बायकांस, गरिबांस व श्रीमंतांस, सुशिक्षितांस व अशिक्षितांस,—म्हणी आवडतात, व हरएक प्रसंगीं त्याचा उपयोग केला जातो. आतां कधीं कधीं हा अर्थाचा संकोच तर इतका झालेला असतो कीं, म्हण केवळ तीनचार शब्दांचीच असून, तींत अमोल ज्ञान व अनुभव यांचा सांठा केलेला असतो. उदाहरणार्थ, 'परदुःख शीतळ', 'बळी तो कान पिळी'. 'कर नाहीं त्याला डर नाहीं'. 'करील तो भरील'. वगैरे चिमुकल्या वचनांत किती खोल, किती गंभीर, व किती विस्तृत अर्थ आहे बरें ? तो प्रमाणांनीं सिद्ध करूं म्हटलें, तर एकेका म्हणीवरच केवढा ग्रंथ होईल !

असो. येथवर म्हणीच्या तीन गुणांविषयीं विवेचन झालें. आतां, चवथा एक गुणही म्हणींत असावयास पाहिजे. तो हा—लोकसंमति. म्हणजे सर्व लोकांनीं ती कबूल करून तिचा अंगीकार केला पाहिजे. ही लोकांची संमति व अंगीकार जर नसेल, तर कोणतेंही वचन, मग तें कितीही शहाणपणाचें असो, व कितीही संकुचित असो,

'म्हण' या संज्ञेस पात्र व्हावयाचें नाहीं. हा गुण म्हणजे जनसंमति, म्हणींत अवश्य असला पाहिजे; एखाद्या वचनांत फारसें ज्ञान नसलें, किंवा त्यांत फारशी खुबी नसली, किंवा फारसा अर्थसंकोच नसला, तरी कदाचित् चालेल; पण ही जनसंमति जर नसली, तर त्या वचनास 'म्हण' असें कदापि म्हणतां यावयाचें नाहीं. ह्या लोकसंमतीस 'म्हणीचा प्राण' म्हटलें असता चालेल.

ह्या वरील विवेचनावरून वाचकांचे लक्षांत आलेंच असेल की, खरें म्हटलें असतां जनसंमति हाच काय तो म्हणीचा आवश्यक व प्रधान गुण होय. आणि बाकीचे गुण गौण किंवा अनावश्यक आहेत, असें म्हटलें असतां चालेल. आणि 'म्हण' या नावावरूनसुद्धां म्हणीची व्याख्या स्पष्ट होते. जें वचन लोक वारंवार म्हणतात, तेंच म्हण होय. म्हणजे ज्या वचनाचा लोक नेहमीं उपयोग करितात, तें वचन. आणि डॉक्टर जॉन्सननें जी म्हणीची व्याख्या केली आहे, तीही ह्याच अर्थाची आहे.—Short sentences frequently repeated by the people. म्हणजे लोकांनीं वारंवार म्हटलेलीं लहान वाक्यें. आतां लोकांनीं कोणत्याही वचनाचा वारंवार उपयोग करणें, हेंच त्या वचनांतील ज्ञानाच्या खरेपणाचें निदर्शन होय. म्हणींतील अर्थ लोकास कबूल आहे, म्हणूनच हरएक प्रसंगीं बोलण्या-चालण्यांत व व्यवहारात ते तिचा उपयोग करितात. संसारांतील हरएक बाबतींत म्हणीचा खरेपणा कसास लागून तो निर्विवाद होऊन ठरून जातो. आणि ज्या अर्थीं हा खरेपणा आधीच ठरून गेलेला असतो, त्या अर्थीं लोकाचें मन वळविण्याचे किंवा लोकांची खात्री करण्याचे कामी म्हणींचा वारंवार उपयोग होतो. तसा ज्ञान, वैलक्षण्य, संकोच ह्या तीन गुणांनीं विशिष्ट अशा एखाद्या नवीन वचनाचा होणार नाहीं. म्हणीला ही जी जनसंमति असते,

तिला नाण्यावरील शिक्क्याची उपमा देतां येईल. एखादा साधा बिनशिक्क्याचा रुप्याचा तुकडा व शिक्का असलेलें रुप्याचें नाणें, ह्या दोहोंत जो भेद तोच म्हणींत व जनसंमति ज्यास प्राप्त झाली नाहीं, अशा एखाद्या ज्ञान-वैलक्षण्य-संकोच ह्याच तीन गुणांनी विशिष्ट अशा वचनांत भेद, असें आपणांस म्हणतां येईल. बिन-शिक्क्याच्या रुप्याच्या तुकड्याची किंमत शिक्क्याच्या तुकड्याइतकी असेल किंवा नसेल; परंतु आहे अशी जरी कल्पना केली, तरी ती सहज रीतीनें सिद्ध करून दाखवितां येणार नाहीं; आणि म्हणून लोक त्याचा स्वीकार करणार नाहींत, किंवा करावयास मागेंपुढें पाहतील. परंतु ज्याच्यावर शिक्का आहे, असें नाणें लोकांच्या हातांत खेळलेलें असतें. व त्याची किंमत लोकांनी कबूल केलेली असते; म्हणून त्याचा स्वीकार करण्यांत कांही जोखीम वाटत नाहीं. हीच गोष्ट म्हणीसंबंधानेंही लागू आहे. एखादें नवीन म्हणीच्या धर्तीवर तयार केलेलें वचन जरी खरें असले, तरी त्याचा खरेपणा सिद्ध केल्याशिवाय लोकांचा त्याचेवर भरंवसा बसणार नाहीं. परंतु म्हण आधींच रूढ झाली असल्याकारणानें सत्यासत्यतेचा निर्णय होऊन गेलेला असतो, व म्हणूनच लोकांनीं ती कबूल करणें हें साहजिकच आहे. सतराव्या शतकांत इंग्लंडांत जेम्स हॉवेल म्हणून एक ग्रंथकार होऊन गेला. त्यानें इंग्रजी म्हणी गोळा केल्या होत्या. त्यांच्या आरंभीं त्यानें जी प्रस्तावना दिली आहे, तींत ह्याच अर्थाच्या चार मार्मिक कविता आहेत. त्या येणेंप्रमाणें:—

The people's voice, the voice of God we call,<br>
And what are proverbs but the people's voice,<br>
Coined first and current made by common choice ;<br>
Then sure they must have weight and truth withal !

असो. म्हणीमध्यें हे चार गुण,-ज्ञान, चटकदारपणा, अर्थ-संकोच व जनसंमति हे-असतात. ह्या गुणचतुष्टयांत लोकसंमतीस प्राधान्य आहे, हेंही मागें सांगण्यांत आलेंच आहे. आतां हे चार गुण म्हणीमध्यें कोणत्या प्रमाणानें असतात, हें जर पाहूं गेलों, तर आपणांस आढळेल कीं, ज्या म्हणींत चटकदारपणा नाहीं, अशा थोड्या आहेत, ज्यांमध्यें ज्ञान नाहीं, अशा म्हणी त्यांहून थोड्या; ज्या म्हणींत अर्थसंकोच नाहीं, अशा म्हणी त्यांहूनही थोड्या किंवा मुळींच नाहींत, असें म्हटलें तरी चालेल; परंतु ज्यांना जनसंमति नाहीं, अशी म्हण अर्थात् एकही असावयाची नाहीं.

वि. वा. भिडे. म्हणीविषयीं चार शब्द.

---

## पाठ १७ वा.



### कडक थंडीचे अद्भुत चमत्कार.

आपल्या देशांत सर्वत्र उष्ण हवा असल्यामुळें, अतिशय थंडीनें होणारे चमत्कार आपल्या दृष्टीस पडत नाहींत. ते पहावयाचे असल्यास आपणांस हिमालय पर्वतावर संचार केला पाहिजे. पण तसें करण्याचीं साधनें फारच थोड्यांस अनुकूल असतात. सबब, ज्या शेंकडों जिज्ञासु लोकांस तीं कधींच प्राप्त होण्याचा संभव नाहीं, त्यांनीं आपल्या प्रांतांत क्वचित् प्रसंगीं दिसून येणाऱ्या गोष्टींचें लक्षपूर्वक अवलोकन करून, त्यांच्या साहाय्यानें तत्तुल्य इतर गोष्टींची कल्पना केली पाहिजे.

पावसाळ्याच्या आरंभास कधीं कधीं गारा पडतांना आपण पाहिल्या आहेत. या गारा कांहीं वेळ जमिनीवर राहिल्या, म्हणजे

त्या वितळून जाऊन त्यांचें पाणी होतें. त्या वरून खालीं पडतात, एवढेंमात्र आमच्या दृष्टीस पडतें. पण त्या वर कशा होतात, हें आम्हांपैकीं पुष्कळांस नीट ठाऊक असण्याचा संभव नाहीं. तसेंच, त्या पावसाळ्याच्या आरंभासच कां पडतात, या प्रश्नाचें तरी यथास्थित उत्तर किती जण देऊं शकतील? तथापि, या नित्याच्या अनुभवावरून सर्वांस ही गोष्ट कबूल केली पाहिजे कीं, पाण्यास बरीच उष्णता लाविल्यानें त्यास उकळी फुटून अखेर त्याची वाफ होते; तसेंच, या वाफेस थंडी लावली असतां तिचें पाणी होतें. गार स्लेटपाटीवर तोंडांतली वाफ सोडली असतां एक प्रकारचें दंव जमतें, हें सर्वांनीं पाहिलें असेल. तसेंच, आजारी मनुष्यासाठीं तापविलेल्या पाण्यावर, किंवा थालीपिठाच्या पातेल्यावर थंड भांडें ठेविलें असतां त्याचें बूड ओलें होतें, हेंही सर्वांच्या पाहण्यांत आहे. यावरून काय झालें कीं, पाण्याच्या उष्ण वाफेचा थंडीशीं संयोग झाला असतां तिचें फिरून पाणी होतें. याच पाण्यास आणखी थंडी लाविली, तर त्याचें बर्फ होतें. हें म्हणणें आमच्या लोकांस सहसा कळावयाचें नाहीं. प्रथम अशी शंका येणार कीं, ही फाजिल थंडी आणावी कोठून? लांकडें पेटविलीं असतां हवी तितकी उष्णता उत्पन्न करतां येते; पण थंडी कशी उत्पन्न करावी? ही थंडी कशी उत्पन्न करितात, हें ज्यांस पहावयाचें असेल, त्यांनीं कृत्रिम बर्फ करण्याचा एखादा कारखाना जाऊन पहावा. उन्हाळ्यांत आपण बाजारांतून जें बर्फ विकत आणितों, तें येथल्या येथें पाण्यास थंडी लावून केलेलें असतें. बर्फ हें किती थंड असतें, याचा पुष्कळांना अनुभव असेलच; पण बर्फापेक्षांही विशेष थंड असें मिश्रण आपणांस मिठाच्या साहाय्यानें करतां येतें. ऐस्क्रीम पुष्कळांनीं चाखलें असेलच; एकदां आम्हीं एका गृहस्थास असें विचारलें कीं, 'ऐस्क्रीम कसें करतात, हें तुला

ठाऊक आहे काय?' यावर त्यानें उत्तर दिलें कीं, 'त्यांत हो काय! बर्फाचे तुकडे, दूध आणि साखर हीं एके ठिकाणीं केली, की ऐस्क्रीम तयार होतें!' आणखी एका प्रसंगीं आमच्या पाहण्यांत एक गोष्ट आली, ती याहूनही मौजेची असल्यामुळें, ती येथें थोडक्यांत सांगितल्यावांचून राहवत नाहीं. आमच्या एका मित्राच्या घरीं उन्हाळ्यांत कांहीं सुशिक्षित व ठळक मंडळी संध्याकाळी फराळास बोलाविली होती. पुण्यांत फार दृष्टीस न पडणारी व वसंत ऋतूंत अत्यंत आल्हादकारक अशी कांहीं चीज मंडळींच्या सेवनास सादर करतां यावी, म्हणून ऐस्क्रीम करण्याचें यंत्र आणवून त्यांत तें वरच्या घरीं करण्याचें ठरविलें होतें. फराळ झाल्यावर मंडळी आराम करीत गच्चीवर बसली असतां, ऐस्क्रीमचें यंत्र मालकानें मंडळींत आणून ठेविलें. दुर्दैवानें यंत्राच्या पंचपात्रास एक लहानसें भोंक होतें व त्यांतून थोडाथोडा स्राव होत होता. मंडळींपैकीं एका जिज्ञासु गृहस्थास काय उत्कंठा झाली कोण जाणे, त्यानें आपलें एक बोट त्या पंचपात्रांतून पडणाऱ्या द्रवांत बुडवून तोंडांत घातलें, आणि तें वेडेंवांकडें केलें! त्यावर मालकानें असें विचारलें कीं, 'कां हो? तोंड वेडेंवांकडें कां केलें?' त्यावर चाखणारा गृहस्थ प्रत्युत्तर करतो, 'मी मुंबईस ऐस्क्रीम घेत असें, तें गोड लागे. तुमच्या येथलें असें खारट कां लागतें बरें?' यावर आमच्या विनोदी मित्रानें असें उत्तर केलें की, 'थोडा वेळ थांबा, तें अजून पुरतें थिजलें नाहीं; चांगलें थिजलें म्हणजे गोड लागूं लागेल!' तात्पर्य काय कीं, थंडीनें घडून येणाऱ्या ज्या गोष्टी येथें सहजगत्या दिसण्यासारख्या नाहींत, त्या ग्राज्वेटांससुद्धां नीट समजून घेतल्याशिवाय लक्षांत येण्यासारख्या नाहींत! एक शेर बर्फाच्या चुरांत अर्धा शेर मीठ घातलें, तर तें मिश्रण बर्फापेक्षां फारच थंड होतें. असें मिश्रण

एखाद्या लांकडी पंचपात्रांत घालून त्यांत साखर मिसळलेल्या दुधाचें भांडें ठेविलें, म्हणजे तें दूध थिजून त्याचें ऐस्क्रीम बनतें. दुधाच्या भोंवतालचें मिश्रण पराकाष्ठेचें थंड असल्यामुळें दुधांतील उष्णता त्याला लागून त्याचें खारट पाणी होतें; पण इकडे दुधांतील उष्णता नाहींशी झाल्यामुळें तें सांखळून जाऊन त्याचें द्रवत्व नाहींसें होतें, व त्याच्या अंगीं जडत्व येतें. तेव्हां पाण्यास थंडी लाविल्यानें त्याचें प्रवाहीत्व नष्ट होऊन त्याला घनत्व येतें व उष्णता लाविल्यानें वाफ होते, म्हणजे वायुरूपता येते, हें सिद्ध आहे. व याच रीतीनें म्हणजे कमीअधिक थंडी व उष्णता आणि दाब यांच्या मदतीनें पाहिजे त्या पदार्थास या तीन स्थितीपैकीं पाहिजे ती स्थिति आणितां येईल, असें शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे; आणि बहुतेक पदार्थांस त्यांनीं त्या तीन स्थिति आणून दाखविल्या आहेत.

आतां नैसर्गिक थंडीपासून होणारीं कांहीं अद्भुत कार्यें सांगून हा लेख पुरा करतों. बेंजामिन फ्रांकलिनचें नांव सर्वश्रुत आहे. हा गृहस्थ एका कडक हिंवाळ्यांत कॉपरमाईन नांवाच्या नदीच्या कांठीं होता. त्या वेळेस थंडी इतकी तीव्र होती कीं, धिवरांनीं पाण्याच्या बाहेर जाळीं काढलीं कीं, त्यांतले मासे थिजून जाऊन लांकडासारखे होत; आणि मग त्यांचे कुऱ्हाडींनीं तुकडे करावे लागत! तशांत एखादा मासा विस्तवापुढें धरला कीं, पुनः हालचाल करूं लागे! यावरून ज्या प्राण्याचें रक्त थंड असतें, त्याचें चैतन्य बरेच दिवस टिकून कसें राहतें, हें समजणार आहे. आपल्या साध्या जळूच्या अंगीदेखील थंडी साहण्याचें मोठेंच सामर्थ्य आहे, असें म्हणतात. या जळवांचे पुंजकेच्या पुंजके इजा न होतां कित्येक दिवस बर्फाखालीं सजीव राहतात, असें पाहण्यांत

आलें आहे. उत्तरध्रुवासभोंवतीं हिंडणाऱ्या एका प्रवाशाचें असें म्हणणें आहे कीं, ग्रीनलंडांत माशाशिवाय पाहिजे त्या प्राण्याचें मांस धूर दिल्याशिवाय, भाजल्याशिवाय किंवा मीठ घातल्याशिवाय न कुजतां पुष्कळ दिवस टिकतें. स्कॉटलंड वगैरे देशांतून या बेटांत आणिलेल्या बैलाच्या, बकऱ्याच्या किंवा डुकराच्या मांसाचे उवडे मुढे, आणि पंख न उपटलेलीं किंवा मसाला न भरलेलीं पांखरें जशींच्या तशींच राहतात! पाकसिद्धि करावयाची असल्यास हीं विळ्यांनीं तोडावीं लागतात! सारांश, येथील अतिशय थंडीमुळें तीं थिजून जाऊन कोणत्याही प्रकारें त्यांची रुचि कमी होत नाहीं. ज्या वेळेस खाण्यास काढावीं, त्या वेळेस जणूं काय आतांच कापली आहेत की काय, असें वाटतें. प्राण्यांच्या मांसाप्रमाणेंच वनस्पतींचीं अंगेंही थंडीनें कुजत नाहींत. स्पिट्सबर्जेन येथें एक शंभर वर्षांचें लांकूड तिळमात्र न बिघडलेलें पाहण्यांत आलें होतें. इ. सन १६३९त याच शहरीं एका तरीच्या कांठीं सात असामी पुरण्यांत आले होते. पुढें वीस वर्षांनीं कांहीं खलाशी, ज्या ठिकाणीं हे सात असामी पुरले होते, त्या ठिकाणींच उतरले; आणि त्यांचीं तीं सात प्रेतें जशींच्या तशींच त्यांच्या दृष्टीस पडलीं! याच कारणामुळें, थंड देशांतील पर्वतांत प्रवास करणारे लोक एकाएकीं बर्फाचे खडे घसरूं लागले असतां त्यांच्याखालीं सांपडून गतप्राण होतात, व त्यांचीं शरीरें अनेक वर्षें दऱ्यांच्या तळाशीं जशींच्या तशींच राहतात. बर्फांत सांपडून मेलेल्याचें प्रेत सांपडणार नाहीं, अशी निराशा त्याच्या मागें राहिलेल्या आप्तांस कधीं होत नाहीं. तूप वगैरे प्रवाही पदार्थ थिजले असतां त्यांचें घनफळ थोडें कमी होतें. पाण्याची गोष्ट तशी नाहीं. तें थिजलें असतां त्याचें घनफळ वाढतें. म्हणजे कांठोकांठ भरून ठेविलेल्या तपेलींत पाणी

थिजलें, तर तें त्या तपेलीवर चढेल; थिजलेल्या तुपाप्रमाणें कांठाच्या आंत जाणार नाहीं. याचें कारण असें आहे कीं, पाण्याच्या परमाणूंत जितकें अंतर असतें, त्याहून बर्फाच्या स्फटिकाकार कणांत अधिक अंतर असतें. स्फटिक अनेक आकारांचे असतात. पण त्या सर्वांत एक सामान्य गुण हा असतो की, त्यांस बहुशः सहा बाजू असतात. उदकस्फटिकाचा एक कण दुसऱ्या कणाशीं साठ अंशांच्या कोनानें भिडलेला असतो, असें कित्येकांचें म्हणणें आहे. पाणी थिजलें असतां त्याचें घनफळ वाढतें, यामुळें पुष्कळदा अपघात होतात व नुकसान होतें. पाण्याच्या तोट्यास वाव नसल्यास त्या दुभंगतात; झाडांच्या रसवाहिन्यांतील रस एकदम थिजल्यास तीं उकलतात; जमिनीतील पाण्याचें बर्फ झाल्यास तीवरील घरें उलथून पडतात; व कधी कधीं खडकाच्या भेगांत सांचलेलें पाणी थिजून फुगल्यामुळें सुरंगाप्रमाणें आवाज होऊन त्यांचे कळपे सुटतात! थिजून फुगूं लागलेल्या पाण्याच्या अंगी केवढा जोर येतो, हें पाहण्यासाठीं एका अमेरिकन लष्करी अंमलदारानें मोठ्या गंमतीचे दोन प्रयोग केले. चवदा इंच व्यासाचा एक तोफेचा कुळपी गोळा घेऊन त्यांत त्यानें पाणी भरलें, आणि लोखंडाच्या घट्ट खुंटीनें त्याचें तोंड बंद करून तो गोळा कडक हिंवाळ्यात उघड्या हवेंत कित्येक दिवस ठेविला. एके दिवशीं खुंटी शंभर यार्डांवर जाऊन पडली, आणि तिच्या पाठोपाठ तिच्या जाडीचें एक आठनऊ इंच लांबीचें भरींव बर्फी पंचपात्र बाहेर पडलें! दुसऱ्या प्रयोगाचे वेळीं खुंटीनें टिकाव धरला, पण गोळ्याचें मध्यांग दुभंगून त्याच्या कमरेसभोंवतीं बर्फाचें एक कडें ठोकल्यासारखें झालें!

गो. ग. आगरकर. विविधविषयसंग्रह.

---

# पाठ १८ वा.



## वसईचा मोहरा.

मागतीं चिमणाजी आपा कोंकणपट्टीला स्वारीस निघाले, तें कोंकणांत येऊन तळा, घोसाळा, अवचितगड, बिरवाडी, करनाळा, रेवदंडा, बेलापूर, साष्टी, असा मुलूख आपले कबजांत आणून आपला अंमल चालता केला. पुढें मुलूख काबीज करावा, अशा बेतानें जाऊन वसईला लागले. तेथें अंमल पहिला फिरंग्यांचा. तेव्हां शह जाऊन दिला; परंतु किल्ला समुद्रांत. एक आंग खुषकीला. त्या समयीं आपासाहेब यांणीं जहाजें तयार करून, आरमार जमवून, समुद्रांतून लढाईचा उद्योग केला; तीन वर्षें वसई भांडली. किल्ला हस्तगत होतां दिसेना. मनुष्य फार कामास आले. नऊ लाख बांगडी फुटली. लढाईचा मोठा प्रसंग केला. परंतु किल्ला हस्तगत होईना. चिमाजी आपा यांचा तर किल्ला घेण्याचा निश्चय मोठा. तेव्हां सर्व सरदार आपले जमा करून त्यांजला आपासाहेब बोलले कीं, "किल्ला हस्तगत होत नाहीं, याजकरितां मजला तोफेचे तोंडीं बांधून माझें डोकें तरी किल्ल्यांत पाडावें, नाहीं तर किल्ला घ्यावा." तेव्हां सर्व सरदार यांनीं आपासाहेबांस सांगितलें कीं, "जो आपला निश्चय झाला तोच नेम आमचा आहे; परंतु कांहीं तरी किल्ल्यांतील भेद समजल्याशिवाय किल्ला हस्तगत होणें कठिण. यासाठीं याचा विचार करून कांहीं तरी मसलत काढिली पाहिजे, मग दुसरा विचार किल्ला घेण्याचा ठरवूं. आधीं किल्ल्यांतील भेद आणावा."

तेव्हां सर्वांनीं विचार करून खंडोजी माणकर यांस गुराखी करून, त्यांनीं किल्ल्यांत जाऊन गुरें राखावयाची नोकरी पतकरली.

रोज किल्ल्यांत जाऊन लोकांचीं गुरें चारावयास न्यावीं आणि फिरून किल्ल्यांत पावतीं करावी, असा क्रम माणकर यांणीं चालविला. दुसरे आंजूरकर पंचकळशे सुतार सरदार होते, त्यांणीं सुतारकाम करावयास किल्ल्यांत जाण्याचें पतकरून, रोज किल्ल्यांत जावें आणि लोकांचे घरीं सुतारकाम करावें. दुलबाजी मोरे सरदार होते, त्यांणीं कासारपण पतकरून रोज किल्ल्यांतील लोकांचे बायकांस, किल्ल्यांत जाऊन बांगड्या भरून बाहेर येत जावें. याप्रमाणें तिघांनीं किल्ल्याचा भेद आणल्यावर, आपले लष्करांतून सुरुंग खणून, किल्ल्याचे बुरुजाखालीं सुरुंग नेऊन, त्यांत दारूचे बुधले भरून बत्ती दिली. तेव्हां तो बुरूज उडाला, तो मागतीं जागचे जागीं बसला. नंतर दुसरा सुरुंग पाडावयास काम चालविलें. त्या समयीं किल्ल्यांतील फिरंगी याची बायको जहाजांत बसून बाहेर निघाली. तें पाहून सरकारचीं जहाजें धावून फिरंग्यांचें जहाज धरिलें, आणि त्या बायकोस श्रीमंतांकडे आणिली, व ती बहुत देखणी रूपवान होती, म्हणून श्रीमंतांस दाखविली. त्यांणीं पाहून आपले लोकांस बोलले कीं, "ही कशाला धरून आणिली?" असें बोलून तिला साडी, चोळी नेसवून सोडून दिली. तेव्हां ती माघारी जाऊन आपले नवऱ्यास तिनें वर्तमान सांगितलें कीं, "तुम्ही त्याशीं कशासाठीं भांडतां? तो पुण्यवान आहे; मी तेथें गेल्यें असतां मला वांकडे दृष्टीनें पाहिलेंदेखील नाहीं, तेव्हां त्याशीं लढून यश येईल, असें दिसत नाहीं, व तुम्हांस दुसरेकडून कुमकही येत नाही." असा तिणें उपदेश केला. यांजकरितां गलिमाशी[1] सल्ला करून, स्नेह ठेवून, आपले खटल्यासुद्धां

---

[1] मराठ्यांनी पुष्कळ श्रम करून व जिवाची आशा न धरितां हल्ला करून बाहेरील तटबंदी फोडून आत प्रवेश केला होता हें मुख्य कारण होय.

निघून जावें. याप्रमाणें ठरल्यावर फिरंगी यांणीं श्रीमंत यांजकडे बोलणारा पाठवून तह केला कीं, "आमचे पद्रीं कारकून आहेत त्यांचा सांभाळ आपण करावा, आणि आमची जात आहे, त्यांजला हरएक बेगार सांगूं नये; आणि आम्हांस आठ दिवसांची मुदत द्यावी, म्हणजे आम्ही आपला सरंजाम घेऊन जातों आणि किल्ला तुमचे हवालीं करितों." त्यावरून आपासाहेब यांणीं कबूल करून त्यांचे पद्रचे कारकून होते, त्यांस "दरसाल ३६ रुपये व पंधरा मण भात याप्रमाणें देऊं, त्यांजकडे कामकाज सांगणार नाहीं. व तुमचे जातीचे लोकांस बिगार सांगणार नाहीं," असें ठरल्यावर फिरगी याणीं आपली सर्व वस्तभाव, सारें खटलें, आपले जहाजांत भरून किल्ल्यांतून निघून गेले. पुढें आपासाहेब यांणीं किल्ल्यांत शिरून भगवे झेंडे किल्ल्यावरती चढविले. वसईखालीं नऊ लक्षांचा मुलूख होता तितक्या मुलुखाचा अंमल चालता केला. असा गुजराथपावेतों अंमल बसवून श्रीमंत आपासाहेब मागतीं माघारे येऊन वसईवर मुक्काम केला तेथें आल्यानंतर लढाईंत लोक पडले होते, त्यांस कित्येकांस पालख्या दिल्या, व कित्येकांस गांव इनाम दिले, कित्येकांस जमिनी दिल्या. बालपरवेशी[1] पडलेले लोकांची चालविली. ज्याला संतति नव्हती, त्याची नानापरवेशी[2] चालविली. असा सारा बंदोबस्त करून शंकराजी केशव फडके यांजकडे वसई सरसुभा सांगितला. असा बंदोबस्त करून श्रीमंतांची स्वारी पुण्यास येऊन, बाजीरावसाहेब यांस सारा मजकूर सांगून, सातार्‍यास जाऊन शाहूमहाराज यांस भेटून मुलूख सर केला, हा मजकूर महाराजांस सांगून मागती चिमाजीआपा पुण्यास आले.

का. ना. साने. पेशव्यांची बखर.

---

१ **बाळपरवर्षा**:—लढाईंत पडलेल्या शिपायाच्या कुटुंबास दिलेला पगार, पेन्शन, गांव, जमीन. २ लढाईंत मयत होऊन वंश नसेल तर बायकोच्याच निर्वाहापुरतें देणें.

## पाठ १९ वा.



# आज्ञावंदन हें कल्याण आहे.

### भाग १ ला.

सेनापति आणि त्याच्या हाताखालचे समंजस अधिकारी ह्यांच्या ज्ञानामध्यें फारसें अंतर नसतें. कधीं कधीं हाताखालच्या एखाद्या माणसास स्वतः सेनापतीपेक्षां अधिक कळत असतें. परंतु कायदा असा असतो कीं, हाताखालच्या सर्व लोकांनी सेनापतीची आज्ञा हूं चूं न करितां, शिरसा मान्य केली पाहिजे. हा नियम लष्करांत ज्या ज्या मानानें अधिक पाळितात, त्या त्या मानानें त्या लष्कराची तयारी अधिक असते; आणि त्यास युद्धामध्यें यश येण्याचा संभव अधिक असतो. संभव अधिक असतो, एवढेंच केवळ नव्हे, तर यश खचित येतें. पुष्कळ चतुर पुरुषांचे असें म्हणणें आहे कीं, सोनपत-पानपतच्या लढाईच्या वेळी मराठ्यांच्या लष्करांत जर हा नियम चांगला चालत असता, भाऊसाहेब पेशव्याच्या आज्ञेंत जर हाताखालचे सगळे सरदार असते, तर अहमदशाहा अबदालीचा पराभव होऊन, मराठ्यांस खचित यश आलें असतें. असो. ह्यावरून सांगावयाचें तात्पर्य असें आहे कीं, कुटुंबामध्यें यजमानाच्याइतकीं किंवा त्याहून थोडीं अधिक शहाणी जरी दुसरीं कितीही माणसें असलीं, तरी त्या सर्वांनीं आपला आग्रह एकीकडे ठेवून त्या यजमानाच्या आज्ञेंत वागणें हें कुटुंबाच्या कल्याणास आवश्यक आहे. एका माणसाच्या ठायीं सगळे गुण कधींच सारखे नसतात. कोणामध्यें कांहीं असतो, कोणामध्यें कांहीं असतो. त्यांत यजमानामध्यें एक कांही तरी विशेष गुण विशेष असावा, हें आवश्यक आहे. पण जरी तसा वेळेस नसला, तरी त्याचे ठायीं

जो गुण असेल, त्यासच मोठा मानून, त्याचा गौरव करून त्याच्या आज्ञेंत राहणें, हें बाकीच्या सर्व माणसांस—आणि त्यांत विशेषें-करून गुणी माणसांस—अत्यंत भूषणास्पद होतें. आणि तें सर्व कुटुंबाच्या कीर्तीस आणि सुखास मोठें कारण होतें. पांडवांच्या चरित्रा-कडे पहा. धर्मराज हा ज्येष्ठ बंधु होता, त्याचे ठायीं क्षमा आणि धर्मशीलता हे गुण मोठे होते. त्याप्रमाणेंच भीम म्हणजे नवनाग-सहस्त्रबळी. मोठें शरीरबल त्याचे ठायीं होतें. अर्जुन हा एवढा योद्धा होता कीं, त्याचेपुढें युद्धास उभें राहण्याची प्राज्ञा शंकरा-वांचून इतरांची नव्हती. आणखी शरीरबल आणि युद्धकौशल्य हे गुण कांहीं सामान्य नव्हत. क्षमा आणि धर्मशीलता ह्या गुणां-पेक्षां हे कमी योग्यतेचे आहेत असें नाही. परंतु धर्म हा आपला ज्येष्ठ बंधु, त्याची आज्ञा आपणांस शिरसा वंद्य करावयाची; कांहीं झालें तरी त्याच्या आज्ञेबाहेर पाऊल ठेवावयाचें नाहीं, असा निश्चय भीम आणि अर्जुन ह्यांचा होता. त्यांच्या योगानें त्यांस यश आलें, त्यांच्या चरित्रास पुष्कळ शोभा आली आहे, आणि त्यांचें चरित्र बोधप्रद झालें आहे. सती द्रौपदी हिची विटंबना सभेमध्यें दुर्योधन करूं लागला, तेव्हां भीमाच्या अंगाचा कल्पान्त झाला. आणि तो म्हणाला:—

### आर्या

**रे सहदेवा, सत्वर पुष्कळसा अग्नि आण, जाच कसा,**
**जाळूं याचे हे कर, आम्हांला सोसवेल जाच कसा ॥ १ ॥**

—मोरोपंत.

त्यावर धर्म कांहीं बोलला नाहीं. परंतु अर्जुनानें त्यास म्हटलें:—

### आर्या

**सद्गुण, सुसेव्य हा गुरु, देवप्रिय यास जोवें हार उनीं,**
**घालिसि तापांत कसा? गति कोण पुढें स्वसत्त्व हारवुनी. १**

आम्हां व्यसनार्तांची धर्मस्थिति होचि बाज, पावें गा,
त्वां मोडावें न इला, स्वस्वास्थ्यसुखार्थ बा जपावें गा. २
हें काय बरें ? या गुरुघातें रिपु परम मुदित होतील.
स्वमुखीं विष अमृतरस व्याळमुखीं, कोण सुज्ञ ओतील ? ३

—मोरोपंत.

तें भीमानेंदेखील ऐकिलें; आपला हेका धरिला नाहीं. तरी, कर्णाची वल्गना ऐकून भीमाच्या पायांची आग मस्तकास गेली, आणि त्यानें गदेस हात घातला. त्या वेळचें वर्णन केलें आहेः—

## ओंव्या

भीमासि नावरे क्रोध तदा, सांवरूनि करें आकर्षी गदा,
म्हणे कौरवांच्या शिरच्छेदा, करीन आतां क्षणार्धें. १
पांचाळीतें पाहतां विलोकून, माझें हृदय जाहलें शतचूर्ण,
दावानल जाळी तृणकानन, तेविं दुर्जन मारीन हे. २
धर्म म्हणे ऐक भीमा, तिहीं पण करूनि जिंकिलें आम्हां,
क्रोध आवरीं करीं क्षमा, वेगें पाहें विचारून. ३
तुज क्रोध नावरेच्च कदा, तरी माझिये मस्तकीं प्रेरीं गदा,
परी स्वधर्मसत्यमर्यादा, सर्वथाही न सांडीं तूं. ४
चळतील मेरुमांदार, पश्चिमेस उगवेल जरी मित्र,
हेंही अघटित घडेल, परी सज्जन नर, असत्यमार्गें न जाती. ५
उष्णता धरील रोहिणीपती, शिळेवरी कमळें उगवती,
हेंही अघटित घडेल, परि न वर्तती, भगवद्भक्त असत्य पैं. ६

—श्रीधर.

असो. हे भाषण ऐकून भीमसेन जागचे जागीं स्वस्थ बसला. ह्यावरून एवढें ध्यावयाचें कीं, कुटुंबामध्यें स्वास्थ्य आणि पराक्रम यांचें सामर्थ्य राहण्यास ऐक्य आवश्यक आहे. म्हणजे सगळ्या माणसांचा जीव एक पाहिजे. असा जीव एक राहण्यास श्रेष्ठ आणि कनिष्ठ ह्या दोन्ही पक्षीं प्रयत्न झाले पाहिजेत. श्रेष्ठांनीं दोन गुण

धरिले पाहिजेत; पवित्र अंतःकरण आणि क्षमा. म्हणजे कनिष्ठांच्या मनांत असें वागलें पाहिजे कीं, श्रेष्ठ आपलें जें काय ऐकत नाहींत त्यास कारण कांहीं तरी चांगलें आहे, योग्य आहे. आणखी इतकें होऊनही, प्रसंगीं कनिष्ठांचे वाग्बाण निमूटपणें सोसण्यासारखी क्षमा पाहिजे. कनिष्ठांनीं एक गुण दृढ धरावा; तो हा कीं, प्रसंगीं आपलें म्हणणे श्रेष्ठांस नम्रतेनें कळवावयाचें, तरी शेवटीं त्यांच्या इच्छेस सादर व्हावयाचें. असे गुण उभयपक्षांत आले, म्हणजे कुटुंबांत कलह होण्याची भीति मुळीच रहावयाची नाहीं. ह्या सगळ्या गुणांत क्षमा हा गुण ह्या कामीं उपयोगी पडतो. एखादे ठिकाणीं बंड उठलें म्हणजे दारूगोळ्याच्या किंवा सैन्याच्या संरक्षणास जीं स्थळें आयत्या वेळीं तयार करितात त्यांच्या सभोंवतीं जी मोठी भिंत म्हणजे कोट बांधितात, तो भक्कम कठिण दगडांचा बांधीत नसतात. तर भुसभुशीत मातीचा बांधीत असतात. ह्याचें कारण असें आहे कीं, बाहेरून शत्रूकडचे गोळे जर येऊं लागले, तर ते चिखलांत दगड जातो, त्याप्रमाणें कोटांत घुसून जावे. हाच कोट जर कठिण दगडांचा भक्कम केला, तर त्यावर असे गोळे आपटून, त्याचे तुकडे तुकडे उडतील; त्यांनीं त्रास होईल, आणि कदाचित् कोटास भोंकेंही पडतील, असें भय असतें. ह्याचें तात्पर्य एवढेंच ध्यावयाचें कीं, कठिणाकठिणाशीं गांठ पडूं दिली, म्हणजे कलह झाल्यावांचून रहात नाहीं. म्हणून कोणीं एका पक्षानें पड (क्षमा) धरिली पाहिजे. आणि क्षमा धरणें हें श्रेष्ठ पक्षास विशेष शोभतें; म्हणून कुटुंबामध्यें प्रसंग मुख्य माणसाशीं येवो किंवा इतरांत ज्येष्ठ-कनिष्ठांशीं येवो; श्रेष्ठांनीं क्षमा धरावी, हें भूषण आहे. त्याप्रमाणेंच आज्ञावंदन हें कनिष्ठांस मोठें भूषण आहे.

## पाठ २० वा.



## आज्ञावंदन हें कल्याण आहे.

### भाग २ रा.

आणखी एक गोष्ट विशेष लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, लोभ हें कलहाचें बीज आहे, आणि आत्मसंयमन हें शांतीचें बीज आहे. म्हणून करवेल तितकें आत्मसंयमन करावें, दुसऱ्यांस सुख देण्याचा प्रयत्न करावा, आपल्या सुखाकडे पाहूं नये. ह्यानें जी मौज कुटुंबव्यवस्थेंत होते, ती दुसऱ्या वशानेंही होत नाहीं. ह्याचा अनुभव कुटुंबवत्सलांस आला आहे. त्याचप्रमाणें 'कांड्याचा नायटा' करूं नये. कोणी प्रसंगीं कपटानें जरी एखादा मर्मभेदक शब्द बोललें, तरी तो ऐकला न ऐकला करून कौतुकावारी न्यावा, तो उगाळीत बसूं नये. कोळसा उगाळावा तितका काळाच निघावयाचा; त्यांतून कधीं निर्मळपणा निघावयाचा नाहीं. शिवाय, आणखी एक गोष्ट येथें सांगावयाची आहे. ती आमच्या पुरुषमंडळीसमात्र सांगावयाची. ती ही कीं, त्यांनीं गृहव्यवस्थेच्या कामीं आणि त्यांतही घरांतल्या बारीकसारीक खटपटींत बायकांच्या बोलण्याकडे सहसा लक्ष देऊं नये. शिक्षण कमी असल्यामुळें म्हणा, किंवा आमचे कवि समजतात, त्याप्रमाणें स्वभावतःच म्हणा, बायकांच्या बोलण्यांत आणि वागण्यांत कलहाचें बीज पुष्कळ असतें. तें पुरुषांनीं मनावर घेतलें, म्हणजे त्याचा वृक्ष व्हावयास उशीर लागत नाहीं. जे बापलेक, भाऊभाऊ किंवा चुलतेपुतणे विभक्त होतात, त्यांच्या गोष्टी जर ऐकिल्या, तर विभक्तपणा होण्यास मुख्य कारण बायका असतात, असें दिसून येतें. "बायकांबायकांचें जमेना," हें कारण नेहमीं ऐकूं येतें, हें कांहीं खोटें नव्हे. आपल्या पुत्रास राज्य मिळवून देण्याच्या खटपटींत

कैकेयीस वैधव्याचेंदेखील भय वाटलें नाहीं. पेशवाई मिळविण्या-करितां आनंदीबाई प्रत्यक्ष पुतण्यास ठार मारविण्यास चुकली नाहीं. नारायणराव दीन होऊन "काका ! काका !!" करीत पळत आला, तेव्हां राघोबाचें मन कळवळलें; पण आनंदीबाईच्या मनास द्रव आला नाही. असो. हीं मोठ्या प्रकरणांतलीं मोठीं उदाहरणें आहेत; तरी स्त्रीस्वभावाचें स्वरूप लक्षांत येण्यास बस्स आहेत. आणखी लहान लहान घरांमध्यें जे लहान लहान कलह होतात, त्यांत ह्या स्वभावाचें बीज त्याचप्रमाणें चांगलें दृश्यमान असतें. विभक्तपणा झालेला आहे, अशीं शंभर कुटुंबें जर घेतलीं, तर त्यांतल्या नव्वद कुटुंबांच्या विभक्तपणास बायका कारण झालेल्या आहेत, असें आढळून येतें. म्हणून ही सूचना येथें बुद्ध्या दिली आहे. हीवरून आमच्या स्त्रीमंडळानें आम्हांवर कोपायमान होऊं नये. खरा प्रकार आहे तो सांगितला आहे. ह्यांत प्रमाद झाला असल्यास त्यांनीं मला क्षमा करावी.

आणखी एका विशेष गोष्टीविषयीं थोडेंसें येथें सांगावेंसें वाटतें. अलीकडे पंचवीसचाळीस वर्षांत असा एक विषय निघाला आहे कीं, पुरुष आणि स्त्रिया ह्यांची योग्यता समान मानावी, आणि त्यांच्या अधिकारांमध्यें कोणत्याही प्रकारचें अंतर नसावें. प्रथमदर्शनीं असें वाटतें कीं, हें म्हणणें अगदी योग्य आहे; त्यांत असत्याचा लेशही नाहीं. कां कीं, मनुष्यें तेथून सगळीं सारखीं–त्यांत पुरुष काय आणि बायका काय–त्यांत पुरुषालाच श्रेष्ठत्व कां असावें ? खरें आहे. बायकांपेक्षां पुरुषांस श्रेष्ठ कां मानावें, ह्यास कांहीं कारण नाहीं; परंतु आम्ही असें म्हणतों कीं, हें [illegible] नाहीं; तर पुरुष आणि बायका ह्यांची उत्पत्ति जगामध्यें बरोबर झालेली असावी, आणि त्यांच्यामधलें श्रेष्ठत्वकनिष्ठत्व त्यांच्या गुणांच्या मानानें आपो-

आप स्थापित होऊन तें पुढें चालत आलें असावें; त्यांत मनुष्यांनीं बुद्ध्या केलेलें—कृत्रिम—असें कांहीं एक नाहीं. उजवा हात आणि डावा हात हे दोन्ही हात एका माणसाचे असतात. त्यांतल्या एखाद्याविषयीं प्रतारणा करण्याचें कारण त्याला नसतें. तरी उजवा हात श्रेष्ठ मानावा, आणि डावा हात त्याच्यापेक्षां कमी मानावा, हा स्वभाव सर्वत्र आहे. ह्यास कारण मनुष्याचा पक्षपातीपणा नव्हे, तर त्या हातांच्या आंगचें अधिकउणें कर्तृत्व कारण होय. हा प्रकार नैसर्गिक आहे; कृत्रिम नाहीं त्याच न्यायानें, पुरुषांनीं कधीं एक सभा करून स्त्रियांस आपणांपेक्षां कमी मानण्याचा ठराव केला आहे, आणि त्याविषयीं शपथा घेतल्या आहेत, असें आढळत नाहीं. त्या-प्रमाणेंच आपण पुरुषाधीन राहण्याविषयी स्त्रियांनीं स्वसंतोषानें आणा वाहिल्या नाहींत. असें असतां जिकडे पहावें तिकडे, स्त्रियांस पुरुषांइतकी विद्या शिकवितात त्या देशांतही, स्त्रिया चांगल्या विद्वान् होऊनही त्या पुरुषाधीन राहत आहेत, अथवा पुरुषांस आपणांपेक्षां श्रेष्ठ मानीत आहेत, हें कसें ? ह्याचें उत्तर एवढेंच कीं, तें ईश्वरनिर्मितच आहे. म्हणजे व्यवहारांत पुरुष श्रेष्ठ असावा, स्त्रीनें कनिष्ठ असावें, अथवा स्त्रिया पुरुषाधीन असाव्या, अशी ईश्वरी योजना आहे; ती योजना बदलण्याचा प्रयत्न कोणीं करूं नये. स्त्रिया पुरुषांपेक्षां कमी योग्यतेच्या आहेत, ह्याचा अर्थ स्त्रिया पशु आहेत, त्यांस पाहिजे त्या रीतीनें वागवावें, असा आमचा आशय कोणीं समजूं नये. तर आमचें म्हणणें एवढेंच आहे कीं, पुरुष आणि स्त्री या दोघांचीही योग्यता त्यांच्या त्यांच्या कर्तव्यांच्या मानानें सारखीच आहे. तीं दोघें वेगळ्या वेगळ्या कार्यांकरितां परमेश्वरानें निर्माण केलीं आहेत. स्त्रिया गृहकृत्यांकरितां निर्माण केल्या आहेत, आणि पुरुष घराबाहेरच्या विशेष श्रमांच्या कामांकरितां निर्माण केले

आहेत. त्यांनीं तीं कार्यें योग्य रीतीनें केलीं, म्हणजे तीं कृतकार्य झालीं म्हणावयाचीं. त्यांत एकंदरीनें कर्तबगारी स्त्रीच्या ठायीं कमी असते. परंतु तेवढ्यावरून तिची योग्यता कमी होत नाहीं. कार्याच्या संबंधानें ती एकसारखीच आहे. दूध पाण्यापेक्षां श्रेष्ठ आहे, ह्याविषयीं कांहीं वाद नाहीं. परंतु पाण्याचें कार्य दुधानें भागावयाचें नाहीं. मोठ्या राजाच्या बागेंतलीं जरी फुलझाडें असलीं, तरी तीं जगावयास त्यांस पाणीच घातलें पाहिजे, दूध घालून चालावयाचें नाहीं. त्याप्रमाणेंच, कितीही उत्तम दूध असलें, तरी त्यांत मासे जगावयाचे नाहींत, त्यांस जगावयास पाणीच पाहिजे. सुईचें कार्य तरवारीनें व्हावयाचें नाहीं, तसें तरवारीचें काम सुईनें व्हावयाचें नाहीं. ह्यावरून सर्व समजावें. आणि स्त्रिया ह्या पुरुषांच्या बरोबरीच्या नाहींत, असें स्थापित झालें आहे, ही सगळी लबाडी पुरुषांची आहे, असें जें कांहीं माणसांच्या—कांहीं समजदार माणसांच्यादेखील—मनांत शिरलें आहे, तें त्यांनीं सोडून द्यावें. आणखी पुरुषाधीन राहणें, प्रपंचांत पुरुषांस साह्य करणें, हेंच आपलें भूषण आहे, असें समजून स्त्रीजनांनीं आनंदानें आपलीं कर्तव्यें करून घर संभाळावें, हें उभयपक्षीं हितावह आहे. ह्यास उदाहरणें सीता, द्रौपदी, तारामती इत्यादि अनेक आहेत. त्यांच्या कथा वाचून पाहाव्या.

हें जसें स्त्रीपुरुषांविषयीं झालें, तसेंच घरांतल्या लहान माणसांविषयीं आणि मोठ्या माणसांविषयीं आहे. इतर गोष्टी कशाही असल्या, तरी वडील माणसांस अनुभव मोठा असतो; आणि त्यांच्या अंतःकरणांत सगळ्या कुटुंबाचें हित सर्वदा खेळत असतें; म्हणून लहान माणसांनीं मोठ्या माणसांच्या आज्ञेंत वागत असावें, आणि तें भूषण मानावें, हें योग्य आहे.

वि. कों. ओक. ——— प्रपंचरहस्य.

# पाठ २१ वा.



## संकटांचा पाऊस.

तुकारामबोवांचे वडील एकाएकीं वारले व संसारांत पुढारीपण पत्करलेल्या तुकारामबोवांवर हा एक मोठाच कठिण प्रसंग कोसळला. बोल्होबा जिवंत होते, तोंपर्यंत संसाराचें धोरण त्यांच्या अनुभविक सल्ल्यानें चालत असे. तेव्हां कसाही प्रसंग आला, तरी बोल्होबांचा आपल्याला पूर्ण आधार आहे, असें मनांत आलें, म्हणजे तुकारामबोवांना संसारकृत्यें करण्यांत उल्हास वाटत असे व फार धीर येत असे. उत्तम थाटलेला संसार आपल्या हातीं दिला व पुढें वेळोवेळीं अडीअडचणीला हितावह उपदेश करून योग्य मार्ग दाखविला, म्हणून आपल्या वडिलाविषयीं तुकारामबोवांच्या हृदयांत अत्यंत कृतज्ञता वसत असे:—

**बाप करी जोडी लेंकराचे ओढी । आपली करवंडी वाळवून ॥**
**एकाएकीं केला मिरासीचा धनी । कडीये, वागवूनी भार, खांदीं॥**
**लेववूनी, पाहे डोळां, अळंकार । ठेवा दावी थोर करूनीया ॥**
**तुका म्हणे, नेदी गांजूं आणिकांसी । उदार जीवासी आपुलीया ॥**

असे उद्गार ज्या जनकाविषयीं तुकारामबोवांच्या तोंडून निघाले आहेत, त्याचा आकस्मिक अंत झाला असतां, बोवांना किती उदास व निराश्रित वाटलें असेल, याची कल्पना वाचकांनींच आपल्या मनाशीं करावी. वडील वारले, ज्येष्ठ बंधु संसाराविषयीं उदासीन, आई म्हातारी, एक बायको सदाची दुखणेकरी, दुसरी बायको तापट व फटकळ, धाकटा भाऊ अगदींच पोरवयाचा, अशी परिस्थिति असतांना, तुकारामबोवांचा धीर सुटून त्यांचें अंतःकरण दडपून गेलें असलें, तर त्यांत फारसें नवल नाहीं. तरी पण, संसार

पूर्वींप्रमाणेंच हाकण्याचें त्यांनीं आपलें व्रत ढळूं दिलें नाहीं. व कुटुंबांतील माणसांना उणेपणा भासूं दिला नाहीं. पण हें फार दिवस टिकलें नाही. तुकारामबोवांवर एकावर एक दुर्दैवाचे आघात झाले व चारपांच वर्षांतच त्यांच्या संसाराची धुळधाण झाली. बापाच्या मागून लगेच आईचाही काळ झाला. पुढें व्यापाराला बराच धक्का बसून आंतसवाई होऊं लागली. लोकांकडे येणें बरेंच थकलें; बाकी फेडण्याबद्दल तगादा लावणें किंवा दिवाणदरबार करणें हें तुकारामबोवांच्या भाविक व दयाळू बुद्धीस पटेना, म्हणून वसूल मंदावून गेला; आणि सावकारांच्या देण्याची धोंड उरावर येऊन पडली. इतक्यांत देशांत भयंकर दुष्काळ पडला. त्यामध्यें तुकाराम-बोवांच्या घराण्याची अशी कांहीं विलक्षण दैना उडाली, कीं पुसूंच नये. बोवांचें दिवाळें वाजलें, मध्यान्हीचीही भ्रांत पडूं लागली. घरांत धान्याचा कण नाहीं व पदरी विष खावयालाही दमडी नाहीं. आपण उजेडामधून एकदम काळोखांत आलों, म्हणजे तो काळोख जसा विशेषच दाट भासतो, त्याप्रमाणे भरभराटीचा उपभोग घेऊन दारिद्र्याच्या अंधकूपांत पडलेल्या तुकारामबोवांच्या दुःखाला व लाजेला पारच नाहीं असें झालें. इतक्यांत त्यांची पहिली बायको रखमाई दुष्काळांत 'अन्न अन्न' करून मेली. त्यांचा मोठा मुलगा शिवाजी हाही गुदरला. ज्येष्ठ बंधु सावजी याचीही बायको वारली व तो स्वतः संसारावर तुळशीपत्र ठेवून जो कोठें परागंदा झाला, तो कांहीं पुनः आला नाहीं. असा संकटांचा पाऊस कोसळल्यावर तुकारामबोवांच्या मनानें संसाराविषयीं पूर्ण उलट खाल्ली. आपण आजपर्यंत ज्यांत सुख मानून गुंतलों होतों, तो केवळ सुखाभास होता, खरें सुख नव्हतें, अशी त्यांची खात्री पटली. त्यांचें मन आतां खऱ्या सुखाचा ठाव पहाण्यासाठीं तळ-

तळूं लागलें. संसारदु:खानें पोळून ते मुमुक्षूच्या स्थितीस पोहों-
चले व त्यांच्या आयुष्याच्या दुसऱ्या आणि अत्यंत महत्त्वाच्या
अर्धास सुरुवात झाली. या वेळीं त्यांचें वय एकवीस वर्षांचें होतें.

तुकारामबोवांसारख्या संतजनांच्या चरित्रांचें विवरण करितांना
त्यांना काय सुख लाभलें, त्यांना आनंदाचा वांटा किती मिळाला,
त्यांचा संसारांत भाग्योदय कसा झाला, त्यांनीं किती संपत्ति सांठ-
विली, इत्यादि गोष्टींचा विचार करून बरोबर—किंबहुना मुळींच—
भागणार नाहीं. तर त्यांनीं काय काय संकटें भोगिलीं, त्यांच्यावर
कोणकोणते प्रसंग कोसळले, दु:खाच्या भट्टींत हिणकस खाक होऊन
सुवर्णधातूचें उजळ स्वरूप कसकसें ठळक होत गेलें, दुर्दैवाच्या घन-
प्रहारांनीं त्यांची मनोरचना कसकशी बनत गेली, या गोष्टींचा
आढावा काढणें ही महत्त्वाची बाब आहे. दुष्ट व पापी प्रकृतींना ताळ्यावर
आणण्यासाठींच संकटांची आवश्यकता असते असें नाही. दुराग्रही,
अहंमन्य व गर्वाढ्य प्रकृतीच्या ठिकाणीं सरलता, लीनता, सौम्यपणा व
सदयता यांचा ठसा उमटविण्यासाठीं दुर्दैवाचे निर्घृण निर्घात अवश्य
आहेत, हें तत्त्व आम्हांला कबूल आहे. परंतु ज्या सुशील सज्जनां-
ना वांकडा शब्द लावण्यास किंवा यत्किंचितूही अपाय करण्यास
आपलें मन धजणार नाहीं, त्यांचेंही सत्त्व व तेज हीं पारखण्यास व
उजळ करण्यास ईश्वरी सत्ता, संकट, दु:ख इत्यादि परंपरांचीच
योजना करिते. अगदीं निर्दोष, नि:स्वार्थ व नवजात बालकाप्रमाणें
शुद्ध अशा सदाचारी व्यक्तीचें खरें तेज, गुण, प्रभाव व पवित्रता
हीं व्यक्त करून त्यांना परमावधीला नेण्याला—त्यांची पराकाष्ठा
करण्याला—क्लेश व अनर्थपात यांचा बिनमोल उपयोग झालेला
आहे. या व्यक्तींचें वास्तविक स्वरूप प्रकट होऊन त्यांच्या उदा-
हरणीय चारित्र्याचें योग्य महत्त्व जगाच्या डोळ्यांत भरण्याला क्लेश

व दुःख हेच राजमार्ग होत, असें म्हटलें असतांही साजण्यासारखें आहे. जर मानवी आत्म्याच्या उन्नतीला दृश्य मर्यादाच बांधतां येत नाहीं, तर मग ती उन्नति अमुक एक मार्गानेंच झाली पाहिजे, ती सुखोपभोगांपासूनच व्हावी, दुःखक्लेशांपासून होऊं नये, अशा तऱ्हेचा सिद्धान्त तरी आपल्याला कसा घालतां येईल? तुकाराम-बोवांसारख्या लोकोत्तर महात्म्यांची प्रकृतिच अशी कांहीं विलक्षण असते कीं, तिला जितकी आंच पोहोंचेल, जितकें घर्षण, उच्छेदन व ताडन होईल, तितकी तिची तेजस्विता अधिक चमकूं लागते. टांकीचे घाव सोसल्यावांचून जशी देवकळा येत नाहीं, गारेवर लोखंडाचा कठोर आघात झाल्यावांचून जशी ठिणगी चमकत नाहीं, किंवा पक्कें दधिमंथन झाल्यावांचून जशी सत्त्वनिष्पत्ति होत नाहीं, त्याप्रमाणेंच लोकोत्तर विभूतींचें तेज व सत्त्व हीं क्लेशदुःखांच्या झटक्यांवांचून यथार्थरूपानें व्यक्त होत नाहींत. कित्येक वेळा मनुष्याच्या आयुष्यांतील प्रत्येक क्षणास युगाचें मोल येतें. तुकाराम-बोवांचें एकविसावें वर्ष याच मासल्याचें होतें. वैशाखज्येष्ठांतील अतिशय कडक तापानें तापलेली जमीनच जशी बीज धारण करून आषाढश्रावणांतील पावसाच्या सरींनीं भावी पीक देण्यास लायक होते, त्याप्रमाणेंच संसारतापानें होरपळलेली तुकारामबोवांची मनोभूमि, वैराग्याचें उत्तम बीज धारण करून ईशभक्तीच्या अमृतानें लोकोप-काराचें भावी पीक पिकविण्यास तयार झाली. परंतु तुकाराम-बोवांच्या मनःस्थितीमध्यें ही जी क्रांति घडून आली, ती एकाएकींच पूर्ण घडून आली, असें नाहीं. ही क्रांति हळुहळू बरेच दिवस घडत होती; व जसजसे दुर्धर प्रसंगाचे टोले मिळत गेले, तसतशी तिची पूर्णत्वस्थितीकडे प्रगति होत गेली.

**बाळकृष्ण अनंत भिडे.** ——— तुकारामबोवा.

# पाठ २२ वा.



## खरा संचय कोणता ?

ओढाताण करून दागदागिन्यांत, घरांत, शेतांत, अथवा व्यापारांत पैसा घातला, म्हणजे आपण चांगला संचय केला, व यामुळें आपण कृतकृत्य झालों, असें समजणारे पुष्कळ लोक दृष्टीस पडतात. परंतु खऱ्या संचयाविषयीं काळजी वाहणारे थोडे दृष्टीस पडावे, हें आश्चर्य आहे. ज्यांच्यासाठीं आपल्या जिवाचा आटापिटा करून व केव्हां केव्हां पोटाला चिमटा घेऊन सोनेंनाणें खरेदी करावयाचें, घरदार बांधून ठेवावयाचें, शेतवाडी संपादन करावयाची, अथवा उदीमव्यापार करावयाचा, तीं जर शक्तिहीन, ज्ञानहीन, व विचारहीन असतील, तर असल्या संचयापासून विशेष उपयोग काय आहे ? प्रसंगीं असला संचय विशेष कामास येईल काय ? यावरून असला संचय बिलकुल करूं नये, असें मी म्हणत नाहीं. या संचयाची आवश्यकता आहे, ही गोष्ट खरी आहे. या संचयावांचून व्यवहार चालावयाचा नाहीं, हें खरें आहे; परंतु हा संचय पुढें मुलांच्या उपयोगीं पडावा, म्हणून रात्रंदिवस कष्ट करून त्याचेच मागें न लागतां आरोग्य, ज्ञान, सद्वर्तन व प्रसंग पडला असतां त्यांतून पार पडून जाण्याचें सामर्थ्य या गोष्टी मुलांमध्यें असण्याविषयी तजवीज केली, तर त्यांचें व त्यामुळें समाजाचें विशेष हित होणार आहे. शारीरिक व मानसिक बलसंचय हा प्रथम संचय होय. हा संचय मुलांजवळ असेल, तर थोडे दिवसांत तीं दुसऱ्या प्रकारचा संचय करितील. परंतु दागदागिने, घरदार, शेतवाडी, वगैरे संचयानें आरोग्य, सद्वर्तन, उद्योगसातत्य, प्रसंगीं धैर्य, व पैसा मिळविण्याचें शहाणपण वगैरे गुण येण्याचा संभव कमी असतो. मुलांच्या शरिरांत

व मनांत सामर्थ्यसंचय करून ठेवणें हा महत्त्वाचा संचय करणें आहे. हा हेतु मनांत धरून उद्योग करणें शहाणपणाचें आहे. हा हेतु सिद्धीस नेण्यासाठीं जो संचय जरूर आहे, तो करणें श्रेयस्कर आहे. देशांत भांडवल पुष्कळ खेळूं लागलें व लक्षावधि रुपयांचा माल बाहेर जाऊं लागला, म्हणजे लोकांची स्थिति चांगली आहे, व देशाची भरभराट आहे, असें समजणारे पुष्कळ लोक आहेत; परंतु एवढ्याच कारणावरून विशेष गौरव करणें हीं कांहीं अंशीं चूक आहे. धनसंचय करणे तो प्रसंगीं उपयोगीं पडावा म्हणून आहे. परंतु लोकांजवळ सामर्थ्यसंचय नसेल, तर लाखों रुपयांच्या घडामोडी होऊन लाखों रुपयांचा संचय झाला, तरी त्यांस वस्तुतः प्रसंगीं फारसा उपयोग होणार नाहीं. सामर्थ्यसंचय असेल, तर लोक प्रसंगांतून पार पडून जातील. हा संचय असेल, तर शिकंदर बादशहा अथवा नेपोलियन, व जंगीजखान अथवा तैमूरलंग यांसारख्या सत्तालुब्ध अथवा धनलुब्ध महत्त्वाकांक्षी लोकांस तो एकाएकीं हरण करितां येणार नाहीं. जुलमानें अथवा आकस्मिक गोष्टीनें पैशाचा संचय हरण झाला, अथवा सत्ता हरण झाली, तरी लोकांत सामर्थ्यसंचय असेल, तर लोक थोडेच दिवसांत वर डोकें काढितील. इ. सन १७२०त साउथ सी बबलमुळें इंग्लंडांतील शेंकडों घरें धुळीस मिळालीं; परंतु थोडेच दिवसांत लोकांनीं वर डोकें काढिलें. इ. सन १८०६त जीना येथें लढाई करून नेपोलियन बादशहानें प्रशियन लोकांचा पाय लंगडा केला; परंतु त्यांनीं थोडेच दिवसांत डोकें वर केलें. इ.सन १८६४ त शेअरच्या व्यापारामुळें मुंबईचे पुष्कळ व्यापारी धुळीस मिळाले; परंतु मुंबईची हल्लींची स्थिति पूर्ववत् होऊं लागली आहे. इ. सन १८७०।७१ त फ्रेंच व जर्मन लोक ह्यांमध्यें लढाई झाली,

त्या वेळेस फ्रेंच लोकांपासून जबर खंडणी घेतली, म्हणजे त्यांचा पाय लंगडा होईल. असें जर्मन लोकांस वाटलें; परंतु फ्रेंच लोक आतां पूर्वस्थितीवर आले आहेत. याचें खरें बीज पाहूं गेलें असतां या निरनिराळ्या लोकांचें सामर्थ्य हेंच कारण होय, असें आपणांस दिसून येईल. बरें, उलटपक्षीं हिंदुस्थान देशांतील शेंकडों जहागिरदार, इनामदार व संस्थानिक जे धुळीस मिळाले, त्यापैकीं थोड्यांनीं वर डोकें केलें. याचें कारण हें कीं, त्यांच्यांत व त्यांच्या पदरच्या माणसात जो सामर्थ्यसंचय पाहिजे, तो नव्हता. अशा प्रकारचीं दोन्हीं प्रकारचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. या एकंदर हकीकतीचें तात्पर्य हें कीं, मुलांचे संबंधानें काय, समाजाचे संबंधानें काय, अथवा देशाचे संबंधानें काय, जी मुख्य गोष्ट लक्षांत ठेवावयाची, ती ही कीं, अंगी सामर्थ्यसंचय पाहिजे. हा संचय ज्या मानानें असतो, त्या मानानें मुलांची, अथवा समाजाची, अथवा देशाची स्थिति बरी किंवा वाईट आहे, असें समजावें. सामर्थ्यसंचय करून धनसंचय करून ठेविला, तर आपण कृतकृत्य आहों, व आपण आपलें कर्तव्य केलें, असें समजावें. सामर्थ्यसंचय करून न ठेवितां, फक्त धनसंचय केला, तर, आपलें वर्तन दोषास्पद आहे, असें समजावें. हें तत्त्व लक्षांत न ठेवितां आपण वर्तन केलें, तर मुलें त्याप्रमाणें करितील, व त्यामुळें त्यांचें अहित होण्याचा फार संभव आहे. वरील तत्त्व लक्षांत न आल्यामुळें किंवा त्याकडे दुर्लक्ष झाल्यामुळें हजारों लोकांचें नुकसान झालें आहे, व हा चुकीचा समज कायम राहील, तर पुढेंही नुकसान होण्याचा संभव आहे. म्हणून वरील तत्त्वाची परिस्फुटता जितकी होईल, तितकी करणें इष्ट आहे. मीं तुम्हांस, तुम्हीं दुसऱ्यास, दुसऱ्यानें तिसऱ्यास, अशा रीतीनें सर्वत्र या तत्त्वाचा बोध करणें हें आपणां सर्वांचें कर्तव्य आहे.

**शंकर रामचंद्र हातवळणे.** सद्बोधमंदिर.

## पाठ २३ वा.



### आरोग्याचा व यशाचा मार्ग.

प्राचीन काळच्या ऋषींची राहणी इतकी शुद्ध व साधी होती कीं, शंभर वर्षांहून अधिक कालदेखील ते जगत. ते असें समजत कीं, रोग म्हणजे केवळ ईश्वरी सूत्राचें उल्लंघन असून रोगी मनुष्य सकलांच्या उपहासास पात्र आहे. यासाठीं रोग हा क्रुद्ध झालेल्या देवाचा कोप आहे असें न मानतां आपल्या चुकीचें किंवा पापाचें तें प्रायश्चित्त आहे, असें समजावें; म्हणजे निरामयाची प्राप्ति आपणांस लवकर होईल. जे रोगास आमंत्रण करितात, त्यांकडेच तो येतो; ज्यांचें शरीर व मन रोगास अनुकूल असतें, तेच रोगी होतात.

क्रोध, जीविताचा कंटाळा, मत्सर, हव्यास अशा प्रतिकूल मनोवृत्तींच्या आधीन होऊन पूर्ण आरोग्याची आशा करणें, म्हणजे अशक्य गोष्टीचीच इच्छा करणें आहे. शहाणा मनुष्य अशा वृत्ति मुळींच टाळीत असतो; कारण तो असें जाणतो कीं, वाईट मोऱ्या किंवा दूषित घरें यांपेक्षांही अशा वृत्ति भयंकर आहेत. आपण भौतिक रोग व दुःखें यांपासून दूर राहावें, आणि पूर्ण अनामयाचा उपभोग घ्यावा, अशी इच्छा असेल, तर आपल्या चित्तास व्यवस्था लावून विचारांची जुळणी केली पाहिजे. मंगलदायक व प्रेमपूर्ण असेच विचार असावे, शुभेच्छारूपी अमृताचें अभिसरण सर्व नाड्यांतून होऊं द्यावें, म्हणजे दुसऱ्या औषधाची गरज नाहीं. मत्सर, त्रास, संशय हे टाकून दिले असतां पित्त, अपचन, अशक्तता, संधिवात वगैरे पळून जातील. या विनाशकारक व अनीतिवर्धक चित्ताच्या

संवयींस चिकटून राहिलें असतां, शरीर रोगग्रस्त झाल्याची तक्रार करण्यांत हंशील नाहीं.

पुष्कळ लोकांची तक्रार अशी असते कीं, अतिशय काम करावें लागत असल्यामुळें आपली प्रकृति ढांसळली आहे. बहुधा अशा स्थितीचें कारण असें असतें कीं, लोक आपल्या शक्तीचा दुरुपयोग करितात. तंटाबखेडा न करितां काम करण्यास शिकलें असतां शरीरप्रकृतीस कांही एक इजा होणार नाहीं. उगीच काळजी करीत बसणें, किंवा क्षुब्ध होणें, किंवा बारीकसारीक गोष्टीबद्दल विनाकारण त्रास करून घेणें, म्हणजे प्रकृतीच्या अस्वास्थ्याला आमंत्रण देणें होय. शारीरिक किंवा मानसिक कोणतेंही काम असो, त्यापासून फायदा होऊन आरोग्याचा लाभ होतो; आणि जो शांतीनें व सातत्यानें झटून काम करितो, काळजी किंवा त्रास करून घेत नाही, व हातीं घेतलेल्या कामाशिवाय ज्याला दुसऱ्या कशाची आठवण होत नाहीं, त्याच्या हातून जितकें काम होतें, तितकें उगीच धडपड व घाई करणाराच्या हातून घडत नाही; आणि दुसऱ्यांपेक्षां त्याची प्रकृति निरोगी राहाते.

चित्त निष्पाप झालें असतां शरिरास आरोग्य प्राप्त होतें इतकेंच नाहीं, तर मनुष्याच्या योजनेप्रमाणें सर्व कार्यें एकामागून एक घडून येतात. याकरितां विचारांची व्यवस्था लाविली असतां जीवितसुद्धां व्यवस्थित होतें. पूर्वग्रह व मनोवेग उत्तेजित झाले असतां त्यांवर शांतीनें दाब ठेवावा. म्हणजे संकटें आपला अंमल करीत नाहींत; आणि श्रद्धेची जोड मिळाली असतां कोणतीही विपत्ति येऊं शकत नाहीं. ईश्वरभक्तीनें पाहिजे तें चिरस्थायी कार्य सिद्धीस जातें. ईश्वरावर श्रद्धा, सनातन सूत्रावर श्रद्धा, अंगीकृत कार्यावर श्रद्धा, व तें काम सिद्धीस नेण्याबद्दल आपल्या सामर्थ्यावर

श्रद्धा—अशा भक्कम पायावर हवी ती इमारत उठेल, यांत संदेह नाहीं. अंतर्यामींच्या श्रेष्ठ प्रेरणेबरहुकूम चालणें, ईश्वरावर भक्ति ठेवणें, अंत:प्रकाशावर व विवेकबुद्धीच्या सांगणीवर विश्वास राखणें, निर्भयपणें व शांतीनें उद्योग चालविणें, ईश्वरीसूत्र अबाधित असून जें आपलें आहे, तें मनोरथाप्रमाणें खास मिळणारच, अशी खात्री बाळगणें, हीच श्रद्धा होय, हेच श्रद्धासंपन्न जीवित होय. अशा श्रद्धेच्या सामर्थ्यानें सर्व प्रकारचे संशय व अडचणी दूर होतात. याकरितां अम्हामान्स श्रद्धेची अमूल्य संपत्ति मिळविली पाहिजे; कारण याच रत्नापासून सौख्य, यश, शांति, सामर्थ्य हीं प्राप्त होतात. या श्रद्धेमुळें जीविताचें महत्त्व वाढून विपत्तीचा मुळींच अंमल चालत नाहीं. या श्रद्धेवर उभारलेली इमारत शाश्वत पायावर, शाश्वत द्रव्यांची बांधलेली असते, म्हणून ती कधी ढांसळत नाहीं; व मृत्तिकेमध्यें लय पावणाऱ्या द्रव्यांहून व पदार्थांहून ती श्रेष्ठ असते. विपत्तीच्या गर्तेमध्यें लोळत असतां, किंवा संपत्तीच्या शिखरावर उड्या मारीत असतां, या श्रद्धेवर अवलंबून राहाणें भाग आहे. कोणताही प्रसंग आला तरी श्रद्धेचा आश्रय सोडतां कामा नये. या श्रद्धेस चिकटून राहिलें असतां असें सामर्थ्य प्राप्त होईल कीं, तणेंकरून अशुभ शक्तींचें सहज निवारण होऊं शकेल, आणि प्रपंचामध्यें कधींही न मिळणाऱ्या यशाचा लाभ अवश्य होईल.

हीं प्रभावशाली श्रद्धा प्राप्त झाली असतां पुढें यश येईल किंवा अपयश येईल, याबद्दल संशय घेण्याचें मुळींच कारण नाहीं. अशा मार्गानें यश ठेवलेलेंच असतें. तसेंच परिणामाबद्दलसुद्धां काळजी नको. कारण सुविचार व सदुद्योग यांपासून चांगले परिणाम होणारच. नुसती इच्छा करण्यांत अर्थ नाही; कारण निराशा

होणारच. जशी राहणी असेल, तशीं फळें येतील. मूर्ख नुसती इच्छा करितात, आणि मग रडत बसतात; पण शहाणे लोक अगोदर उद्योग करितात, आणि मग परिणामाची वाट पाहातात.

यश, अपयश, सामर्थ्य, जीवित हीं सर्व आपल्याच हातांत असतात; कारण प्रबल विचारांमुळें दैव निश्चित होतें. याकरितां विशुद्ध, प्रेमळ, सुखकारक असे विचार बाहेर पडूं द्यावे, म्हणजे चोहोंकडून आशीर्वाद मिळतील, आणि आपल्या घरीं शांतता नांदेल. दुष्ट, अशुद्ध, दुःखकारक असे विचार बाहेर आले. तर आपणांवर शिव्याशापांचा पाऊस पडेल, आणि भय व त्रास यांमुळें झोंपसुद्धां येणार नाहीं. आपणच आपल्या नशिबाचे निःसंशय कर्ते आहों; मग तें नशीब कांहीं असो. आपलें अंतःकरण मोठें, प्रेमळ व निःस्वार्थपर केलें पाहिजे, म्हणजे आपलें सामर्थ्य वाढेल आणि निरंतर यश प्राप्त होईल. स्वार्थाच्या मर्यादेमध्यें चित्त अडकून राहील, तर आपण लक्षाधीश झालों, तरी आपलें सामर्थ्य व यश हीं अल्पच राहतील. यासाठीं आपलें चित्त शुद्ध व निःस्वार्थपर असूं द्यावें, आणि एक दिलानें श्रद्धेचा अवलंब करावा, म्हणजे आरोग्य व यश हीं प्राप्त होऊन महत्त्व आणि सामर्थ्य यांचाही लाभ होईल.

तुमची स्थिति तुम्हांला आवडत नसेल, किंवा कामांत मन लागत नसेल, तरीदेखील तुम्हीं आपलें कर्तव्य अत्यंत तत्परतेनें केलें पाहिजे. चांगली स्थिति प्राप्त होईल व चांगले दिवस येतील, अशी आशा तुम्हीं सर्वकाळ बाळगिली पाहिजे. कोणतेंही काम असलें, तरी त्यावर चित्ताचें ऐकाग्र्य करावें, आणि जितका उत्साह अंगीं असेल, तितका कामीं लावावा. लहान कामें बिनचूक करितां आलीं, म्हणजे मोठालीं कामें सहज मिळूं शकतात. हळुहळू वर चढावें, म्हणजे अधःपात होणार नाहीं; व हेंच खऱ्या सामर्थ्याचें बीज होय. साधनां-

चा व्यवस्थित उपयोग करण्यास शिकावें, आणि पाहिजे तेव्हां सर्व शक्ति एका बिंदूमध्यें आणण्याचा अभ्यास करावा. मूर्ख लोक भलभलत्या कामांमध्यें आपलें शरीरसामर्थ्य दवडितात, आणि हलकट भाषणांत, धंद्यांत, किंवा स्वार्थपर वादविवादांत आपलें मानसिक व आध्यात्मिक सामर्थ्य फुकट घालवितात.

जेव्हां इतर लोक एखाद्या मनोवृत्तीच्या किंवा मनोवेगाच्या स्वाधीन होतात, तेव्हां जो मनुष्य शांत व स्थिर असतो, तोच समर्थ समजावा. तसेंच, जो मनुष्य आत्मसंयमन करून आपल्या चित्तावर अंमल चालवितो, तोच दुसऱ्यास हुकूम करण्यास किंवा त्यावर दाब ठेवण्यास योग्य होतो. अविचारी, लहरी, भित्रे, हलकट अशा लोकांनीं दुसऱ्याचा आश्रय करून राहिलें पाहिजे; नाहीं तर त्यांचे हाल होतील. जे शांत, निर्भय, विचारी व गंभीर असतात, अशा लोकांनीं अरण्यांत किंवा पर्वतावर जाऊन एकान्ताचा आश्रय केला, तरी त्यांचें सामर्थ्य वाढतच जाईल, आणि मनुष्यमात्रास उद्विग्न करून टाकणाऱ्या चित्तप्रवाहास तेच लोक आवरून धरतील.

हरि गणेश गोडबोले. जीवितविद्या.

## पाठ २४ वा.



### स्त्रीशिक्षण.

**( ॲनी बिझांटबाईंचे विचार. )**

अशी एक म्हण आहे कीं, कोणत्याही देशांतल्या स्त्रियांच्या स्थितीवरून त्या देशाच्या एकंदर सुधारणेची किंवा उन्नतीची कल्पना करितां येते. ही म्हण जर खरी असेल, तर हा प्राचीन आर्यावर्त फार उन्नत अवस्थेला पोंचला होता, याबद्दल संशयच

रहात नाहीं. त्या काळीं स्त्रियांची स्थिति कशी होती, व त्या काळीं या भूमींत कशा योग्यतेच्या स्त्रिया निपजत होत्या, या गोष्टींचें मनन करा. जगाचा इतिहास वाटेल तितका धुंडाळा. जगाच्या वाङ्मयाचीं पृष्ठें वाटतील तितकीं उलथींपालथीं करा. परंतु तुम्हांस आर्यावर्तांतील ग्रंथसंग्रहांत किंवा वाङ्मयांत उपलब्ध होणाऱ्या स्त्रियांहून अधिक सुंदर, अधिक तेजस्वी, अधिक हृदयंगम स्त्रिया कोठेंही आढळणार नाहींत. मला वाटतें की, प्रत्येक उत्तम सद्गुण व हरएक जातीचें सौंदर्य एकत्र गोळा करून, मनुष्यरूपी मुशींत ओतून तयार केलेल्या त्या पुतळ्या, जणूं काय, मुद्दाम उंच जागीं देवानें ठेवून दिल्या आहेत. हेतु इतकाच कीं, सर्व जगानें त्यांजकडे पहातच राहावें !

ह्या थोर स्त्रियांपैकीं कांहींचीं नांवें पौर्वात्यांस व पाश्चात्त्यांस घरगुती नांवांप्रमाणेंच प्रिय व परिचित झालीं आहेत.

प्राचीन आर्यावर्तांतील स्त्रियांचीं चित्रें अत्यत रमणीय आहेत, व स्त्री-जातीचे उत्कृष्ट नमुने आर्यावर्ताच्या प्राचीन वाङ्मयांतच दृष्टीस पडतात. जगांत अन्यत्र कोठेंही त्यांहून चांगले नमुने दृष्टीस पडत नाहींत. ही गोष्ट पाश्चात्त्य ग्रंथकार, पंडित व तत्त्ववेत्ते यांनीं कबूल केली आहे. पाश्चात्त्य ग्रंथकारांच्या ग्रंथांतून पृष्ठेंच्या पृष्ठें अशीं दाखवितां येतील कीं, ज्यांवरून त्यांच्या मनांत स्त्रीजातीच्या उत्कृष्ट नमुन्यांचीं चित्रें कशीं बिंबून गेलीं आहेत, हें सहज कळून येईल. या व्याख्यानाच्या आरंभीं मला ही गोष्ट तुमच्या चांगली ध्यानांत आणून दिली पाहिजे.

इतर विषयांप्रमाणें या विषयांतही आधुनिक आर्यावर्तानें कोणकोणत्या बाबतींत आपल्या वर्तनक्रमांत बदल केला पाहिजे, हें समजण्याकरितां प्राचीन आर्यावर्तांत आढळणारे उत्कृष्ट नमुने

आपल्या ध्यानांत आणिले पाहिजेत. ज्याप्रमाणें भूतकालाची महती आपल्या लक्षांत येईल, ज्याप्रमाणें वर्तमानकालाची अवनति व दारिद्र्यावस्था आपल्या मनांत चांगली बिंबेल, त्या मानानें, आपण ज्या मार्गानें गेलें पाहिजे तो मार्ग आपणांस स्पष्ट दिसेल. पण हें सर्व प्राचीन काळांतील वैभव पुनः आपणांस परत मिळावें, अशी आपली इच्छा असेल तर! कारण, समाजसुधारणेसंबंधानें जे जे महत्त्वाचे प्रश्न आहेत, त्या प्रश्नांचा विचार करितां असें दिसून येतें कीं, प्रत्येक गोष्टींत बदल व्हावा, अशी इच्छा करणारा एक पक्ष आहे, व कशांतच फरक होऊं नये अशी इच्छा करणारा दुसरा एक पक्ष आहे. या दोन अप्रयोजक व व्यवहारानभिज्ञ पक्षांमध्यें आर्यावर्ताची भावी स्थिति लोंबत राहिली आहे! आपणांस प्राचीन नमुन्यांचें ज्ञान झाल्याशिवाय, किंवा जो इष्ट हेतु आपणांस साधावयाचा आहे तो हेतु, अथवा ज्या स्थानी आपणांस जावयाचें आहे त्या स्थानाप्रत नेणारा मार्ग कोणचा, हें कळल्याशिवाय कोणत्या सुधारणा घ्याव्या व कोणत्या टाकाव्या, हें कसें कळणार? या प्राचीन नमुन्यांच्या अनुरोधानें किंवा प्रेरणेनें चाललें असतां, आपल्या आचारांत केलेले फरक किंवा सुधारणा शहाणपणाच्या होणार आहेत व त्या नेटानें अंमलांत येणार आहेत. ज्या मानानें प्राचीन नमुन्यांचें सौंदर्य पाहून आपलीं अंतःकरणें त्यांजकडे ओढलीं जातील, त्या मानानें आपली जन्मदात्री जी आर्यभूमि तिला जगांतील इतर राष्ट्रांत योग्य अशा उन्नतदशेला पोहोंचविण्याविषयीं आपण समर्थ होऊं.

अज्ञान हें कोणत्याही राष्ट्राच्या उन्नतीला विघातक व देशहिताला धोका बसविणारें आहे. व स्त्रिया हें राष्ट्राचें अर्धें अंग आहे, ह्या दोन गोष्टी इतक्या उघड आहेत कीं, स्त्रियांना शिक्षण

द्यावें कीं नाहीं, याबद्दल ऊहापोह करण्याची कधींच जरूर पडूं नये. व्यक्तिविषयक सुख एका बाजूला ठेविलें व राष्ट्राच्या हिताकडेच जरी आपण पाहिलें, तरी असें स्पष्ट दिसतें कीं, राष्ट्रांतील माताच जर अज्ञानपंकनिमग्न असल्या, तर अर्थात्च त्यांची प्रजा हीनबुद्धि निपजणार; आणि ज्या अर्थी ती प्रजा म्हणजे त्या राष्ट्राचे भावी अवयव किंवा स्तंभ होत. त्या अर्थी त्या राष्ट्राच्या उन्नतीला उतरतीकळा लागणारच. एका अर्थी स्त्रियांच्या शिक्षणाला पुरुषांच्याही शिक्षणापेक्षां जास्ती राष्ट्रीय महत्त्व आहे. कारण, भावी पुरुषांना वळण लावण्याचें काम स्त्रियांचे हातांत असतें, आणि त्यांनीं दिलेल्या शिक्षणाचा परिणाम कधींही नाहीसा होत नाहीं. 'थोर पुरुषांच्या आयाही थोरच होत्या'. ही एक इंग्लंडांत म्हणच होऊन बसली आहे. शुद्धाचरणी, भक्तिमान् ,सुदृढ व शहाण्या आईच्या आचरणाचा परिणाम मुलावर किती होईल, याबद्दल पूर्ण कल्पनाच करिता येणार नाहीं. अज्ञान आईस आपल्या मुलाची प्रकृति कशी सुदृढ ठेवावी, हें माहीत नसतें; ती त्याच्या मनोविकारांस भलत्याच रीतीचें वळण देते; त्याच्या बुद्धीस कोतेपणा आणिते आणि त्याचें मन अप्रसन्न करिते. म्हणजे अध्यात्मविषयासंबंधानें ती त्यास पूर्ण अज्ञानांत ठेविते. कारण, ती अज्ञान असल्यानें तिला आरोग्याचे नियम माहीत नसतात; त्याच्या योगानें त्यांची बुद्धि विकास पावेल, असें शिक्षण त्यांस तिला देतां येत नाहीं; ती प्रेमास स्वार्थपरायणतेनें दूषित करिते व धर्मभोळेपणा म्हणजेच धर्म, असें त्यांस वाटावयास लाविते.

स्त्रियांना शिक्षण द्यावयास पाहिजे असें मानिलें, तरी कोणती शिक्षणपद्धति स्वीकारावी हा प्रश्न राहातोच; व हाच प्रश्न हिंदुस्थानांत प्रस्तुत फार महत्त्वाचा आहे. कारण स्त्रियांना शिक्षण

देण्याची आवश्यकता दिवसानुदिवस फार वाढत आहे. देशाच्या प्रस्तुत स्थितीला अयोग्य असें शिक्षण जर देण्यांत आलें, तर फार धोका बसण्याचा संभव आहे. कांहीं अंशीं असा प्रकार हल्लीं या देशांत चालूही आहे. इंग्लंडमध्यें 'उच्चप्रतीचें शिक्षण' या नांवाखालीं जें शिक्षण देतात, त्यांत व हिंदुस्थानांत जें शिक्षण दिलें जात आहे, त्यांत कांहींच फरक दिसत नाहीं.

अशा तऱ्हेचें शिक्षण इंग्लंडांतील लोकांस किती फायद्याचें किंवा तोटच्याचें आहे, ह्याबद्दल फार सांगतां येणार नाहीं. थोडक्यांत मला इतकें सुचवितां येईल की, जीवनार्थकलहात पुरुषांची बरोबरी करितां यावी, म्हणून आपल्याच श्रमांवर निर्वाह करणाऱ्या स्त्रियांना असल्या [illegible] आवश्यकता होती; आणि म्हणूनच त्याचा प्रचार इंग्लंडांत सुरू झाला. पोटासाठी श्रमांचा विक्रय करण्याचा प्रसंग आला असतां उत्तम प्रकारचें शिक्षण मिळून जीवनार्थकलहास तयार झालेल्या पुरुषांची बरोबरी अर्धवट शिकलेल्या स्त्रियांना करितां येईना; त्यामुळें त्यांस वेतन कमी मिळूं लागे. पोटाकरितां पुरुषांचींच कामें करून पुरुषांशीं चढाओढ करावी लागल्यामुळें तेथील बायकांनीं पुरुषांस मिळत असलेलें शिक्षण मिळविण्याचा निश्चय केला; व म्हणून पुरुषांचें जें उच्च शिक्षण, तेंच स्त्रियांचेंही उच्च शिक्षण बनलें, व पुरुषांप्रमाणेंच त्यांच्याही शिक्षणाचीं मुख्य चिन्हें 'डिग्रया' व 'डिप्लोमे' हीं बनलीं.

हिंदुस्थानांतील व्यावहारिक व सामाजिक स्थिति, आणि इंग्लंडांतील व्यावहारिक व सामाजिक स्थिति, यांमध्यें जर साम्य असतें, व तिकडच्याप्रमाणें अविवाहित स्त्रियांचे थवेच्या थवे जर इकडे पोटास मिळविण्यासाठीं धडपड करतांना आढळले असते, तर इंग्लंडांत ज्या शिक्षणाची गरज आहे, असें शिक्षण इकडेही

द्यावें, असें म्हणणें कांहीं तरी शोभलें असतें; पण हिंदुस्थानांत अशी स्थिति नाहीं, हें प्रत्येकाला ठाऊक आहे. अगोदरच एकमेकांवर वरचढ करण्याच्या इच्छेनें श्रमांची किंमत कमी होऊन चांगल्या सुशिक्षित पुरुषांनाही अगदीं भिकार रोजमुरा मिळतो. या सुशिक्षित पोट भरणाऱ्या पुरुषांच्या संख्येंत लाखों स्त्रियांची भर पडून त्यांची अहमहमिका किंवा जीवनार्थकलह वाढण्याचा इकडे मुळींच संभव नाहीं. पोटासाठीं भाकरी मिळविण्याचें काम ( जें करण्याचा प्रसंग इकडील स्त्रियांवर नाहीं ) करावयाची योग्यता देणारी इंग्लंडांतील शिक्षणपद्धति इकडे कां आणावी किंवा चालू करावी? ज्या शिक्षण-पद्धतीनें त्या उत्तम गृहिणी व माता होतील–आणखी हीच गोष्ट त्यांस अधिक श्रेयस्कर आहे–असें शिक्षण त्यांना कां न मिळावें? आर्यवृत्तीला व शीलाला अनुसरून असेल व जें परिणामीं हिंदुस्थानास हितकर होईल, असें शिक्षण द्यावें एवढेंच माझें म्हणणें आहे.

या शिक्षणपद्धतीची दिशा मी थोडक्यांत सुचवित्यें. ती अशी:—प्रत्येक स्त्रीला आपल्या जन्मभाषेचें पूर्ण ज्ञान असलें पाहिजे; मग ती जन्मभाषा हिंदी, बंगाली, तेलंगी, तामील, कोणची कां असेना. त्याचप्रमाणें, तिला त्या भाषेंत लेख लिहितां आले पाहिजेत. उदात्त व प्राचीन असें संस्कृत वाङ्मय, संस्कृत काव्यें आणि पुराणें सहज रीतीनें व जेणेंकरून तिला आनंद होईल अशा रीतीनें वाचतां येण्यासारखें संस्कृताचें ज्ञान तिला असावें. त्याचप्रमाणें शक्य असल्यास इंग्लिश भाषेचेंही ज्ञान तिनें संपादन करावें. त्याचा हेतु इतकाच कीं, त्या भाषेच्या ज्ञानामुळें इंग्रजी शिक-लेल्या आपल्या पतीविषयीं व मुलांविषयीं तिच्या ठायीं सहानुभूति उत्पन्न व्हावी. इंग्रजी भाषेच्या ज्ञानानें ज्यांपासून आनंद व बोध

प्राप्त होणारा आहे, अशा विचारांच्या प्रदेशांत तिला प्रवेश करितां येणार आहे. शिवाय, हिंदुस्थानांतील हल्लींच्या सुधारणेच्या कारणांपैकीं एका बलवत्तर कारणाशीं तिचा प्रत्यक्ष परिचय होणार आहे. राहण्याची जागा, स्वतःच्या संवयी व घरांतील इतर व्यवस्था वगैरेसंबंधाचे जे नियम—जे पाळिले असतां आरोग्याची वृद्धि करितात—त्या नियमांचें यथार्थ ज्ञान तिला असावें. दुखणेकऱ्याची नीटपणें शुश्रूषा करितां यावी व पडशाखोकल्यासारख्या लहान-सहान दुखण्यांत आपल्या मुलांस औषधपाणी देतां यावें, इतक्या-पुरतें शारीरशास्त्र व वैद्यक यांचेंही ज्ञान असावें. त्याचप्रमाणें कोणत्या तरी एका कलेचें ज्ञान, मुख्यत्वेंकरून संगीताचें, चित्रकलेचें आणि शिवणकामाचें ज्ञान झाल्यानें गृहिणीला आपलें घर साध्या व आल्हाददायक वस्तूंनीं आकर्षक करितां येईल; व तें निर्दोष व सुख-पूर्ण अशा वस्तूंचें स्थान होईल. मी नम्रपणानें असें सुचवित्यें कीं, असल्या तऱ्हेच्या शिक्षणानें हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या मोहकतेला व शीलाला धक्का न बसतां त्यांच्या बुद्धीचा विकास होईल. असें केल्यानें त्यांचें अंतःकरण शुद्ध होईल. त्यांची ग्रहणशक्ति वृद्धिंगत होईल. त्यांच्या मनांत भक्तिभाव उत्पन्न होईल, आणि त्यांच्या आत्म्यांना आपलें सत्स्वरूप ओळखून घेण्याची जिज्ञासा तृप्त करून घेतां येईल. हिंदुस्थानांतील स्त्रीची अध्यात्मपरता कधीही नाहींशी होणार नाहीं; परंतु तिच्या भक्तिमत्तेंत ज्ञानाचीही भर पडली पाहिजे. म्हणजे तिच्यांत साधुत्वाप्रमाणें ज्ञानीपणाही उत्पन्न होईल, व तिला आपला जो उदात्त असा प्राचीन धर्म त्याकडे आपल्या ज्ञानाचा व भक्तीचा उपयोग करून घेतां येईल; आणि वितंडवाद व नास्तिक्य यांच्या वाईट परिणामांपासून तिला आपल्या पतीचें व पुत्रांचें रक्षण करितां येईल. हिंदुधर्माच्या योगानें ती अजूनपर्यंत शुद्ध

राहिली आहे. त्याच धर्माच्या योगानें तिला पूर्वींच्या स्त्रियांप्रमाणें पुनः ज्ञानी झालें पाहिजे.

गो. वा. कानिटकर. स्त्रियांची परवशता, प्रस्तावना.

## पाठ २५ वा.



## संसार कीं वैराग्य ?

एके समयीं, तुकारामबोवा लोहगांवास येऊन रात्रीस घरोघर कीर्तनें करीत आहेत, असें ऐकून महाराज त्यांपैकीं एक श्रवण करावयास एकदां आपल्या बरोबरच्या लोकांसह गेले. कीर्तनास आरंभ होऊन पहिलें मंगलाचरणच अशा थाटानें सुरू झालें कीं, तें ऐकून महाराज अगदीं थक्क होऊन गेले. भाविक श्रोत्यांचीं चित्तें प्रेमभरानें उचंबळून जो तो देहभान विसरून टाळ्याचुटक्या वाजवीत व मुखानें विठ्ठलनामोच्चारण करीत नाचूं लागला. असा अद्भुत भक्तिरस महाराजांनीं पूर्वीं कधींही अनुभविला नव्हता. पुढें प्रतिपादन सुरू झालें. त्यांत तुकारामबुवांनी वैराग्यवृत्तीचें महत्त्व व लक्षण वर्णन करून, 'विठ्ठलावांचून ह्या विश्वामध्यें दुसरें कांहींच थोर नाहीं, आपल्या जीविताचें सार्थक ज्यास करावयाचें असेल, त्यानें विठ्ठलभक्तीचा सोपा मार्ग स्वीकारावा', असा अनेक दाखले देऊन व मधून मधून तात्कालिक स्फूर्तीनें प्रासादिक अभंग म्हणून श्रोत्यांस बोध केला. ऐहिक वैभवाची व ऐश्वर्याची अस्थिरता, विषयसुखाची अनर्थावहता व जीविताची क्षणभंगुरता श्रोतृवृंदाच्या मनांत पूर्णपणें ठसण्यासारखा त्यांचा तो बोध श्रवण करून महाराजांच्या चित्तवृत्तींत विलक्षण पालट झाला. ते मूळचे भाविक व सुवृत्त असल्यामुळें तुकारामबोवांचें तें बोधामृत-

प्रचुर वक्तृत्व श्रवण करून त्यांचें चित्त तल्लीन झालें; आणि त्यांच्या उपदेशानुसार वर्तन केल्यास निःसंशय कैवल्यप्राप्ति होईल, अशी त्यांच्या प्रेमळ व ऋजु अंतःकरणाची तत्काळ खात्री झाली.

कीर्तन आटोपल्यावर महाराज बावांचा निरोप घेऊन आपल्या मुक्कामास गेले व तेथून रानांत एकान्तीं जाऊन बसले, व बावांच्या बोधाचें मनन करूं लागले. ही त्यांची वृत्ति पाहून बरोबरचे कारभारी त्यांच्याकडे जाऊन, ही अशी उपरति ह्या वयांत आपणांस होणें उचित नव्हे, असा त्यांशीं बुद्धिवाद करूं लागले. हें त्यांचें बोलणें महाराजांनी मुळीं मनास आणिलें नाहीं. त्यांनीं त्यांस असें निक्षून सांगितलें कीं, 'तुम्ही कोणी माझ्याकडे येऊं नका. तुम्हांला वाटेल तशी माझ्या दौलतीची व्यवस्था करा. मला त्यांत इतःपर मुळींच मन घालणें नाहीं. आयुष्य क्षणभंगुर आहे. तें केव्हां संपेल याचा नियम नाहीं. यास्तव माझ्या जन्माचें सार्थक मला ह्या क्षणापासूनच करावयास लागलें पाहिजे. राज्य-साधनाच्या जंजाळास लागून मी मोक्षसुखास अंतरावें, हें मला मुळींच योग्य वाटत नाहीं'. हें महाराजांचें भाषण ऐकून कारभारी मंडळीस मोठी चिंता उत्पन्न झाली; आणि त्यांनीं ही सगळी हकीकत जिजाबाई मातोश्रीस लिहून कळविली. तेव्हां ती लागलीच शिबिकेंत बसून लोहगांवास आली, आणि पहिल्यानें तुकाराम-बाबांच्या दर्शनास जाऊन तिनें त्यांना हात जोडून व पदर पसरून अशी विनंती केली कीं, 'स्वामीमहाराज, माझा पुत्र शिवाजी आपलें कीर्तन ऐकून विरक्त झाला आहे, आणि संसाराचा त्याग करून वनांत जाऊन राहिला आहे. त्यानें संपादिलेलें राज्य आतां कोण संभाळील बरें ? तें पुन्हा यवनांच्या हातीं जाऊन गरीब हिंदु प्रजेस त्या विधर्मीयांचा जाच पुनरपि सोसावा लागेल. तेव्हां ह्या गोष्टीकडे

नजर पुरवून त्यास राज्यसाधनाचा उद्योग न सोडण्याविषयीं बोध करावा'. हें तिचें नम्रतेचें भाषण ऐकून तुकारामबावांनीं तिला आश्वासन दिलें आणि सांगितलें कीं, 'शिवाजीमहाराज नेहमींप्रमाणें आज रात्रीं कीर्तनास येतील, त्या वेळीं मी त्यांना दोन गोष्टी सांगून त्यांचें मन पुन्हा संसाराकडे लागेसें करितों'.

ह्याप्रमाणें व्यवस्था करून जिजाबाई रात्रीं बावांच्या कीर्तनास येऊन बसली. महाराजही नित्यनियमाप्रमाणें कीर्तनास आले. ह्या प्रसंगीं बावांनीं कर्मकांडाचें प्रयोजन काय आहे तें सांगून, ज्यानें त्यानें आपआपल्या धर्माप्रमाणें वर्तन करावें, यांतच खरें श्रेय आहे, असें प्रतिपादन केलें. हरिभक्तीसाठीं संसाराचा त्याग करून वनांत जाऊन बसण्याचें कांहीं एक कारण नाहीं. जनांत राहून आपला संसार नेकीनें व माणुसकीनें चालवून आपल्या बांधवांच्या सुखांत शक्त्यनुसार भर घालण्यास अहर्निश झटावें,यांत खरा मर्दपणा आहे. आपल्या सभोंवतालील जनांची सर्व प्रकारें वाईट स्थिति प्रतिक्षणीं दृष्टीस पडत असतां, अशा विपन्न जनांचा त्याग करून केवळ स्वमोक्षासाठीं गिरिकुहरांत जाऊन बसण्यात मुळींच पुरुषार्थ नाहीं. आणि स्वजनकल्याणहेतूनें संसारांत राहावयाचें म्हटलें, म्हणजे गृहस्थाश्रमासारखा दुसरा आश्रम मनुष्यास हितप्रद होणें नाहीं. जगास कंटाळून, बायकांमुलांचा त्याग करून व सर्वांगास राख फांसून जे विरक्त होतात, त्यांच्या हातून इंद्रियांचें दमन न होऊन ते पुनःपुन्हा मोहवश होतात, आणि जनांच्या अधिक्षेपास पात्र होतात. अशा विटंबना पावणाऱ्या मनुष्यास कोठेंच मान नाहींसा होतो व तो खऱ्या मोक्षसुखासही आंचवतो. तेव्हां तात्पर्य काय कीं, गृहस्थाश्रमाचा त्याग करून, गोसांवी बनून इतस्ततः भ्रमण करीत राहण्यापेक्षां संसारांत राहून नीतीनें वागावें, व परोपकार

आणि हरिभक्ति करण्यांत आयुष्य घालवावें, हें विशेष चांगलें. ह्याप्रमाणें सर्वसाधारण असा बोध करून तुकारामबावांनीं राजाच्या कर्तव्यासंबंधानें थोडेंसें विवेचन केलें. त्यांत त्यांनीं असें दाखवून दिलें कीं, राजा जर सदाचारी व प्रजापालनदक्ष असला, तर त्याच्या हातून लोककल्याण पुष्कळ होण्यासारखें असतें. पुराणांतरीं वर्णिलेल्या अंबरीष, जनक. धर्म आदिकरून राजर्षींचीं उदाहरणें देऊन त्यांनीं असें सिद्ध केलें कीं, हरिभक्ति व सद्वर्तन साध्य करण्यासाठीं राजानें-सुद्धां स्वराज्यत्याग करण्याची गरज नाहीं. हा असा अनेक दृष्टान्त देऊन मोठ्या कळवळ्यानें केलेला सद्बोध महाराजांनीं ऐकिला, तेव्हां त्यांची वृत्ति अगदीं तटस्थ होऊन गेली. बावांनीं केलेला एकदर बोध सत्य असून तदनुसार वागण्यातच वास्तविक हित आहे, असा त्यांच्या बुद्धीचा निर्धार झाला;आणि मग तुकारामबावांच्या व आपल्या मातोश्रीच्या चरणांवर मस्तक ठेवून ते स्वस्थानीं परत गेले; व आपला स्वराज्यसंपादनाचा स्तुत्य क्रम त्यांनीं पुढें चालविला.

कृ. अ. केळूसकर. छत्रपती श्रीशिवाजीमहाराज.

## पाठ २६ वा.



### मद्रास इलाख्यांतील आपलीं भावंडें.

इकडून मद्रास इलाख्यांत प्रथमतः जाणाऱ्या मनुष्यास जरा आश्चर्य करण्याजोगी गोष्ट म्हटली, म्हणजे त्या इलाख्यांतील **महाराष्ट्रलोकांचा समाज** ही होय. विलायतेंतील इंग्रज लोकांचें राज्य भरभराटीस आल्यावर, त्या लोकांचा पराक्रम इंग्लंडच्या बाहेर उतास येऊन, जशी 'ग्रेटर इंग्लंड'ची स्थापना झाली, त्या-

प्रमाणें मराठी राज्यासही एकदां ऊत येऊन महाराष्ट्रलोकांच्या वसाहती महाराष्ट्राबाहेर गुजराथ, माळवा, नागपूर, उत्तर-हिंदुस्थान वगैरे प्रांतांतून झालेल्या होत्या, ही गोष्ट मराठा इतिहासांत नमूद आहे. मद्रास प्रांतांतील वसाहत या वर्गांतील नाहीं ही वसाहत मराठी राज्याच्या संस्थापनेच्या काळींच झालेली आहे. व तिचें कारण मुख्यत्वेंकरून मराठी राज्यसंस्थापकाचे वडील शहाजी, यांचा विजापूरकरांशीं असलेला संबंध होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा भेद केवळ ऐतिहासिकदृष्ट्या आहे असें नाहीं, तर सामाजिक-दृष्ट्याही उत्तर-हिंदुस्थानांतील व दक्षिण हिंदुस्थानांतील महाराष्ट्र-वसाहतींत अशाच प्रकारचा भेद आहे. तो हा की, नागपूर, माळवा, ग्वाल्हेर, बडोदें वगैरे ठिकाणच्या महाराष्ट्रलोकांचे व महाराष्ट्रांतील लोकांचे शरीरसंबंधादि व्यवहार अद्यापि जसे चालू आहेत, तसे दक्षिण हिंदुस्थानांतील महाराष्ट्र-लोकांशीं चालू नाहींत. या कारणा-मुळें म्हणा, किंवा दुसऱ्या कांहीं कारणांकरितां म्हणा, मद्रास इलाख्यांतील या महाराष्ट्रसमाजास एक प्रकारचें निराळेंच स्वरूप आलेलें आहे. तंजावरचें राज्य कायम होतें, तेव्हां व्यंकोजीमहाराजां-बरोबर गेलेलीं महाराष्ट्र-घराणीं चांगल्या स्थितींत असलीं पाहिजेत, हें उघड आहे; पण त्या राजघराण्याच्या ऱ्हासानंतर उत्तर-हिंदु-स्थानांतील कांहीं महाराष्ट्र-संस्थानांतील घराण्यांप्रमाणेंच, मद्रास इलाख्यांतील महाराष्ट्र-लोकांसही उदरनिर्वाहाची निराळीं साधनें पहावीं लागलीं. तथापि अशा स्थितींतही या समाजामध्यें राजा सर टी. माधवराव दि. ब. रघुनाथराव, श्रीनिवासराव व नागोजी-राव, यांसारखे पुरुष निपजले, ही मोठी समाधानकारक गोष्ट आहे. मद्रास इलाख्यांत या लोकांस **'राव'** ही विशिष्ट संज्ञा असून, तिकडील ब्राह्मण, आयर, आयंगार किंवा आचार्य या संज्ञा आपल्या

नांवांपुढें लावतात. मद्रासेंतील महाराष्ट्र-लोकांची कांहीं गृहस्थांच्या साहाय्यानें मला बरीच माहिती मिळाली. एकदोन ठिकाणीं तर त्यांनीं राष्ट्रीय सभेस इकडून गेलेल्या महाराष्ट्र मुखत्यारांचा चांगलाच आदरसत्कार केला. दोनशें वर्षें भिन्न भाषा बोलणाऱ्या हिंदु-लोकांच्या समाजांत राहूनही या गृहस्थांनीं महाराष्ट्र-भाषेबद्दल जें साभिमान प्रेम कायम ठेविलें आहे, तें खरोखरच वर्णनीय आहे; व त्यावरून भिन्न परिस्थितींत आपलें वैशिष्ट्य कायम ठेवण्याचा महाराष्ट्र-समाजाचे अंगीं असलेला गुण चांगला निदर्शनास येतो. या समाजाचे इतिहासापासून जर कांही बोध घ्यावयाचा असला, तर तो हाच होय. आमचे इलाख्यांत महाराष्ट्र-भाषेचा अद्याप विश्वविद्यालयांत प्रवेश झालेला नाही. पण मद्रासच्या विश्वविद्यालयांत तिला आमच्या आधींच स्थान मिळालें आहे; व त्याचें कारण तिकडील महाराष्ट्र-लोकांची खटपट हें होय. या समाजांत महाराष्ट्र-भाषा जिवंत राहण्यास मुख्यत्वेंकरून स्त्रिया कारणीभूत झाल्या आहेत. धार्मिक कृत्यें बायकांमुळें कायम राहतात, अशी आमचेकडे म्हणण्याची वहिवाट आहे व त्यांत पुष्कळ तथ्यांशही आहे; पण केवळ धर्मकृत्यांची परंपराच नव्हे, तर परकीय प्रांतांत वसाहत करणाऱ्या लोकांत मातृभूमीचे आचारविचार व भाषा हीं स्त्रियांकडूनच कायम ठेविली जातात, असें मद्रासेंतील महाराष्ट्र-समाजाच्या स्थितीवरून चांगलें नजरेस येतें. या समाजांतील पुरुषांस व्यवहाराकरितां त्या त्या प्रांतांतील भाषा बोलावी लागत असल्यामुळें त्यांची मराठी भाषा बरीच अशुद्ध असते; व कुटुंबांतील स्त्रियांस जरी परकीय भाषेंत तितका व्यवहार करावा लागत नसला, तरी जन्मभूमीशीं संबंध तुटून पुष्कळ दिवस झाले असल्यामुळें, व एकंदरींत मराठींत व्यवहार करण्याचा प्रसंग कमी आल्यामुळें, त्यांचीही भाषा पुरुषां-

इतकी नसली तरी अशुद्धच असते. महाराष्ट्रांत गेल्या पांचपन्नास वर्षांत जे ग्रंथ झाले आहेत, त्यांचा या महाराष्ट्र-समाजांत फारसा प्रचार नाहीं. त्यांनीं आपली मराठी भाषा जी कायम ठेविली आहे, ती ज्ञानदेव, तुकाराम, वामन, मोरोपंत वगैरे कवींच्या ग्रंथांच्या वाचनानेंच होय. नवनीत आमच्याकडे स्त्रिया फारशा वाचीत नसतील, पण तिकडे बऱ्याच कुटुंबांतून तें वाचण्यांत येतें; इतकेंच नव्हे, तर या समाजांतील सर टी. माधवरावांसारख्या विद्वान् पुरुषांनींही, मोरोपंत किंवा वामनपंडित यांच्या धर्तीवर कांहीं पौराणिक कथाभाग घेऊन, लहान लहान काव्यें मराठींत प्रसिद्ध केली आहेत. अशा प्रकारचीं दहापांच काव्यें तिकडे माझ्या पाहण्यांत आलीं; व त्यांतील कविताही शुद्ध व बरीच सरस होती. अशा रीतीनें मातृभाषेवरील या लोकांचें असलेलें प्रेम पाहून मला बरेंच आश्चर्य वाटलें, व तुम्ही तंजावर किंवा मद्रास येथें इंग्रजी मराठी शाळा काढून आपल्या मुलांस महाराष्ट्र-शिक्षण कां देत नाहीं, असा मी त्यांचेपैकीं कांहीं गृहस्थांस प्रश्न केला. त्यावरून मला असें कळलें कीं, अशा प्रकारचे प्रयत्न मद्रासेस पूर्वीं झाले होते, परंतु तिकडील महाराष्ट्र-समाज एकाच शहरांत नसून चोहोंकडे फांकला असल्यामुळें, त्या प्रयत्नांस यावें तसें यश आलें नाहीं. तथापि तंजावर वगैरे ठिकाणीं अद्यापि जर इकडून एखादा गृहस्थ जाऊन आपण होऊन, आपल्या जबाबदारीवर पहिल्यानें इंग्रजी-मराठी शाळा काढील, तर त्यास बरीच मदत होईल असें वाटतें; कारण, या महाराष्ट्र-कुटुंबांतून महाराष्ट्र आचार-विचार व भाषा कायम ठेवण्याबद्दल पुष्कळ आस्था आहे असें दिसून येतें. इतकेंच नव्हे, तर इकडून त्या प्रांतांत कोणी महाराष्ट्र-गृहस्थ गेला असतां त्यास ते अद्याप आपलासा समजतात. या लोकांचा महाराष्ट्राशीं पूर्वीं असलेला

संबंध चिरकाल कायम राहण्याचें खरें साधन म्हटलें म्हणजे इकडील व तिकडील लोकांचा शरीरसंबंध सुरू होणें, हें होय. अशा प्रकारची आपली इच्छा आहे, असें तिकडील बऱ्याच लोकांनीं मला कळविलें होतें; व मीही हा तुमचा निरोप महाराष्ट्रांतील लोकांस कळवीन असें आश्वासन दिलें होतें. त्याप्रमाणें आजच्या प्रसंगीं ही गोष्ट मुद्दाम प्रथमतः मी आपल्यापुढें मांडीत आहें.

बा. गं. टिळक. व्याख्यान.

---

## पाठ २७ वा.



### माझिनीचा स्वभाव.

माझिनीच्या चरित्रांत करुणरस ओतप्रोत भरलेला आहे. त्याची प्रकृति अत्यंत नाजूक असल्यानें वारंवार त्यास दुखणीं येऊन पीडा सोसावी लागत असे. देशोन्नतीचा हृद्रोग त्यास लागून त्याचें काळीज करपून गेलें होतें. इटालियन राष्ट्रांत वसत असलेल्या सद्-गुणांची तो केवळ मूर्तिच होता. तरीदेखील सर्व राष्ट्राचा त्याज-विषयीं फार गैरसमज झालेला होता. तथापि तो डगला नाहीं. मोठ्या हिय्यानें त्यानें तुमुल युद्ध सुरू ठेवून अखेरीस जय मिळविला. आणीबाणीच्या वेळीं क्वचित् प्रसंगी त्याची बाजू घसरल्यासारखी दिसे, परंतु तो पुन्हा ती सांवरून घेई. स्वसंरक्षणाचें त्याचें हत्यार म्हटलें, म्हणजे त्याचें निर्मळ आणि पवित्र असें अंतःकरणमात्र होतें. त्याचा ईश्वरावर पूर्ण हवाला होता; व आपलें कर्तव्य एक-निष्ठेनें करावें, तें करतांना दुनियेची पर्वा करूं नये, हें त्यास चांगलें ठाऊक होतें. ऐहिक मोहक वस्तूंचा त्याच्या मनावर मुळींच पगडा

चालत नसे. हिऱ्याच्या किसानेंमात्र हिरा घांसला जातो. माझिनीच्या अंगीं आपल्या इच्छेस स्वाधीन ठेवण्याचें सामर्थ्य फार जबरदस्त होतें. त्याची सहनशक्ति फार पराकाष्ठेची होती. त्याचा एकदां झालेला निश्चय कल्पान्तींही ढळत नसे. त्याच्या वृत्तींत उच्छृंखलपणा अगदीं नव्हता. स्वतःच्या अंतःकरणप्रवृत्तीस प्रमाण मानून जगाकडे लक्ष न देतां, एका देवावर भिस्त ठेवणाऱ्या थोर लोकांच्या पंक्तीस बसण्याची त्याची योग्यता होती. तो प्रेमळ स्वभावाचा होता. स्वतः-च्या निःस्वार्थपणामुळें आपल्या बरोबरीच्या इतर लोकांपेक्षां आपण वरचढ आहों, असें जरी त्यास वाटे, तथापि भविष्यकाळी मनुष्य-जात उच्च पदास जाऊन पोंचणार आहे, म्हणून तीवर त्याचें प्रेम फार असे. तथापि त्याच्या आजूबाजूस जीं माणसें होतीं, त्यांपैकीं फारच थोड्यांविषयी त्याचें मत चांगलें होतें; आणि अशा लोकांशी त्याचें अंतःकरण मोकळें असणें शक्यच नव्हतें. सर्व लोकांनीं आपा-पलें कर्तव्य करणें, ह्यांतच सर्व मनुष्यजातीचें कल्याण आहे, असें समजून त्याप्रमाणें आचरण करूं लागणें व त्यायोगें भूगोलरचना-परत्वें झालेले राष्ट्रांचे व देशांचे भेद मोडून जाऊन, सर्व मानवजातीनें एका आईबापांच्या लेंकरांप्रमाणें गुण्यागोविंदानें नांदणें, ही उदात्त कल्पना त्याच्या डोळ्यांपुढें अहर्निश उभी होती.

माझिनीला सर्व आयुष्यामध्यें प्रापंचिक सुख माहीत नसल्यानें स्वतःसंबंधाच्या गोष्टींस तो कधींच महत्त्व देत नसे. त्यास अन्यायाचा तिरस्कार असून न्यायाची अत्यंत आवड असे. मृत्यु आज येवो किंवा शंभर वर्षांनीं येवो, परंतु जन्मास आलेल्या प्राण्यास तो येणार खचित; तेव्हां तसल्या अपरिहार्य गोष्टीविषयीं विचार करीत न बसतां जन्मास आल्याचें कांहीं तरी सार्थक करण्यास झटावें असें

त्यास वाटत असे. त्यामुळें कोणत्याही क्षणीं मृत्यु येणार असला, तरी तो त्याबद्दल निर्भय व निर्धास्त असे. "बोले तैसा चाले" या तुकोबाच्या वचनाप्रमाणें स्वतःच्या उपदेशास अनुसरून त्याचें वर्तन असे. त्याच्या हातांत लेखणी आली, म्हणजे ती तरवारीची बरोबरी करीत असे. प्रपंचार्णवामध्यें प्रचंड झंझा-वातानें हवें तसें तुफान झालें, तरी त्यास न जुमानितां जे तीरा-प्रमाणें पार जातात, त्या थोर पुरुषांची योग्यता माझिनीच्या अंगा होती. स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीशिवाय तो कधींही कोणास नमला नाहीं. एखाद्या महत्कार्याच्या कल्पनेचा प्रथम मानसिक क्षितिजावर उदय व्हावा, व ती वाढत जाऊन इंद्रियें, मन आणि बुद्धि या सर्वांस व्यापून टाकावें आणि अखेरीस त्या पुरुषाचें तिजशी जसें तादात्म्य व्हावें, त्याचप्रमाणें माझिनीची स्थिति झाली होती. सर्व मानवजातीचा पुढाकार इटाली देशाकडे आणून तो इतर सर्व राष्ट्रांस सन्मार्ग दाखविणारा होईल असें करणें, ही प्रचंड कल्पना त्याच्या मनांत उद्भवली होती; परंतु ती त्याच्या आयुष्यांत खरी करून दाखवितां येईना, तेव्हां त्याच्या आत्म्यास वेदना होऊं लागल्या. त्याच्या विशाळ बुद्धीस त्या कल्पनेचें तेव्हांच ग्रहण झालें; परंतु तें इतरांस होईना, तेव्हां अर्थातूच त्यास तळमळ लागली, व हिऱ्याच्या किसानें हिऱ्यास घासावें, त्याचप्रमाणें त्याच्याच मनांत उद्भवलेली कल्पना त्याच्याच मनास ग्रासूं लागली.

त्याची राहाणी एखाद्या विरक्त पुरुषाप्रमाणें असून तो आपल्या शरिरास अगदी जपत नसे. तथापि त्याचें अंतःकरण एखाद्या स्त्री-प्रमाणें कोमल असे. त्याचा बांधा सुरेख असून तो नाकाडोळ्यांनीं अगदीं नीटस होता. त्याचे डोळे पाणीदार असून त्यांत त्याच्या मनोवृत्ति एखाद्या आरशाप्रमाणें प्रतिबिंबित दिसत. त्याचें हास्य तर

इतकें मनोहर असे कीं, त्याचें वर्णन करतां येत नाहीं. ह्या सर्व गोष्टींमुळें माझिनीचें स्वरूप फारच मनोरम असून, त्याची आबालवृद्धांवर ताबडतोब छाप बसत असे.

रा० घाणेकर. माझिनीचें चरित्र.

---

# पाठ २८ वा.



## सविता.

**ज्योतिषां रविरंशुमान्।**

" सर्व ज्योतींमध्यें भास्वान् रवि [ तो ] मी."

—गीता, १०–२१

या भगवद्वाक्याप्रमाणें आमच्या वैदिकधर्मी लोकांच्यामात्र दृष्टीनें तो परमेश्वराची विभूति आहे असें नाहीं; तर आजपर्यंत जगांत सूर्यदेवाची आराधना करणारीं अनेक राष्ट्रें झालीं; आणि शास्त्रीय शोध जसजसे वाढत आहेत तसतसा सूर्याचा प्रभाव अधिकाधिकच दिसून येऊन सूर्याच्या ठायीं परमेश्वराचें विभूतिमत्त्व अधिकाधिक प्रत्ययास येऊं लागलें आहे.

पृथ्वीवर सजीव म्हणून जें जें आहे, त्यास सूर्याचा आश्रय आहे. ग्रहमालेचा अधिप मोठ्या कृपेनें जो प्रकाश आणि उष्णता देतो, त्यांवर त्याचें अस्तित्व अवलंबून आहे. सूर्य एखादे दिवशीं प्रकाशण्यास विसरला तर काय अवस्था होईल ? हजारों जीव नाश पावतील व लक्षावधि प्राणी विपत्तींत पडतील. सूर्यानें चारपांच दिवस विश्रांति घेतली, तर सगळ्या प्राण्यांस अक्षय विश्रांति घेण्याचीच पाळी येईल. सूर्यानें आपले बारा डोळे उघडले किंवा सहस्र नेत्रांनीं तो प्रकाशूं लागला, तरीही वरच्यापेक्षां भयंकर परिणाम होईल.

उन्हाळ्यामध्यें अतिताप होऊं लागला, म्हणजे केव्हां एकदां पाऊस पडेल असें आपल्यास होतें. मेघ आपल्यास शांत करितात, जीवन देतात; इतकेंच नाहीं, तर जीवनोपयोगी पदार्थ पिकवितात. परंतु हे मेघ उत्पन्न होतात सूर्यापासूनच, हें आपण लक्षांत आणीत नाहीं. उन्हाळ्यास आपण त्रासतों, तशी थंडी फार पडली तर तीही आपल्यास नकोशी होते. परंतु उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा असे निरनिराळे ऋतु होतात, म्हणून आपला सर्व व्यापार चालतो; आणि हे ऋतु करणारा सूर्यच होय.

प्रकाश आणि उष्णता ह्यांच्या योगानें "सूर्य स्थावराचा आणि जंगमाचा आत्मा आहे," अशी पूज्यबुद्धि आपल्या मनांत उद्भवते; त्याचप्रमाणें सूर्य आपल्या विलक्षण प्रभावानें आपल्या भूलोकाला अधांत्रीं आकाशांत ओढून धरून आपल्याभोंवतीं फिरण्यास लावितो, हेंही आपण लक्षांत आणिलें पाहिजे. वीतभर रुंद दिसणारें एवढेसें बिंब, परंतु तें आपल्या या पृथ्वीच्याहून शेंकडों पट मोठ्या गोलासही पृथ्वीच्या हजारों पट अंतरावरून आपल्याभोंवतीं फिरवितें वेसण घालून बैलास धरावें, तसें अदृश्य वेसणीनें सूर्य पृथ्वीला धरितो. तें त्यानें न धरिलें तर काय होणार आहे, असें आपल्यास वाटेल. परंतु ही वेसण सुटली तर पृथ्वी कोणीकडच्या कोणीकडे जाऊन तिची काय अवस्था होईल, ह्याची कल्पनाही करवत नाहीं.

रात्रीस सूर्य नसतो, तरी पृथ्वीच्या दुसऱ्या अंगास त्याचा व्यापार चाललाच असतो. त्याजपासून उष्णतेचा वर्षाव सतत सर्व दिशांनी होत असतो. पृथ्वीवरील चराचर वस्तूंचें रक्षण आणि पोषण होण्यास किती उष्णता लागत असेल, याची कल्पना करा. परंतु सूर्यापासून निघणाऱ्या उष्णतेचा दोन अब्जावामात्र हिस्सा

काय तो पृथ्वीस मिळतो. यावरून सूर्यापासून किती उष्णता बाहेर पडते, याचें अनुमान होईल.

आपला हा महाराष्ट्र देश आपल्यास किती मोठा वाटतो? कोणीकडे धारवाड आणि कोणीकडे खानदेश! कोणीकडे कोंकण आणि कोणीकडे सोलापूर! परंतु पृथ्वीशीं लावून पाहिला असतां महाराष्ट्र देश म्हणजे कांहीच नाहीं. पृथ्वीचा एक लहानसा गोल केला असतां त्यावर महाराष्ट्र देश एक लहानसा ठिपका दिसेल, इतकी मोठी पृथ्वी आहे. जलद चालणाऱ्या आगीच्या बोटींत आपण बसलों, आणि ती आगबोट रात्रंदिवस चालली, तरी मुंबईहून निघून पृथ्वीप्रदक्षिणा करून परत येण्यास षण्मास पाहिजेत. इतका या पृथ्वीचा घेर आहे. परंतु सूर्य इतका मोठा आहे कीं, अशा १३ लक्ष पृथ्व्या एकत्र कराव्या, तेव्हां सूर्याएवढा गोळा होईल. दर तासास ३० मैलांप्रमाणें रात्रंदिवस चालणाऱ्या आगगाडीला सूर्याभोंवती एक फेरा करून येण्यास सव्वानऊ वर्षें पाहिजेत.

सूर्याच्या आंगीं पृथ्वीला आकाशांत आपल्याभोंवतीं फिरण्यास लावण्याजोगें बळ आहे, तें केवळ त्याच्या आकारावर नाहीं. पुष्कळ धूमकेतु सूर्याहूनही आकारानें मोठे असतात, परंतु त्यांच्या आंगीं आकर्षणशक्ति मुळींच नसते. सूर्याचें प्रकृतिद्रव्य पृथ्वीइतकें दाट नाहीं; सुमारें चवथाई विरल आहे. तरी त्याचें एकंदर द्रव्य मोजलें, तर पृथ्वीच्या सव्वातीन लक्ष पट त्याचें वजन आहे. सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या सगळ्या ग्रहांचें घटक-द्रव्य एकत्र केलें, तरी त्याच्या ७५० पट सूर्य आहे. म्हणूनच कोट्यावधि कोसांवरून तो त्यांस आपल्याभोंवतीं प्रदक्षिणा घालण्यास लावितो. त्यांत कधीं चूक पडते, किंवा कोणी एखादा कधीं थांबतो काय? एखादें घड्याळ, आपण आठ दिवसांची किल्ली देऊन

ठेविली, तरी एखादे वेळीं दुसऱ्याच दिवशीं बंद पडते. परंतु आमच्या सूर्याभोंवतीं पृथ्वीहून लहानमोठे एकंदर ८ ग्रह फिरत आहेत. जे जवळ आहेत, ते जलद फिरतात; दूर आहेत, ते सावकाश फिरतात. ह्या सगळ्या घड्याळास परमेश्वरानें किल्ली कधीं दिली आणि ती किती दिवस पुरेल, ह्याचा बरोबर अजमासही कोणाला नाहीं.

चंद्राहून पृथ्वी मोठी आहे, आणि तिच्याहून सूर्य फारच मोठा आहे, असें असून तो चंद्राएवढाच दिसतो, हें कसें? अशी सहज शंका येईल. तर हें सूर्याच्या अतिदूरत्वामुळें होतें. पृथ्वीपासून सूर्य किती दूर आहे, ह्याविषयीं १५० वर्षांपूर्वीं कोणास कल्पनाही नव्हती. हें अंतर काढण्यास निरनिराळ्या राष्ट्रांचे लक्षावधि रुपये आणि अनेक ज्योतिष्यांचे प्रयत्न खर्चीं पडले आहेत. सूर्यबिंबाचें अतिक्रमण शुक्र अमुक दिवशीं करणार, असें भविष्य अगोदर करून त्यावर भरंवसा ठेवून तो दिवस आला, कीं कोणी पृथ्वीच्या ह्या टोंकास धावतात, कोणी त्या टोंकास जातात. कोणी आमच्या देशांत येऊन जातात; तरी आम्हांस त्याची दादही नसते. इ. सन १७६१ आणि १७६९ या वर्षीं झालेल्या अतिक्रमणांवरून सूर्याचें अंतर बरेंच सूक्ष्म समजलें. इ. सन १८७४ आणि १८८२ च्या अतिक्रमणांनीं त्याहून सूक्ष्म ठरलें. अतिक्रमणांशिवाय दुसऱ्याही दोनतीन रीतींनी हल्लीं हें अंतर काढिलें आहे. तरी अद्यापि त्यांत दोनतीन लक्ष मैलांची चुकी असण्याचा संभव आहे. जेथें कोटींनीं गणना होणार तेथें दोनतीन लक्षांची चूक कांहीं फार नाहीं. पुण्याहून मुंबईस चार तासांत पोंचेल अशा स्पेशल ट्रेनमध्यें बसून आपण सूर्याची यात्रा करण्यास निघूं या. वाटेंत उतरण्यास स्टेशन नाहीं, म्हणून स्नानादिकांची तजवीज आपल्यास गाडींतच

केली पाहिजे. ती केली म्हणजे गाडीला विसांवा देण्याचें कारणच नाहीं. याप्रमाणें आपण दर अहोरात्रींत ७२० मैल प्रवास केला, तर इ. सन १९०४ च्या आरंभीं आपण निघाल्यास सूर्यदर्शन घेऊन परत येऊं तों इ. सन २६०६ साल येईल. सूर्य प्रसन्न होऊन आपल्यास इतकें दीर्घायुष्य देईल, तरी मृत्युलोकीं आमच्या वंशजांच्या २७ पिढ्या गुजरून पिढ्या तोडण्याची पाळी येईल. इतकें हें अंतर आहे, तरी आकाशांतील अंतरें मोजण्याची ज्योतिष्यांची ही काठी आहे. हिमालय हा पृथ्वी मोजण्याचा मानदंड आहे, असें कालिदासानें म्हटलें आहे. एखाद्या भिंतीची लांबी मोजण्यास आपण एखादी हातभर लांब काठी घेतों किंवा फूट घेतों. हिमालयाइतकी काठी म्हणजे किती विलक्षण, असें मनांत येऊन आपण आश्चर्यचकित होतों. परंतु ९,२३,००,००० मैलांच्या मानदंडापुढें पृथ्वीवरच्या अती मोठ्या मानदंडाचा काय पाड !

शं. बा. दीक्षित. ज्योतिर्विलास.

---

## पाठ २९ वा.



## वक्त्याचे गुण.

वरील गुणांत पहिला म्हटला असतां मनाचा शुद्धपणा, म्हणजे ज बोलणें तें केवळ मनापासून व मनाची पूर्ण खात्री होऊन बोलणें, हा होय. वरील गुण कवीसही आवश्यक आहे. कारण, कवि व वक्ता या दोघांचाही उद्देश हृदयवृत्तीस क्षोभ उत्पन्न करावयाचा असल्यामुळें त्यांचे गुण पुष्कळ अंशीं एकमेकांशीं मिळतात. दोघांत मोठा भेद इतकाच आहे कीं, वक्त्यास तर्कशास्त्राचाही जसा अवश्य प्रयोग करावा लागतो, तसा कवीस लागत नाहीं. चित्ताचें रंजन

होऊन अंतःकरणांत रसाविर्भाव झाला, म्हणजे झालें कवीचें काम; मग त्यानें वर्णिलेल्या गोष्टी निवळ खोट्या असल्या, व केलेलें प्रतिपादन अगदीं चुकलेलें असलें, तरी कांहीं हरकत नाहीं. पण वक्त्यास दोन्हीं संभाळावीं लागतात. नुसतें मनोरंजन झालें व हृदयास मोठा द्रव येऊन डोळ्यांवाटे अश्रुधारा चालल्या, तर तेवढ्यानेंच कार्य झालें असें नाहीं. जे बुद्धीचे कोते असतील, व युक्तिशून्य असतील, त्यांस वरच्यासारखी भाषणें यथार्थ वाटतील खरीं; पण सदसद्विवेचनानें ज्यांच्या बुद्धीस रुक्षता व प्रखरत्व हीं आलीं असतील, त्यांस वरील प्रकार मुळीच मान्य न होऊन तो त्यांस उलटा तिरस्कारास्पद व उपहास्यही वाटेल. असो. तर कवींत व वक्त्यांत हा विशेष आहे. तरी ज्या पक्षीं वक्तृत्वाचा मुख्य भाग श्रोत्यांचीं अंतःकरणें वश करून घेणें हाच होय, त्या पक्षीं वरील स्वानुभव कवीस जसा अवश्य होय, तसाच तो वक्त्यासही होय. पण तो पूर्णपणें होणें हें वरील शुद्धतेखेरीज संभवत नाहीं. कालिदासानें म्हटलें आहे: —

छाया न मूर्च्छति मलोपहतप्रसादे।
शुद्धे तु दर्पणतले सुलभावकाशा॥

"मळानें ज्याचा स्वच्छपणा नाहींसा झाला आहे, अशा आरशाच्या भिंगावर छाया नीट उठत नाहीं, पण तेंच शुद्ध म्हणजे निर्मळ असेल. तर तिचा प्रवेश आंत सहज होतो." तर हीच गोष्ट मनुष्याच्या मनासही लागते. ज्याच्या मनावर दंभ, स्वार्थबुद्धि, वगैरे दुर्विकारांचें पटल सांचलें नसेल, त्याच्याच ठायीं कोणतीही थोर मनोवृत्ति यथास्थित प्रतिबिंबित होईल; आणि तसें झालें असतां प्रकाशकिरणांच्या धर्माप्रमाणें तिचें परावर्तनही तसेंच निर्मळ पडेल!

असो. तर याप्रमाणें मनाचें शुद्धत्व हा वक्त्यास अवश्य असणाऱ्या गुणांपैकीं पहिला होय. जें श्रोत्यांस सांगावयाचें, तें वक्त्यास पूर्णपणें भासून त्यानें अंतःकरणाच्या केवळ कळवळ्यानें जर प्रकट केलें नसेल, तर तें ऐकणारांच्या हृदयांत विशेष म्हणण्यासारखा विकार करील हे मुळींच संभवत नाहीं. त्यानें ओढूनताणून आणलेल्या आवेशास कांहीं अतज्ज्ञ लोक कदाचित् भुलून जाऊन फसतील; पण खऱ्या मार्मिक श्रोत्यास केवळ लटपटपंची केल्यानें लेशमात्रही द्रव येणार नाहीं. यास्तव 'पुराणातील वांगीं पुराणांत', असा कपटभाव मनांत धरून जो वक्तृत्व करील, त्यानें तें न केलेलें बरें; कारण तशानें त्याचे श्रम तरी वांचतील. आपल्या भाषेंत एक उत्कृष्ट म्हण आहे, कीं 'जाळावांचून कढ नाहीं, आणि मायेवांचून रड नाहीं'. तर या लहानशा वाक्यांत येथवर सांगितलेल्या सर्व गोष्टींचा थोडक्यांत समावेश होतो.

वक्त्याच्या अंगीं अवश्य पाहिजे असा दुसरा गुण विद्वत्व होय; म्हणजे ज्याविषयीं बोलावयाचें त्या विषयाची पूर्ण माहिती असून साधकबाधक प्रमाणें त्यास सारीं अवगत पाहिजेत. शिवाय अनेक ग्रंथांच्या अवलोकनानें जें बहुश्रुतत्व आंगीं येतें, तेंही त्यास अनुकूल पाहिजे. अशी सर्व सामुग्री असली म्हणजे ज्या विषयावर बोलावयाचें, त्याचें त्यास परिपूर्णतेनें उद्घाटन करतां येऊन श्रोत्यांचें मन संशयमुक्त होतें व केलेलें भाषण त्यांच्या हृदयांवर पूर्णपणें ठसतें.

वरच्याखेरीज सहृदयत्व, तार्किकता, विषय जुळविण्याची शैली, अर्थविशदत्व, वगैरे जे कित्येक गुण उत्तम वक्त्याचे ठायीं अवश्य असले पाहिजेत, त्यांविषयीं येथें आणखी सविस्तर लिहीत नाहीं. कां कीं, वर सांगितलेल्या दोन्ही गुणांत त्यांचा बराच समावेश होतो; व त्यांचें स्वरूप उत्तम भाषणांकडे नीट लक्ष पुरविलें असतां

सर्वांच्या ध्यानांत तेव्हांच येणारें आहे. शिवाय समग्र विषयाचें श्रोत्यांस सुखानें ग्रहण करितां येईल, अशी त्याची रचना कशी करावी, व त्यावर केलेलें प्रतिपादन सर्वांस सुबोध होण्यास काय करावें, याविषयीं नियम सांगणें कठिण आहे. अशा पुष्कळ गोष्टी असतात कीं, त्या चांगल्या करतां येणें हें केवळ अनुकरणसाध्यमात्र असतें; त्याविषयीं नियम म्हटले म्हणजे करतांही येत नाहींत, व केले तर ते सर्वव्यापक होत नसल्यामुळें त्यांपासून तादृश उपयोगही होत नाहीं. तर अशा प्रकारच्याच वरील दोन गोष्टी होत. यास्तव ज्या कोणांस त्या शिकणें असतील, त्यांनीं प्राचीन व अर्वाचीन काळच्या महावक्तच्यांचीं भाषणें लक्षपूर्वक वाचावीं व त्यांवर मनन करावें, एवढाच काय तो चांगलासा उपाय आहे.

याप्रमाणें वक्त्याच्या अगीं स्वभावतःच जे गुण असले पाहिजेत, त्यांचें निरूपण झालें. आतां सरते शेवटीं या कलेपासून उपयोग काय, याविषयीं लिहून प्रस्तुत विषय आटपतों. हा उपयोग दोन तऱ्हेचा आहे. एक व्यक्तिदृष्टचा व दुसरा लोकदृष्टचा. व्यक्तिदृष्टचा प्रस्तुत कलेचा उपयोग उघडच आहे, कीं ती ज्याच्यापाशीं वसत असते, तो सर्वांस प्रिय व सन्मानार्ह होतो. अशा मनुष्याचा सहवास करण्याविषयीं लोक नेहमीं उत्सुक असतात, व आपल्या भाषणाच्या मोहनीनें तो सर्वांचीं चित्तें आपणांस वश करून घेतो. शिवाय हा गुण त्यास मोठा अलंकारही होतो हा सहज अलंकार त्यास श्रमां- शिवाय व निर्भयपणें धारण करतां येऊन यावज्जन्म त्यास शोभा- दायक होतो. पण इतकेंच नव्हे, एखाद्या शूर सरदारास त्याच्या कमरेस लटकलेली तरवार जशी केवळ शोभाच देते असें नाहीं, तर त्याच्या सामर्थ्याची ती निशाणी असून, तिची लकाकी शत्रूंच्या

काळजांस थरारवीत असते, त्याचप्रमाणें वाक्शास्त्राचें तीव्रत्वही प्रतिपक्षी जनांस अत्यंत भयावह असतें.

वि. कृ. चिपळूणकर. निबंधमाला.

---

## पाठ ३० वा.



## समर्थांचा कृपाप्रसाद.

### भाग १ ला.

[ विजापूरकरांकडील सरदार अफजूलखान याची व शिवाजी महाराजांची तहाचें बोलणें होण्याकरितां, प्रतापगडाखालीं भेट व्हावी असे ठरलें होतें. भेटीचे आदले दिवशीं रात्रीं महाराज निजावयास गेल्यानंतर त्यांना भेटीच्या प्रसंगाच्या काळजीमुळें झोंप लागेना; अंथरुणावर तळमळ होऊं लागली. तेव्हां आपले मातोश्रीला तरी गाढ झोंप लागली आहे की नाहीं, हें पहाण्याकरितां ते तिच्या महालांत आले. तों तिचीही आपलेसारखीच अवस्था झाली आहे, असें त्यांस आढळून आलें. पुढें महाराज मातोश्रीच्या अंकावर मस्तक ठेवून तिच्याशीं दुसरे दिवशीं होणारे भेटीच्या प्रसंगावर भाषण करूं लागले. कांहीं वेळानें तशा स्थितींत त्यांस झोंप लागली.]

महाराजांस झोंप लागून बराच वेळ झाला. मातोश्री जिजाबाईसाहेब मोठ्या कौतुकानें त्यांच्याकडे पाहात राहिल्या. आपल्या उदरीं हा वीर पुरुष आला, यांत आपलें केवढें पुण्य, असें क्षणमात्र मनांत येऊन त्यांस थोडा अभिमान वाटला. आपल्या पोटीं आलेल्या या हिऱ्यानें स्वधर्माच्या व स्वदेशाच्या उद्धाराकरितां किती प्रयत्न चालविले आहेत, आपल्या कुळाचा उद्धार त्यामुळें किती सहज होत आहे, आज किती दुर्बळांना यानें दुःखमुक्त केलें आहे, वगैरे कित्येक विचारही त्यांच्या मनांत उभे राहून त्यांस आनंद झाला. परंतु आनंदाची परमावधि फार

काळपर्यंत कधीं एकमार्गी राहात नाहीं. तिचा अनुभव क्षणभर झाला न झाला तों कांहीं न्यूनता उत्पन्न करणारे विचार पुढल्या क्षणीं उभे रहावयाचेच. निर्मिश्र आनंद क्षणभऱ्याचाच सोबती. तो क्षण लोटला कीं, पुढल्या क्षणीं कांहीं तरी दुःखाची छटा उत्पन्न व्हावयाचीच. तशीच स्थिति या वेळीं जिजाबाईसाहेबांची झाली. त्या आनंदपरमावधीचा अनुभव क्षणमात्र त्यांनीं घेतला नाहीं, तों त्यांस प्रस्तुत प्रसंगाचें स्मरण झालें, आणि काय होतें, काय नाहीं, याबद्दल त्यांच्या मनास फार हुरहूर लागली. आतांपर्यंत त्यांनीं महाराजांस आपल्या आशीर्वादांनीं आणि उत्तेजनपर भाषणांनीं फार धीर दिला. परंतु त्या आतां एकट्याच असतांना त्यांस स्वतःसच चिंता वाटूं लागली. एखाद्या संकटसमयीं आपण दुसऱ्यास पुष्कळ धैर्य देतों, परंतु त्या संकटाचा भयंकरपणा पूर्णपणें आपणांस अवगत असल्यामुळें स्वतःच्या मनासमात्र तितकें धैर्य नसतें. किंबहुना दुसऱ्याला निरुत्साह करूं नये, आल्या संकटास धैर्यानें तोंड देण्यास त्याला उत्तेजन द्यावें, एवढ्याच हेतूनें केवळ आपण धैर्य देत असतों. हा अनुभव कोणास नाहीं? जिजाबाईसाहेबांच्या स्वतःच्या मनास आपल्या मुलावर आलेल्या संकटाबद्दल फार भय वाटत होतें. परंतु आपल्या मनांतल्या भयाचा उच्चार करून दाखवून त्यास भिववावें, हें वीरमातेचें ब्रीदच नव्हे. जें संकट आलें त्यास तोंड देऊन शूराप्रमाणें लढावें हाच मार्ग उत्तम; आणि कोणत्याही वीरमातेनें आपल्या पुत्रास असाच उपदेश करावा, हें त्या जाणून होत्या. अर्थात् त्यांनीं शब्दांनीं किंवा चर्येनेंही आपलें अंतःस्थ भय आपल्या मुलास बिलकूल समजूं दिलें नाहीं. म्हणून काय त्यांच्या अंतःकरणांत धागधूग वाटत नव्हती? ती त्यांस वाटत होतीच; आणि त्या एकट्याच असल्या, म्हणजे तर विशेषच त्यांचें मन ह्या चिंतेनें

व्याकुळ होत असे. त्यांत प्रस्तुत प्रसंग तर विशेषच होता. संकट-समय अगदीं नजीक ठेपलेला, आणि ज्याच्या जिवावर तें संकट आलेलें, तो मांडीवर डोकें ठेवून स्वस्थ पडलेला. अशा प्रसंगीं जिजाबाईसाहेबांसारख्यांस फार चिंता वाटली, तर त्यांत नवल काय ?

त्या अशाप्रमाणें सचिंत बसल्या असतां एकाएकीं त्यांस कांहीं स्मरण झालें, आणि त्या आपल्याशींच म्हणतात:—"अशा प्रसंगीं समर्थांचा विचार घेण्याची मनाई असावी हें किती विचित्र आहे ! परंतु त्यांच्या आज्ञेचें उल्लंघन कोण करील ? शिवबाला तुकाराम-बोवांच्या कीर्तनानें संसाराचा वीट येऊन त्यानें सर्वसंग टाकण्याचें मनांत योजिलें, तेव्हां त्याच्या मनाला पालट देऊन समर्थांनीं त्याला पुनः इकडे लक्ष घालण्यास सांगितलें. आणखी, 'आपलें क्षत्रियकर्म टाकून भलत्याच मार्गांत तूं आमच्यासारख्यांच्या संगतीला लागलास, याबद्दल तुला शिक्षा कीं, तूं आमच्या दर्शनास बारा वर्षें येऊं नयेस किंवा आमची सल्लामसलत विचारण्याचाही प्रयत्न करूं नयेस'. असें म्हटलें. शिवबानें पुष्कळ विनवण्या केल्या कीं, संकट-काळीं विचार विचारण्यास मला आपल्याखेरीज कोणी नाहीं; तरी असला निष्ठुरपणा आपण करूं नये. परंतु त्यांनीं ऐकिलें नाहीं. 'जें मीं सांगितलें, त्याप्रमाणें बारा वर्षें वागलेंच पाहिजे, माझें नांवसुद्धां घेऊं नयेस'. असें निक्षून बजाविलें. आणखी याच काळांत माझ्या शिवबावर हें संकट आलें. तेव्हां काय आहे कोणास ठाऊक ? पण नाहीं. त्यांचें त्याच्यावर आई भवानीप्रमाणेंच कृपाछत्र आहे. ते त्यास विसंबणार नाहींत, असें मला वाटलें होतें. शिवबानें तर त्यांच्या आज्ञेप्रमाणें तंतोतंत वागणूक ठेविली. आज जवळजवळ बारा वर्षें होत आलीं, त्यानें त्यांच्या आज्ञेचें अणुभरही उल्लंघन केलें नाहीं. त्यांची तशी आज्ञा नसती, तर आतांच्या संकटसमयीं तो

दहादां त्यांच्याकडे जाऊन येता. परंतु गुरूची आज्ञा ती आज्ञाच. हें शिवबानें ठीक केलें. पण समर्थांनीं हें संकट जाणून आपलें दर्शन त्याला कसें दिलें नाहीं! निदान कोणा शिष्याबरोबर तीर्थ-प्रसाद आणखी आशीर्वाद पाठवून त्याला धीर तरी त्यांनीं द्यावयाचा! परंतु आतां उजाडल्यावर वाघाच्या तोंडांत मान देण्यास जावयाचें, तरी अजून समर्थांचा कांहींच कृपाप्रसाद नाहीं! आई जगदंबेचा दृष्टान्त झाला आहे, पण समर्थांनींही कृपाशब्द पाठविले असते, तर किती चांगलें झालें असतें!

अशा प्रकारचे विचार त्या प्रेमानें अगदीं सद्गदित झालेल्या माउलीच्या मनांत सारखे चाललेले होते. ती मनांत असे विचार करी, आपल्या कुलाच्या, देशाच्या व धर्माच्या उद्धाराकरितां अहो-रात्र परिश्रम करून श्रांत होऊन, आपल्या मांडीवर कांहीं वेळ सुखाची विश्रांति घेणाऱ्या त्या आपल्या वीरपुत्राकडे पाही, आणि दीर्घ उसासे टाकी. परंतु आपल्या उसाशानें किंवा आपल्या हाल-चालीनें तो जागा होऊं नये, म्हणून ती फार जपून उसासा टाकी, किंवा हात हालवी. त्या वेळीं त्या मायलेंकरांस कोणी पाहाता, तर त्यास वीरपुत्र आणि वीरजननी म्हणजे कशीं असतात, आणि कसलेंही संकट आलें असलें, तरी धीर, प्रशांत नरवीरास त्याच्या मातुःश्रीच्या अंकावर ऐन संकटकाळीं कशी शांत निद्रा येते, हें दिसलें असतें.

---

# पाठ ३१ वा.



## समर्थांचा कृपाप्रसाद.

### भाग २ रा.

अरुणोदय झाला. सूर्याचे आरक्त किरण प्रतापगडच्या गगनचुंबित मस्तकावर दैदिप्यमान सुवर्णरसाप्रमाणें पसरले आणि महाराज एकदम जागे झाले. त्यांस इतकी गाढ झोंप लागली होती कीं, ते जागे झाल्यावर आपण जननीच्या अंकावर निजलों, ते तसेच निजलों, हें मनांत येऊन त्यांस फार आश्चर्य वाटलें. परंतु ती वेळ आश्चर्य करीत बसण्याची नव्हती. ते तत्काळ उठून म्हणाले, "आईसाहेब, आपण तशाच जागत बसलां? मला उठवावें कीं नाही!"

जिजाबाईसाहेब किंचित् हंसून कांहीं उत्तर देणार, तों दोघांही मायलेंकरांच्या कानांला उंच अशा सुरांत कोणी तरी "श्रीरघुवीर समर्थ" असे शब्द, व समर्थांच्या मनाच्या श्लोकांपैकीं एक श्लोक म्हणत येत आहे, असें वाटलें. तो आवाज दोघांसही ओळखीचा वाटला. जवळ हुजऱ्या कोणी नव्हता. परंतु महाराज कोणाला हाका मारणार, तोंच बाहेरून एक नोकर येऊन त्यानें महाराजांस वर्दी दिली कीं, "श्रीसमर्थस्वामींकडून श्रीधर गोसांवी आले आहेत." ते शब्द कानीं पडतांच जिजाबाईसाहेबांच्या चर्येवर एकदम आश्चर्य दिसूं लागलें. 'आमची व तुझी वारंवार भेट होतां कामा नये' अशी आज्ञा झाली, तरी संकटसमयीं शिवबाला समर्थांनीं कांहीं तरी कृपाप्रसाद पाठविलाच पाहिजे, असें आपल्या मनांत येण्याला आणि आतांच त्यांचेकडून माणूस येण्याला एक गांठ पडावी हें

काय ? समर्थ ते समर्थच खरे ! असा विचार जिजाबाईसाहेबांच्या मनांत येऊन जिजाबाईसाहेब कांहीं बोलणार तों श्रीधरस्वामी त्यांचे-पुढें येऊन अत्यंत उच्च अशा आवाजांत व हास्यवदन करून:—

**" समर्थाचिये सेवका वक्र पाहे।**
**असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥**
**जयाची लिला वर्णिती लोक तीन्ही।**
**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ १ ॥**

जयजय रघुवीर समर्थ !

असें बोलले. त्यांस पाहतांच महाराज व आईसाहेब या दोघांसही अत्यंत आनंद झाला. तो आनंद त्यांच्या चर्येवर स्पष्टपणें दिसत होता. ज्या दिवशीं ऐन आणीबाणीचा प्रसंग, त्या दिवशीं सुप्रभातींच समर्थांची वाणी त्यांच्या आवडत्या शिष्याच्या तोंडून कानीं पडावी, यासारखें शुभचिन्ह कोणचेंच नाहीं, असें दोघांसही वाटलें. स्वामींचा आदर करण्यालासुद्धां दोघांस सुचलें नाहीं. श्रीधरस्वामींनीं म्हटलेल्या श्लोकांत किती अर्थ भरलेला आहे, हें मनांत येऊनही दोघांस परमानंद झाला. परंतु आतां वेळ घालविणें शक्य नव्हतें. तेव्हां लागलीच महाराजांनीं श्रीधरस्वामींस आदरानें बसण्यास सांगून म्हटलें, " आपण समर्थांचा कृपाप्रसाद आणला असेल, तो सत्वर द्यावा. मीं तोंडानें कोणाजवळही आतांपर्यंत उच्चार केला नाहीं, परंतु समर्थ या वेळीं मला विसंबणार नाहींत, अशी माझ्या मनाची पक्की खात्री होती. समर्थांच्या आज्ञेपुढें माझा इलाज नाहीं. गुरूची आज्ञा ती गुरूंची आज्ञाच. ती मी कशी उल्लंघीन ? " हें बोलतांना महाराजांस फार वाईट वाटत असावें, हें उघड दिसलें. त्यांचे डोळ्यांत अश्रु आले. श्रीधरस्वामींनीं तें जाणलें आणि ते त्यांस म्हणाले:—

" राजा, समर्थ कोणचीही गोष्ट करतात ती तुझ्या हिताचीच करितात, हें काय तूं जाणून नाहींस? त्यांनीं तुला इतकीं वर्षें आपली व तुझी ओळख नाहीं, अशा प्रकारें वागण्यास सांगितलें, त्यांत त्यांचा हेतु काय, तें त्यांनीं तुला मागेंच सांगितलें आहे. राजा, तुझ्यासारखे कार्यकर्ते पुरुष ज्या मार्गास लागतील, त्या मार्गांत पूर्ण विजयी होतील. तूं आमच्या भजनीं फार फार लागून वैराग्यांत पडतास तर महातपस्वी बनतास; पण मग हें स्वराज्याचें काम कोण करता? बाबा रे, ते आम्हांला कितीदां म्हणाले कीं, " या शिवरायाला जर, 'बारा वर्षें आमच्या सन्निध येऊं नको', अशी आज्ञा केली नसती, तर हा महावैराग्यशाली साधु बनता, आणखी म्लेंच्छांची पुंडाई मोडून स्वराज्य स्थापण्याचें काम तसेंच राहिलें असतें. तेव्हां आपण त्याला आज्ञा केली, ही फारच उत्तम गोष्ट झाली. बारा वर्षांत याच्या हातून अनेक राज्यकार्यें घडतील, आणि तीं झालीं म्हणजे मग राजकारणांत राहूनही तो वैराग्यशाली होईल. त्याला जनकाची उपमा साजेल. तोंपर्यंत आमच्यासारख्यांचा सहवास त्याला बिलकूल उपयोगी नाहीं." राजा, तूंच सांग बरें; शके १५६९ सालीं ऐन विशीएकविशीच्या अमलांत तुला वैराग्य उत्पन्न होऊन तूं सर्वसंगपरित्याग करून रान धरिलेंस, तोच क्रम जर पुढें चालता, तर आज जी स्वराज्याची रचना झाली आहे, ती झाली असती का? तूं आमच्या सहवासांत अशींच रानेंवनें भटकत राहतास ना? बाबा रे, ज्याचें काम त्यानें केलें पाहिजे. तूं क्षत्रिय; तूं लढून दंड्यांना दंडन आणि रक्ष्यांचें रक्षण केलें पाहिजेस. रानांत हिंडून आपल्याच शरिराचें दंडन करून मोक्ष मिळविणें, हा तुला श्रेयस्कर मार्ग नव्हे. असो. समर्थांना तुझ्यावर आलेलें संकट अंतर्ज्ञानानें समजलें आहे. त्यांनीं

तुला माझ्या मुखीं आशीर्वाद पाठविला आहे. तुला आज पूर्ण यश मिळणार, असें त्यांनीं वारंवार सांगितलें आहे. आणखी तुझ्याकरितां कांहीं ओंव्या करून तुला आज प्रातःकाळीं देण्यासाठीं मजजवळ दिल्या आहेत. या तूं वाच; आणि आपल्या पुढच्या कार्यास लाग. अवधि थोडा आहे, हें मीं जाणून आहें; अधिक कांहीं बोलत नाहीं." असें म्हणून त्यांनीं त्यांच्या हातांत लखोटा दिला.

ह. ना. आपटे. करमणूक.

---

## पाठ ३२ वा.

### उद्योगवृद्धि.

आपल्या देशांत निरनिराळे उद्योगधंदे चालावे, व्यापार वाढावा, शेतकीची सुधारणा व्हावी, वगैरे विचार सर्व आधुनिक विद्वानांच्या मनांत घोळत आहेत. परंतु हे सर्व विचार सिद्धीस जाण्यास जे कांहीं गुण पाहिजेत, ते बहुतेक आपणांत नाहींत; आणि ते अंगीं येण्याबद्दल आपण प्रयत्नही करीत नाहीं, ही आपणांस मोठी लाजिरवाणी गोष्ट आहे. आजकाल अत्यंत भरभराटीस आलेले, विद्या, कलाकौशल्य व सुधारणा ह्यांत परम उन्नतीस पोंचलेले जितके देश आहेत, त्यांतील विद्वान् लोकांत व आपणांत भेद पाहिला, तर तो मुख्यत्वेंकरून पुढील चार गोष्टींत दिसून येईल. जिज्ञासा, शोधकपणा, उद्योग आणि धाडस. या चतुष्टयाचा आम्हांपैकीं बहुतेकांत अभाव आहे, असें म्हणण्यास चिंता नाहीं. पाश्चात्त्य विद्वानांची जिज्ञासा, अथवा वस्तुमात्राचें ज्ञान होण्याविषयीं इच्छा, किती जबर आहे ह्याची आम्हांस कल्पनाही करितां येणार नाहीं.

वातावरणाची उंची व व्यापकता किती आहे, त्याचे कोणते भागांत वारा किती जोरानें व कोणत्या दिशेनें वाहतो, कोणत्या भागांत थंडी आहे, व पृथ्वी, सूर्य आणि तारागण, या सर्वांमध्यें जें अगाध अंतर आहे, तेथें उष्णमापकाचा पारा किती अंशांवर राहील, सूक्ष्मदर्शकासही अत्यंत अगोचर असे जे पदार्थांचे मूळ अविभाज्य परमाणु त्यांचें स्वरूप काय, आकार केवढा व त्या परस्परांमध्यें अंतर किती, इत्यादि अनेक प्रश्न त्यांच्या जिज्ञासेस साधारण होऊन गेले आहेत; व त्या प्रश्नांचीं उत्तरेंही देण्याविषयींच्या प्रयत्नांत अनेकांनीं आपल्या आयुष्यांचे अमोलिक भाग खर्चिले आहेत.

या त्यांच्या जबर जिज्ञासेनुरूपच त्यांचा शोधकपणाही अवर्णनीय आणि आम्हांस कल्पनाबाह्य आहे. भूगर्भांत व महासागरांत मैल मैल खोल जाऊन तेथें सांपडणाऱ्या वस्तूंची परीक्षा करणें व त्यांचा संग्रह करणें, आकाशांतही विमानमार्गानें पांचसहा मैल वर चढून तेथील हवेचे नमुने आणून, त्यांवर रसायनव्यापार करणें, नौकामार्गानें किंवा पादचारी होऊन पराकाष्ठेच्या दुर्गम प्रदेशांत प्रवास करून, जिवावरचीं संकटें सोसून, तेथील कृमिकीटक, पशु-पाषाण, वनस्पति इत्यादि सृष्टिजाताचें यथादृष्ट सूक्ष्म रीतीनें वर्णन करणें, इत्यादि सर्व गोष्टी पाश्चात्त्य विद्वानांत अगदीं साधारण होऊन गेल्या आहेत. शिवाय जिज्ञासा व शोधकपणा यांस उद्योग व धाडस यांचें जितकें पाटबळ असावें, तितकें त्यांच्यांत पूर्णपणें आहे.

या चार गोष्टींमुळें गेल्या तीन शतकांत युरोपियन लोक जितक्या उन्नतीस आले आहेत, तसें तितक्याच काळांत पूर्वीं कोणतेंही राष्ट्र आलें नाहीं. आणि या चार गोष्टी द्रव्यप्राप्तिनिरपेक्ष व स्वतंत्रतेनें शिकलेल्या तिकडील विद्वानांत वास करीत असल्याकारणानें चैनबाजी व आळस यांचा त्यांजवर फारसा परिणाम नाहीं; आणि तीं

राष्ट्रें, प्राचीन काळचें रोम, ग्रीस, पर्शिया व आपलें भरतखंड यांप्रमाणें कांहीं वेळ भरभराटी अनुभवून पुढें काळाच्या दाढेंत सांपडतील, असा संभव दिसत नाहीं.

आतां वरील गुणचतुष्टयाचा आमच्या आधुनिक विद्वान् मंडळींत किती अभाव आहे, हें विशेष सांगावयास नकोच; तसें केल्यानें लेखमात्र वाढेल. परंतु तें अंगीं नसल्यानेंच केवळ आमचें पाऊल शास्त्रकलांमध्यें पुढें पडत नाहीं, हें आज दाखविणें आहे.

अर्थशास्त्राच्या उपोद्घाताचेंही ज्यास यत्किंचित् ज्ञान आहे, त्यास माहीत असेलच कीं, सर्व कलाकौशल्याचें प्रथम साधन सृष्टि-जन्य पदार्थसंपत्ति हें होय. या संपत्तीवर शास्त्रप्रयोग करून तिचे गुणधर्म अवगत करून घेणें, व तदनुसार कल्पना बसवून तीस व्यावहारिक उपयोगास लावणें, एवढेंच मनुष्याचें काम आहे.

आपण ज्या प्रांतांत किंवा देशांत राहातों, त्यामध्यें सृष्टिजन्य पदार्थसंपत्ति किती व कोणच्या प्रकारची आहे, हें समजून घेणें, हें आपलें कर्तव्यकर्म आहे. परंतु हेंही काम आपण जोंवर अन्य-देशीयांवर सोंपवितों, तोंवर आपला व्यापार, उद्योग यांची वास्तविक सुधारणा होण्याची आशाच नको. जर आपणांस सर्व देशपर्यटन करण्यास ऐपत व फुरसत नसेल, तर शक्त्यनुसार जो कोणता भाग आपल्या दृष्टीस पडेल, त्यांतच आपण आपला शोध चालविला पाहिजे. त्या भागांत असणाऱ्या सर्व प्रकारच्या जमिनींचे व मातींचे मासले मिळविणें, तेथील डोंगरांत व जमिनींत सांपडणारे जितके चमत्कारिक दगड वगैरे पदार्थ असतील त्यांचा, सर्व प्रकारच्या वनस्पतींचा, प्राण्यांचा व त्यांच्या अस्थिचर्मांचा संचय करणें, तेथील पिकांची उत्तम माहिती मिळविणें, हीं सर्व कृत्यें उद्योगी मनुष्याचे हातून सहज घडणारीं आहेत; व तीं नवीन विद्वानांनीं विशेषेंकरून

हातीं घेतलीं पाहिजेत. इतकीं साधनें जवळ झाल्यावर शास्त्रप्रयोग करून त्यांचें गुणधर्मपरीक्षण करून घेणें, हें दुसरें कर्तव्य; व तिसरें त्यांस व्यावहारिक उपयोगास लावण्याची खटपट.

वरतीं सांगितलेला संचय व शोध प्रत्येक सुजाण मनुष्याचे हातून होण्याजोगा आहे. परंतु आधुनिक विद्वानांस वृथा व्याख्यानांच्या, व धर्मद्वेष, चेष्टा व परदेशीयाचें निंद्य अनुकरण यांच्या पलीकडे जाऊन शांतपणें सृष्टिचमत्कार पहाणें, मानवजातीचे कल्याणाची आशा धरून सृष्टीतील द्रव्याचा निरभिलाप शोध व संचय करणें, ह्या गोष्टी अद्यापि कळूं लागल्या नाहींत.

ही सृष्टिजन्य संपत्ति जोंपर्यंत आपली आपणांस कळली नाहीं, व तीवर शास्त्रप्रयोग झाले नाहीत, तोंपर्यंत उद्योगाचीं साधनेंच नाहीत असें म्हणण्यास चिंता नाहीं; जोंपर्यंत आपलें भांडवल आपणांस माहीत नाहीं, तोंपर्यंत व्यापारवृद्धीची वृथा आशा बाळगून उपयोग तो काय? व आपल्या देशाचे दारिद्र्याबद्दल दुसऱ्यास दोष कां द्यावा? वरील सूचना लक्षांत आणून आधुनिक विद्वान् कांहीं खटपट करतील अशी उमेद आहे.

गो. ग. आगरकर. के० नि० निबंध.

---

## पाठ ३३ वा.



## भीष्माची राजनिष्ठा.

[ हल्लीं जो ग्रंथ महाभारत या नांवानें प्रसिद्ध आहे, तो मूळचा इतका मोठा नव्हता. या ग्रंथाची प्रथम व्यासांनीं रचना केली. त्यांचा शिष्य वैशंपायन यानें जनमेजयास सांगतांना तो कांहींसा वाढविला. पुढें सूत लोमहर्षण याचा पुत्र सौति उग्रश्रवा यानें तो शौनकऋषींस सांगतांना त्यांत आणखी पुष्कळच भर घातली. व्यासांच्या ग्रंथाचें नांव जय, वैशंपायनाच्या भारत व सौतीच्या महा-

भारत. हीं तीन संस्करणें होण्याला सुमारें दोन हजार वर्षांचा काळ लोटला. भारतकाळापेक्षां महाभारतकाळीं आर्यांच्या समाजाची सर्व बाजूंनीं अवनति झालेली होती. भारतकालीन आर्य सर्व बाजूंनीं श्रेष्ठ होते, व महाभारतकालीन त्या मानानें बरेच अवनत होते. एवढ्या माहितीवरून 'भारतीय काळ' व 'महाभारतकाळ' या दोन शब्दसमुच्चयांचा बोध होईल, असें वाटतें.]

भारतीय काळाच्या प्रारंभीं राजनीति उच्च दर्जाची असून महाभारतकाळीं कुटिल राजनीतीचा प्रकार चांगलाच अंमलांत आला होता; आणि राजाच्या राजकीय अधिकाऱ्यांची नीति बरीच खालावली होती. यासंबंधानें भारती युद्धांतील भीष्माचें वर्तन फारच उदात्त व अनुकरण करण्यासारखें झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पुष्कळ लोक असा प्रश्न उपस्थित करतात कीं, भीष्मानें युद्धप्रसंगीं दुर्योधनाच्या बाजूनें जें युद्ध केलें, तें योग्य किंवा कसें? दुर्योधनाचा पक्ष अन्यायाचा आहे, ही गोष्ट स्पष्टपणें भीष्मानें दुर्योधनास सांगितली होती. कराराप्रमाणें पांडवांस राज्य दिलेंच पाहिजे, असें त्यानें स्पष्टपणें दुर्योधनास कळविलें होतें. त्याचप्रमाणें पांडवांकडे श्रीकृष्ण असून हा श्रीकृष्ण परमेश्वराचा अवतार आहे, अशी त्याची पूर्ण भक्ति होती. असें असून भीष्मानें दुर्योधनातर्फे श्रीकृष्णाशीं विरोध केला, ही गोष्ट योग्य झाली किंवा कसें ? भीष्माच्या उलट आचरण रामायणांत बिभीषणानें केलें आहे. बिभीषण रावणास सोडून रामास जाऊन मिळाला; रावणाचें कृत्य दुर्योधनाच्या कृत्याप्रमाणेंच निंद्य होतें, आणि बिभीषण भीष्माप्रमाणेंच रामाचा भक्त होता. अशा स्थितींत भीष्मानें जें वर्तन केलें, तें अधिक न्यायाचें, किंवा बिभीषणानें केलें तें अधिक न्यायाचें ? असा प्रश्न कित्येकदां उपस्थित होतो. परंतु राजनीतिदृष्ट्या भीष्माचेंच आचरण श्रेष्ठ होय, यांत शंका नाहीं. स्वराज्याचें खरें तत्त्व ज्याच्या अंतःकरणांत पूर्णपणें प्रतिबिंबलेलें आहे, तो स्वराज्याचा पक्ष कधींही सोडणार नाहीं.

दुर्योधनाचा पक्ष अन्यायाचा असला, तरी तो स्वराज्याचा प्रश्न होता; आणि भीष्मानें स्वराज्यासंबंधाचें आपलें कर्तव्य योग्य रीतीनें पाळलें, असेंच म्हणावयास पाहिजे. रामायणांत, रामानेंही बिभीषणास आश्रय देतांना, हा भांडण करून आलेला असून राज्यार्थी आहे, हा भेद आपल्यास उपयोगी पडेल, असें स्पष्टपणें सांगितलेलें आहे. उच्च संस्कृति व हीन संस्कृति यांच्यामध्यें हाच फरक आहे; राजकीय नीतीसंबंधानें भीष्माचेंच आचरण अतिशय श्रेष्ठ होय. आणि रामभक्त या नात्यानें बिभीषणाची कितीही थोरवी असली, तरी त्याचें आचरण राजनीतीच्या दृष्टीनें हीन होय, हें निर्विवाद आहे.

महाभारतांत युधिष्ठिर युद्धारंभीं भीष्मास नमस्कार करण्यास गेला, त्या वेळेस भीष्मानें त्यास, 'पुरुष हा अर्थाचा दास आहे, यासाठीं मी दुर्योधनातर्फे लढत आहें; अर्थात् मीं आजवर या राजाचें अन्न खाल्लें आहे, तेव्हा मी याच्या तर्फेच लढणार', असें सांगितलें, हेंही एका दृष्टीनें कमीच सांगितलें. याहीपेक्षां उदात्त रीतीनें त्यास सांगतां आलें असतें. तथापि त्याचें उत्तर उदार मनुष्याचें आहे. वनपर्वांत युधिष्ठिरानें भीमाची अशीच समजूत घातली आहे. जेव्हां, वनवासाचा करार तोडून आपण आपल्या बलानें कौरवांस मारूं, असें भीम आग्रहानें म्हणूं लागला, व असें करणें अधर्माचें आहे, असें सांगूनही त्याचें समाधान होईना, तेव्हां युधिष्ठिरानें त्यास सांगितलें, "तूं आपल्या बलाची प्रशंसा करतोस, पण धार्तराष्ट्रांकडे प्रबल वीर भीष्म, द्रोण आहेतना? या लोकांनीं जें अन्न खाल्लें आहे, त्या अन्नाची ते फेड करतील!" हें ऐकून भीम गप्प बसला. सारांश, भीष्म, द्रोण अत्यंत राजनिष्ठ होते, व ते कधींही आपल्या राजाचा पक्ष सोडणार नाहींत, अशी सर्वांस खात्री होती. महा-

भारतांत, भीष्मानें पुढें युद्धप्रसंगीं युधिष्ठिरास आपल्या मरणाचा उपाय सांगितला, असें वर्णन आहे. तें पाठीमागचें आहे. महाभारतकालीन राजनीति बिघडली असल्याकारणानें सौतीच्या वेळेस कोणत्याही राजाधिकाऱ्याची नीति बिघडवून त्यास फितवितां येईल, अशी समजूत होती; व त्या समजुतीप्रमाणें भीष्मास फितविण्याचा हा येथें एक प्रसंग सौतीनें घातला आहे. परंतु जर भीष्माची नीतिमत्ता उच्च व उदात्त होती, तर तो अशा प्रकारें निमकहरामी करता, हे शक्यच नाहीं. किंबहुना भीष्मानें स्वमुखानें, मीं दुर्योधनाचें अन्न खाल्लें आहे, असें युद्धारंभी सांगितलें होतें, व वनपर्वांत युधिष्ठिरानेंही तें भीमास बजाविलें होतें. या दोन्ही गोष्टींच्या विरुद्ध भीष्म आचरण करील, हें संभवनीय नाहीं. हा प्रसंग शल्याच्या, 'कर्णाचा मनोभंग मी करीन' या विश्वासघातकी वचनाप्रमाणेच अशक्य व पूर्वापरविरोधी असून तत्कालीन राजनीतिकल्पनेप्रमाणें सौतीनें मागाहून कल्पिलेला आहे भीष्मपर्वांत वर्णिल्याप्रमाणें युधिष्ठिर व श्रीकृष्ण कौरवांच्या फौजेंत भीष्माचा वधोपाय विचारण्यास गेले असल्यास ती गोष्ट दुर्योधनास कळली नसेल, हें संभवनीय नाहीं. शिवाय भीष्माच्या वधाचा उपाय श्रीकृष्णास सांगतां आला नसता, असेंही मानतां येत नाहीं. सारांश, भीष्माच्या उज्ज्वल शीलास कलंक लावणारा हा कथाभाग निःसंशय मागाहूनचा असावा.

येथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, आपला राजा जर अनीतीचें आचरण करीत आहे, आणि त्याचा पक्ष धडधडीत अन्यायाचा आहे, तर त्याच्या अधिकाऱ्यांनीं त्याच्या तर्फे लढणें हेंही अन्यायाचें आहे. अर्थात्, अशा प्रसंगीं त्यांनीं काय करावें? या प्रश्नासंबंधानें महाभारतांत एक मनोरंजक संवाद आलेला आहे. भीष्म व श्रीकृष्ण ह्यांच्यामधील हा संवाद. ज्या वेळेस भीष्मानें अतिशय पराक्रम करून अर्जुनाला

मूर्च्छित केलें, आणि ज्या वेळेस श्रीकृष्णानें आपली प्रतिज्ञाही सोडून भीष्मावर चक्र धरलें, त्या वेळेस, "सर्व अनर्थाचें मूळ तूं आहेस; तूं दुर्योधनाचा निग्रह कां केला नाहींस?" असें म्हणून श्रीकृष्णानें चक्र घेऊन भीष्मावर चाल केली. तेव्हां भीष्मानें आपल्या वर्तनाच्या समर्थनार्थ, "**राजा परं दैवतमित्युवाच**," राजा हा सर्वांचें परम दैवत आहे, असा जबाब दिला; आणि तूं माझ्यावर चक्र धरलेंस, तेव्हां माझा त्रैलोक्यांत हाच मान झाला, मी तुला नमस्कार करतों, असें म्हणून भीष्म स्वस्थ उभा राहिला. इतक्यांत अर्जुनानें शुद्धीवर येऊन कृष्णास परतविलें. अशी कथा आहे. हा कथाभाग भीष्मपर्व अध्याय ९९ यांत आलेला असून कित्येक प्रतींत हे येथील महत्त्वाचे श्लोक नाहींत. तथापि ते मूळचे श्लोक असे आहेतः—

**श्रुत्वा वचः शांतनवस्य कृष्णो**
**वेगेन धावंस्तमथाभ्युवाच ।**
**त्वं मूलमस्येह भुवि क्षयस्य**
**दुर्योधनं चाद्य समुद्धरिष्यासि ॥ १ ॥**
**दुर्द्यूतदेवी नृपतिर्निवार्यः**
**सन्मंत्रिणा धर्मपथि स्थितेन ।**
**त्याज्योऽथवा कालपरीतबुद्धि-**
**र्धर्मातिगो यः कुलपांसनः स्यात् ।**
**भीष्मस्तदाकर्ण्य कुरुप्रवीरो**
**राजा परं दैवतमित्युवाच ॥ २ ॥**

हे मधील श्लोक अत्यंत महत्त्वाचे असून त्यांत एका महत्त्वाच्या प्रश्नासंबंधानें दोन मतें कशीं पूर्व काळीं होतीं, हें दिसून येतें. दुराचरणी राजा असल्यास काय करावें, यासंबंधानें, त्याची आज्ञा शिरसा मान्य करून त्याचा पक्ष कधींही सोडूं नये, असें तत्त्व भीष्मानें प्रतिपादन केलें; तर श्रीकृष्णानें पुढचें असें तत्त्व प्रतिपादन केलें कीं,

जे उत्तम मंत्री असतील, त्यांनीं राजाचा निग्रह करावा, आणि तो जर मुळींच ऐकणार नाहीं, तर त्याचा त्याग करावा. अर्थात् त्याला गादीवरून काढून दुसरा राजा बसवावा. हे दोन्ही पक्ष उदात्त राजनीतीचे असून ते दोन्ही पूज्य आहेत, असें श्रीकृष्णानें व भीष्मानें आपल्या आचरणानेंही दाखविलें. पण अशा परिस्थितींत आपल्या राजाचा त्याग करून परशत्रूस जाऊन मिळावें, हा जो तिसरा मार्ग बिभीषणानें स्वीकारिला, तो हीन व निंद्य आहे, हें अधिक विस्तारानें सागणें नको. तो भारतांतील उदात्त आचरणाच्या कोणत्याही पुरुषानें आदरिला नाही, हें लक्षात ठेवण्यासारखें आहे.

चिंतामण विनायक वैद्य. महाभारताचा उपसंहार.

## पाठ ३४ वा.



## मराठे उपटसुंभ होते काय?

मराठ्यांचा, 'चोर, लुटारू, दरोडेखोर' अशा नांवांशिवाय इंग्रज ग्रंथकारांनीं सहसा उल्लेख केला नाहीं. तथापि हिंदुस्थानांत मराठे हेच काय ते इंग्रजांना आपल्या बरोबरीचे प्रतिस्पर्धी भेटले, ही गोष्ट लक्षांत घेतली, म्हणजे इंग्रज ग्रंथकारांनीं असे उद्गार काढावे, हें योग्यच आहे. शत्रूविषयीं कधीं कोणीं चांगले उद्गार काढिले आहेत काय? मराठ्यांपेक्षां इंग्रज हे अधिक खंदे कलमबहाद्दर असून इतिहास, प्रबंध, रोजनिशा, टिपणें, कैफियती, विवेचनें व वर्णनें लिहून ठेवण्याचा त्यांस मोठा नाद असे. यामुळें मराठ्यांसंबंधानें इंग्रजांनीं जितकें लिहून ठेविलें आहे, तितकें इंग्रजांसंबंधानें मराठ्यांनीं लिहून ठेविलेलें नाहीं. मराठी बखरकार, मुत्सद्दी वगैरेंनीं इंग्रजांविषयीं फक्त प्रसंगोपात अगदीं त्रोटक उडत उडत उल्लेख

केलेले आहेत. हल्लीं इंग्रजी राज्य झाल्यामुळें, तसेंच इंग्रजी ग्रंथ छापलेले असल्यामुळें इंग्रजांनीं लिहिलेल्या ऐतिहासिक वाङ्मयाचा खुराक आमच्या इकडील सुशिक्षित तरुण पिढीस सहजच चारण्यांत येतो. आणि नित्य एकाच प्रकारचें वाङ्मय वाचल्यानें वाचकांचा बुद्धिभ्रंश व्हावा, हें साहजिकच आहे. परंतु गेल्या पंचवीसतीस वर्षांत महाराष्ट्रांत इतिहासभक्तांनीं जी संशोधनात्मक देशसेवा केली, तिच्या योगानें मराठ्यांसंबंधानें अस्सल कागदपत्र व प्रबंध इतके विपुल उपलब्ध झाले आहेत कीं, मराठ्यांविषयीं यथातथ्य माहिती समजून घेण्याची ज्याला इच्छा असेल, त्याला वाङ्मयसाधन नसल्याची सबब आतां उरली नाहीं. इसापनीतींतील गोष्टीप्रमाणें मनुष्यानें काढलेल्या सिंहाच्या चित्रावरच आपणांस आतां विसंबून राहाण्याचें कारण नसून सिंहानें काढिलेलें मनुष्याचें चित्रही आपणांस पाहावयास मिळूं लागलें आहे ! पण मराठ्यांनीं केलेल्या इंग्रजांच्या वर्णनापेक्षां मराठ्यांनीं स्वतः लिहिलेल्या कागदपत्रांतून स्वतः मराठ्यांविषयीं रेखाटलेलें जें चित्र पाहावयास सांपडेल, त्याशींच आपणांस अधिक कर्तव्य आहे. हें चित्र न्याहाळून, निरखून पाहाणारास, मराठे म्हणजे निव्वळ उपटसुंभ होते, त्यांनीं लढण्याशिवाय व लुटण्याशिवाय दुसरें कांहींच कधीं केलें नाहीं, त्यांना शांततेचें सुख माहीत नव्हतें, किंवा संघटित राज्यपद्धतीच्या मूलतत्त्वांची ओळख नव्हती, हे आरोप कधीही खरे वाटणार नाहींत.

कै० न्यायमूर्ति माधवराव रानडे यांनीं 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष' या आपल्या लहानशा पण उत्कृष्ट इंग्रजी पुस्तकांत मोठ्या अधिकारयुक्त वाणीनें वरील आरोप सप्रमाण खोडून काढून मराठ्यांची खरी योग्यता हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांच्या लोकांस समजावून दिली, व आपलें पूर्वजऋण, राष्ट्रऋण उत्तम रीतीनें फेडलें-

यांत शंका नाहीं. मराठे म्हणजे सह्याद्रिपर्वतांतील अरण्यामध्यें वावटळीनें उडालेला पाचोळा ! तो एके ठिकाणीं यदृच्छेनें गोळा होऊन त्याचा एकदम भडका झाला व लवकरच शमला. अशा तऱ्हेच्या ग्रांट डफसारख्या इतिहासकार म्हणविणारांनीं केलेल्या मराठेशाहीच्या वर्णनाचा प्रौढ शब्दांनीं पण समर्पक असा खंडनपूर्वक निषेध करून रानड्यांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, अशा लोकांस मराठ्यांच्या इतिहासाचें मर्मच कळलें नाहीं. ते म्हणतात, केवळ लुटारू लोकांच्या हातून पिढ्यानुपिढ्या टिकणाऱ्या पातशाहीची उभारणी कधीं होत नसते, किंवा एका मोठ्या खंडाच्या राजकीय नकाशाला वाटेल तो रंग देण्याचें व तो कायम टिकविण्याचें कार्य घडत नाही. अशा गोष्टी घडून येण्यास मनुष्याचे अंगी कांहीं निराळाच जोम असावा लागतो. क्लाईव्ह व वॉरन हेस्टिंग्ज यांसारख्या धाडसी इंग्रजांच्या हातून ब्रिटिश राज्यासारखी संस्था हिंदुस्थानांत निर्माण होण्यास त्यांच्यामागें असणारी श्रीमान्, बलाढ्य, निश्चयी पण अमूर्त अशा ब्रिटिश राज्याची बुद्धि व सत्ता ज्याप्रमाणें खरी कारणीभूत झाली, त्याप्रमाणें मराठे लोक व्यक्तिशः कितीही धीट, धाडसी व शूर असते, पण त्यांच्याही मनांत राष्ट्रप्रेम किंवा राष्ट्रभक्ति म्हणून कांहीं चीज नसती, मराठी राष्ट्र म्हणून मुळांत कांहींच नसतें, तर त्यांच्या हातून मराठीपदपातशाहीची स्थापना कधींच झाली नसती. महाराष्ट्रांत वीरांप्रमाणें मुत्सद्द्यांचीही परंपरा शेंकडों वर्षे अबाधित चालली, व ही परंपरा राहण्यास मराठी राष्ट्राची अमूर्त कल्पनाच उपयोगीं पडली फिनिक्स पक्ष्याप्रमाणें चितेंतून नवा सजीव प्राणी एरवीं उत्पन्न होत नाहीं. राज्यकार्यधुरंधर अहिरावण-महिरावणांच्या रक्ताच्या एका थेंबागणिक शेंकडों अहिरावण-महिरावण केवळ व्यक्तिनिष्ठ महत्त्वाकांक्षेच्या भूमींत उत्पन्न होऊं शकत नाहींत. मराठे

शेवटीं इंग्रजांच्या हातून जिंकले गेले, यावरून इंग्रज कदाचित् मराठ्यांपेक्षां संस्कृतीनें, राष्ट्रप्रेमानें, उद्योगानें, चिकाटीनें, भौतिक व नैतिक सामर्थ्यानें अधिक श्रेष्ठ होते व आहेत, असें फार तर म्हणतां येईल; पण केवळ एकानें दुसऱ्यास जिंकलें म्हणून एक सर्वगुणसंपन्न व दुसरा अगदीं नादान, असें ठरत नाहीं.

हिंदुस्थानांत इतक्या छपन्न जाति असतां इतरांना जी गोष्ट साध्य झाली नाहीं, ती मराठ्यांना साध्य झाली, इतरांना मोंगलांविरुद्ध चळवळ करून जें यश आलें नाही, तें मराठ्यांस आलें, इतरांना सर्व हिंदुस्थानभर स्वराज्य पसरण्याची जी कला साधली नाहीं, ती मराठ्यांना साधली, या एका गोष्टीवरून मराठ्यांचें वैशिष्ट्य सिद्ध होतें! "जेव्हां एकूणएक माणसांच्या हृदयांत राष्ट्रीय बुद्धीचें बीज पेरलें जातें, किंवा राष्ट्रीय स्वाभिमानाचा भक्कम व खोल पाया रचला जातो, तेव्हांच असले अलौकिक पराक्रम घडून येतात! राष्ट्रीय राजकारण म्हणून ज्यास नांव देतां येईल, अशा प्रकारची एक विलक्षण वृत्तपरंपरा घडून आली, त्यामुळेंच मराठी राज्याची स्थापना झाली." धर्म एक, भाषा एक, राजकीय विचारसरणी एक, सामुदायिक महत्त्वाकांक्षा एक, ध्येय एक, इत्यादि अंतःस्थ ऐक्य-हेतूंना, शत्रु एक, परिस्थिति एक, संकटें एक, वगैरे बाह्य ऐक्य-हेतूंची जोड मिळाल्यानें मराठ्यांची जूट अधिक लवकर किंवा अधिक फलद्रूप झाली असेल; पण मराठी राष्ट्राचा मानसशास्त्रदृष्ट्या विचार करितांना त्यांत ही अंतःस्थ ऐक्य-कारणें नव्हती, असेंमात्र कोणासही म्हणतां यावयाचें नाहीं. या कारणांमुळेंच त्यांना गतकालीं इतकें महत्त्व प्राप्त झालें; आणि रा० ब० रानडे यानीं भविष्यकथनाच्या ऊर्मींत म्हटल्याप्रमाणें "कालेंकरून राष्ट्रीयत्वाच्या तत्त्वानुसार हिंदुस्थान देशाचे भाग पडून, त्या भागांचीं निरनिराळीं संस्थानें बनून,

एकंदर हिंदुस्थानांत बादशाही सत्तेच्या सामान्य सूत्रानें तीं सर्व एकत्र बद्ध होतील. अशा वेळीं हिंदुस्थान देशांत कोणकोणत्या गोष्टी साध्य करितां येतील, आणि ह्या देशाची योग्यता पुढील काळीं कशी होईल, याचा दूरवर विचार करूं पाहाणारास मराठ्यांच्या इतिहासापासून पुष्कळ शिकावयाचें आहे त्यांतही विशेषतः हल्लींच्या मराठी लोकांना पुढील इतिहासांत कोणता कार्यभार उचलावा लागणार आहे, याच्या निर्णयाच्या कामीं मराठ्यांचा इतिहास उपयोगीं पडेल."

नरसिंह चिंतामण केळकर. मराठे व इंग्रज.

---

# पाठ ३५ वा.



## जगांतील अत्यद्भुत चमत्कार.

### भाग १ ला.

या विश्वांत परमेश्वरानें ज्या आश्चर्यकारक वस्तु निर्माण केल्या आहेत, व त्याच्या सृष्टींतील अंशभूत परंतु ज्ञानसंपन्न प्राणी जो मनुष्य, त्यानेंही आपल्या बुद्धिशक्त्यनुरूप ज्या गोष्टी करून ठेविल्या आहेत, त्यांच्याकडे सूक्ष्मावलोकन केलें असतां आपल्या मनाची स्थिति कांहीं चमत्कारिक होऊन जाते! मानवी सृष्टींतील एखादी साधारण मोठी वस्तु दृष्टीस पडली असतां जर आपलें मन इतकें विस्मय पावतें, तर ज्यांच्या स्वरूपाची, योग्यतेची, किंवा गुणांची पारख मनुष्यप्राण्याला झाली नाही, असे सृष्टिनिर्मित पदार्थ डोळ्यांपुढें आले असतां त्यांची सर्व परीची भव्यता मनांत येऊन आपलें अंतःकरण किती सद्गदित होत असेल, याची कल्पना त्या पदार्थांची साधारण तरी योग्यता ओळखणाऱ्या महाविद्वानालाच ठाऊक! क्षुल्लकशा गोष्टींत धांदल घालीत असलेल्या मनास तेथून ओढून

काढून, त्यास विश्वांतील वस्तूंशीं संलग्न होऊं द्यावें; म्हणजे त्या वस्तूंच्या दर्शनानें त्याच्यांत चमत्कारिक विचार उत्पन्न होऊन त्यास एक प्रकारचा अपूर्व सुखानुभव घडतो! परंतु सदैव अरण्य-वासास सुखावलेल्या रानटी मनुष्यास नागरिक सुखाची गोडी लावून देणें जसें परम दुर्घट आहे, किंवा आपल्या डाव्या हातास उजव्या हाताची क्रिया करण्यास पात्र करणें जसें बिकट आहे, तद्वत् प्रापंचिक विचारांत निमग्न होऊन त्यांतच सुख मानीत असलेल्या मनास वर सांगितल्याप्रमाणें गंभीर विचार करावयास लावणें अतिशय आयासांचें काम होय. कोणती कां होईना, एकवार संवय मनास किंवा शरिरास जडून ती कायमची झाली, म्हणजे तिच्या स्थितींत फेरफार करणें अत्यंत श्रमसाध्य होय. जागिक विचारांतून पाहिजे तेव्हा अन्य गंभीर विषयाकडे मनाला नेतां येण्याची शक्ति लहानपणापासूनच्या तशा प्रकारच्या शिक्षणक्रमापासून मनुष्याच्या ठायीं येते. व ही शक्ति आमच्या पूर्वजांच्या अंगीं विशेषत्वानें होती. यामुळें त्यांज-कडून विद्यादेवीची सेवा झाली आहे, नाही तर कधींही होतीना! सांप्रतकालीं युरोपच्या कांहीं सुधारलेल्या लोकांत ही शक्ति विशेषें-करून आढळते; म्हणूनच त्यांच्यांत आजपर्यंत महान् महान् तत्त्व-वेत्ते, सत्कवि व ग्रंथकार निपजले आहेत. अस्तु.

वस्तुविशालत्वाच्या अंगी कांहीं अमोलिक गुण आहे. तें वस्तु-विशालत्व दृष्टीस पडलें असता, त्याच्याविषयी आपल्या मनांत एक प्रकारची अननुभूत वृत्ति उत्पन्न होते. मनुष्यानें आपलें बुद्धिकौशल्य व शरीरसामर्थ्य ज्यांत प्रकट केलें आहे, अशीं भव्य व सुंदर मंदिरें, त्याचप्रमाणें मेघमंडळांत आपली बर्फमय डोकीं घुसविणारे उच्च पर्वत, विस्तीर्ण मैदानें, विशाल महासागर, भयाण खोल दऱ्या, महापुरानें शरीर फुगवून वेगानें फोंफावत जाणाऱ्या आणि कोठें कोठें उंच

कड्यांवरून मेघगर्जना करीत उड्या टाकणाऱ्या प्रचंड नद्या, यांशिवाय ज्यांच्या स्वरूपांत अद्‌भुतता व भव्यता वास करीत आहे, असे सृष्टींतील नानाप्रकारचे पदार्थ, ज्याच्या ज्याच्या म्हणून पाहण्यांत आले असतील, तो मनुष्य—मग तो विद्वान् असो वा अविद्वान् असो—सकृद्दर्शनीं विस्मयानें चकित होऊन जात असेल, यांत शंका नाहीं.

पदार्थाला उत्पन्न होऊन जितका काळ जास्त झाला असेल, तितका त्याच्या अंगीं एक प्रकारचा पूज्यभाव उत्पन्न करणारा धर्म दुणावत जातो, असा नियमच आहे. सृष्टींतील पदार्थ या दोन्ही गुणांनीं विशिष्ट आहेत, म्हणून आजपर्यंत विद्वान् तत्त्ववेत्ते त्यांच्याकडे कौतुकानें पाहात आले आहेत.

अनंत कालापासून ह्या जगतीतलावर भिन्न भिन्न काळीं, भिन्न भिन्न स्थळी, अनेक राष्ट्रें उत्पन्न होऊन ती लयास गेलीं आहेत. कांहींना लयास जाऊन इतकी वर्षें होऊन गेलीं आहेत कीं, त्यांच्या अस्तित्वाची कल्पनाही होत नाहीं ! जगांत कालावधीनें स्थित्यंतर होत जाणें साहजिकच असल्यामुळें एखादें राष्ट्र काळापुढें लक्षावधि वर्षें टिकाव धरून राहिलें, असें कधींही घडणार नाही. म्हणून कोणत्याही राष्ट्रानें आपल्या शाश्वतीविषयीं फुशारकी मारणें विचारदृष्ट्या हास्यास्पद होय ! एके वेळीं ज्या स्थळी विशाळ शहरें व सुंदर इमारती वसवून बुद्धिमान् मनुष्यें प्रबळ राष्ट्ररूपानें आपल्या अस्तित्वाच्या चिरंजीवित्वाबद्दल खात्री बाळगून वास्तव्य करीत होतीं, त्या स्थळीं प्रस्तुत पहावें तर सपाट मैदानें किंवा भयंकर अरण्यें पाहण्यांत येतील ! तथापि अनंत कालाशी तुलना केली असतां, अलीकडील वाटणाऱ्या कांहीं राष्ट्रांना लयास जाऊन जरी हजारों वर्षें झालीं आहेत, तरी मोडकळीस आलेल्या किंवा मोडून अस्ताव्यस्त पडलेल्या, ज्या त्यांच्या शेष सुंदर खुणा

इमारतींच्या रूपानें कोठें कोठें दृष्टीस पडतात, त्यांजवरून त्यांच्या अस्तित्वाबद्दल खात्री वाटून त्यांच्या पूर्ववैभवाची व सामर्थ्याची कल्पना मनांत आल्यानें तीं नष्ट झाल्याबद्दल फार उदासीनता वाटते ! पुष्कळ रूपांतरें पावलेलीं हिंदुस्थान, चीन, ग्रीस, मिसर व रोम, इत्यादि प्राचीन राष्ट्रें ज्या ठिकाणीं आहेत व होतीं, तेथें त्यांच्या पूर्वींच्या वैभवाचीं स्मारकेंच होऊन राहिलेल्या अनेक रमणीय इमारती व दुसरीं मनुष्यकृत्यें, यांचें प्राचुर्य हल्लीं आढळेल. परंतु इतर देशांत जीं मानवी कृत्यें आहेत, त्यांपेक्षां हिंदुस्थानांतल्या मानवी कृत्यांत एक विशेष फरक आहे. भिन्न भिन्न काळीं ज्या ज्या धर्मानुयायांचें विशेष प्राबल्य असे, त्यांनीं त्यांनीं आपापल्या मुख्य ठिकाणीं इमारती वगैरेंच्या रूपानें आपली संपन्न स्थिति प्रगट केली आहे. परंतु अशीं धर्मानुगामी राज्यें भिन्न स्थळीं होतीं, यामुळें त्यांनीं वसविलेल्या शहरांच्या मोडक्या खुणा अथवा इमारती वगैरे पहावयाच्या असल्यास त्या त्या स्थळीं हिंडलें पाहिजे. एकाच देशांत थोड्या कालांत निरनिराळ्या धर्मांचें स्वामित्व गाजलें, असा एक हिंदुस्थान देशच होय. पूर्वींचा वैदिक धर्म, मध्यंतरीं सर्व देश ग्रासून राहिलेला बौद्धधर्म, पुन्हा झालेली वैदिकधर्माची प्रवृत्ति, नंतर अलीकडचा महंमदी धर्म, या तिहींनीं आपली सत्ता कैक दिवस या देशावर चालविली होती; म्हणून त्या त्या धर्मपालक राजांनीं आपल्या सुस्थितींत या देशांत अनेक आश्चर्यकारक कामें केलीं आहेत. यामुळें या तिन्ही धर्मानुयायांच्या रुचिभिन्नत्वाप्रमाणें बांधल्या गेलेल्या इमारती वगैरे या एकाच देशांत प्रवास केल्यानें दृष्टीस पडून आम्हांस तीन प्रकारची मौज पाहण्यास सांपडते ! दक्षिणेंतील हिंदुलोकांनीं बांधिलेलीं चिदंबर, श्रीरंग, मदुरा व तंजावर येथील टोलेजंग देवालयें, व

घारापुरी, वेरूळ, कार्लें, कान्हेरी, अजंठा (फैजापूर) येथील बौद्धांचीं कोरीव लेणी, आणि दिल्ली, आग्रा, लाहोर, अहमदाबाद, अहमदनगर आणि विजापुर येथील मुसलमानांच्या भव्य व मनोहर इमारती, हीं सर्व वरील तिन्ही धर्मांचीं दर्शकें होत! खेरीज यांपैकीं कोरींव लेणीं व जुनीं देवळें यांपासून आणखी एक उपयोग आहे. या बहुतेकांवर बांधणाराचें नांव, शक इत्यादि असून शिवाय कर्त्याचें अल्प वर्णन आहे. यामुळें आम्हांस अनेक जुन्या पुरुषांचे कालाची संगति लावण्यास तीं उपयोगीं पडत आहेत. नाहीं तर, एवढा कविकुलगुरु कालिदास, इतका रसिक भवभूति व प्रत्यक्ष सरस्वतीचें मुख असा बाण, हे केव्हां झाले, याची दादसुद्धां लागली नसती. मग इतर साधारण जनांची कथा काय? शिवाय आपल्या देशांत सृष्टिनिर्मित पदार्थांचें जागोजागीं वैपुल्य आहे. तेव्हां इतक्या चिजा आमच्या हिंदुस्थानांत असूनही आपल्या लोकांस त्यांचा ठिकाणा नाहीं! काशीपासून रामेश्वरापर्यंत जरी शेंकडों तीर्थें धुंडाळलीं, तथापि सृष्टिसौंदर्यावलोकनाची गोडी आमच्या लोकांस नसल्यामुळें, त्यांच्या नजरेस येणाऱ्या पदार्थांपासून त्यांस तादृश आनंद वाटत नाहीं!

---

## पाठ ३६ वा.



## जगांतील अत्यद्भुत चमत्कार.

### भाग २ रा.

आतां असे चमत्कार पाहाण्यापासून लभ्यांश कोणता, हा एक प्रश्न कोणीही साहजिकच करील. म्हणून त्याच्या समाधानाकरितां त्यासंबंधानें कांहीं लिहिणें आवश्यक आहे. व्यक्तिमात्रानें असें खात्रीनें समजलें पाहिजे कीं, या सृष्टींत परमेश्वरानें जें जें म्हणून

उत्पन्न केलें आहे, त्या सर्वांत भिन्न पण विशेष प्रकारचें कांहीं एक उपयोगीत्व आहे. आपण नेहमीं पाहतों कीं, व्यवहारांतली एखादी वस्तु, जी एखाद्या विशेष कामाला उपयोगीं पडत नाहीं, तीच दुसऱ्या कामाला उपयोगीं पडते. असाच प्रकार सृष्टींतल्या वस्तूंविषयीं आहे. त्या वस्तूंपैकीं कांहीं वस्तु मनुष्याच्या आटोक्यांत असल्यामुळें त्यांचे उपयोगीत्वमात्र त्याचे नजरेस येतें. पण जग हें विशाल व अनंत असून त्याच्या मानानें मनुष्यप्राणी हा अणुरेणूपेक्षांही अधिक क्षुद्र असल्यामुळें जगांत पसरलेल्या सर्वच वस्तु त्याच्या हातीं लागतील, किंवा त्यांचें स्वरूप व गुण त्याच्या दृष्टोत्पत्तीस येतील असें नाहीं. मनुष्याचें ज्ञान अगदींच अल्प आहे, आणि आतां आहे त्यापेक्षा आणखी लक्षपटीनें जरी वाढलें तरी तें अल्पच ! या विश्वांत अशा कांहीं गोष्टी आहेत कीं, त्या मनुष्याचे ज्ञानदृष्टीस, ती त्यानें कितीही लांबविली तरी, कधींही गोचर होणार नाहीत ! विश्वाच्या तुलनेनें अणुमात्र, पण मनुष्यास अति विशाल वाटणाऱ्या ह्या भूगोलाच्या रचनेचें, त्याच्या घटकावयवांचें, त्याच्यांतील लहानमोठ्या वस्तूंचें व प्राण्यांचें यथार्थ ज्ञान जर त्यास झालें नाही, व पुढें कधीही होण्याचा संभव नाही, तर अनंत आकाशमंडळांतील अशा प्रकारच्या कोट्यावधि भूगोलाविषयींचें ज्ञान त्यास कधीं तरी होण्याची आशा आहे काय ? मुळींच नाहीं. तथापि तें ज्ञान होत नाहीं म्हणून निराश होऊन उगीच बसणें, हें मनुष्यास शोभत नाहीं; व सृष्टिकर्त्याचा तसा उद्देशही नाहीं. हें मनुष्यास चांगलें समजत असल्यामुळें त्याचे आजवर अनेक दीर्घ उद्योग चालले आहेत ! कोणी अज्ञात प्रदेशाला उघडकीस आणावा म्हणून अनेक संकटांस न जुमानतां त्या प्रदेशांत शिरत आहे; कोणी पृथ्वीच्या पोटांत खोल जाऊन तिची उदर-

रचना पाहण्यांत गुंतला आहे; कोणी समुद्राच्या तळीं बुड्या मारीत आहे; कोणी दुर्बिणीच्या मध्यस्थीनें आकाशस्थांचा स्नेह संपादण्यांत सारी रात्र जागून काढीत आहे; कोणी कांहीं, कोणी कांहीं, अशा नानाप्रकारच्या उद्योगांत जो तो गढला आहे. अशा रीतीनें त्यास उद्योगास प्रवृत्त करणारी व त्या उद्योगाची योग्यता समजण्यास त्यास पात्र करणारी, अशी एक महाप्रतापशाली ज्ञानशक्ति त्याजपाशीं आहे म्हणूनच तो इतर प्राण्यांतून ओळखला जातो.

मनुष्याच्या ज्ञानशक्तीचा जो एवढा प्रभाव गाजतो आहे, व तिचा परिणाम जो इतका त्याच्या स्थितीवर घडत आहे, त्यास कारणीभूत व साहाय्यभूत अशा ईश्वरनिर्मित वस्तुच आहेत. त्या वस्तूंच्या सूक्ष्म अवलोकनानें त्याचा ज्ञानांकुर वाढून त्याचा हा प्रचंड वृक्ष बनला आहे! त्यानें आपल्या ज्ञानबळामुळें जें जें केलें आहे, तें तें सर्व शिकण्याला त्यास प्रथमतः सृष्टीपासून पहिलें शिक्षण मिळालें आहे. सृष्टींतल्या वस्तु ओबडधोबड स्थितींत आढळतात, हें खरें; तथापि तेवढ्यावरून मानवी प्राण्यास आपल्या बुद्धीचा सदुपयोग करण्याचें ज्ञान मिळतें. उदाहरणार्थ, अमेरिकेंत व्हार्जि-निया, ओगेरेस, वगैरे प्रांतांत जे सृष्टिनिर्मित सेतु आहेत ते सृष्टीनें मनुष्यास सेतु बांधण्याचें ज्ञान व्हावें, म्हणून कित्तेच घालून ठेविले नाहींत, असें कोणीं म्हणावें! ब्रनेल नांवाच्या साहेबानें जो थेम्स नदीखालचा एवढा प्रचंड बोगदा तयार केला, त्यास तो बोगदा तयार करण्याचे कामीं लांकूड कोरणारा एक किडाच गुरु झाला! अस्तु. सारांश काय कीं, सृष्ट्यवलोकनानें मनुष्याला ज्ञानप्राप्ति होते, हें तत्त्व युरोपियन पंडितांना माहीत झाल्यामुळें त्यांचा त्या विषयावर दृढाभ्यास चालला आहे.

मनुष्यकृत वस्तूंचादेखील मनुष्याला मोठा उपयोग आहे. प्राचीन व अर्वाचीन काळीं मनुष्यानें जीं कामें करून ठेविलीं आहेत, तीं पाहिल्यानें त्याचें पूर्वींचें ज्ञान कसें होतें, हल्लींचें कसें आहे, कालांतरानें त्यांत कसा फरक पडत गेला, इत्यादि प्रकारची माहिती त्यास होते व ती झाल्यानें त्यास आपल्या प्रस्तुतच्या ज्ञानांत बरीच सुधारणा करितां येतें. ग्रीस व इजिप्त देशांत ज्या इमारती आहेत, त्या इतक्या सुंदर व शिल्पकलाविशिष्ट आहेत कीं, त्यांचें रमणीयत्व, विशालत्व व अलंकारीत्व पाहून अर्वाचीन शिल्पकलाप्रवीण कारागीर तोंडांत विस्मयानें बोटेंच घालतात ! व तशीं कामें वठविण्याकरितां त्यांचा दीर्घ प्रयत्न चालू आहे. याशिवाय आणखी एक फायदा त्यापासून होणारा आहे. तो हाच कीं, ऐतिहासिक कादंबरी वाचतांना, तिच्यांतील कांहीं विशेष मजेचीं स्थळें मधून मधून चित्ररूपानें तीत दाखविलीं असलीं, म्हणजे तीं जशीं मनांत चांगलीं ठसतात, त्याप्रमाणें अशा इमारती भिन्न राष्ट्रांच्या वेळांचीं चित्रें असल्यामुळें, इतिहास जास्त खुलून त्यापासून मोठा आनंद वाटतो. दिल्ली, आग्रा, विजापूर येथें जर इमारती नसत्या, तर मोंगलांच्या इतिहासाला इतकी गोडी आली नसती ! शिवरायाच्या साहसकृत्यांबद्दल त्याचे डोंगरी किल्लेच साक्ष देत आहेत. या खुद्द पुण्यांत जीं थोडीबहुत पेशव्यांच्या वेळचीं कामें आहेत, तीं जर नसतीं, तर नुसता कोरडा त्यांचा इतिहास वाचल्यापासून इतका संतोष वाटला नसता, हें अगदीं उघड आहे. तेव्हां अशीं जुनीं कामें पाहिल्यापासून केवढा फायदा होतो हें सिद्ध झालें. आणखी एक चमत्कारिक गुण या पुराण्या इमारतींच्या अंगीं आहे. तो कोणता ? तर प्रेक्षकांच्या मनांत ऐतिहासिक प्रेरणा उत्पन्न करण्याची शक्ति. गिबन यानें जो रोमचा एवढा प्रचंड इतिहास लिहिला, तो लिहिण्यास त्याच्या मनास

अशा प्रकारच्या जुन्या इमारतींनींच प्रेरणा केली त्यानें स्वतः आपल्या इतिहासाच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे कीं, सन १८६४ च्या आक्टोबर महिन्याच्या १५ व्या तारखेस रोम येथें क्यापिटॉलच्या जुन्या मोडकळीस आलेल्या इमारतीपाशीं, मी, संध्याकाळची हवा घेत मजेनें बसलों होतों. त्या वेळेस जुपिटरच्या देवालयांत मठवासी लोक सायंकाळचीं गीतें म्हणत होते. अशा समयीं त्या शहराच्या सत्तेचा ऱ्हास व्हावयास लागून तिचा लय कसा झाला, याविषयीं इतिहास लिहिण्याची कल्पना माझे मनांत उद्भवली." असो. तर अशा प्रकारचे अनेक फायदे प्राचीन काळच्या इमारती व दुसऱ्या कांहीं गोष्टी, त्याचप्रमाणें सृष्टि-निर्मित पदार्थ, यांच्या अवलोकनानें होत आहेत. शिवाय "भूवर्णन," "भूस्तर-विद्या" इत्यादि शास्त्रांतल्या गोष्टी अशा रीतीनें समजण्यास जशा सुगम होतील, तशा नुसत्या ग्रंथाध्ययनानें होणार नाहींत.

रा. भि. जोशी. निबंधचंद्रिका.

---

## पाठ ३७ वा.



### व्यायाम.

प्रत्येक मनुष्यानें विशेषतः ज्या दोन गोष्टीकडे लक्ष दिलें पाहिजे, त्या ह्याः मानसिक श्रम फार झाल्यानंतर मनाला विश्रांति देणें व शरीरश्रम फार झाल्यानंतर शरिराला विश्रांति देणें. शरीर आणि मन यांचा परस्परांशीं फारच निकट संबंध आहे, हें सांगण्यास नको. 'शरीर सुखी तर मन सुखी, आणि मन सुखी तर शरीर सुखी'. हा नियम प्रत्येकाच्या अनुभवांतला आहे; तरी याचें पुष्कळां-

कडून प्रत्येक दिवशीं उल्लंघन होत आहे. हें खरें आहे कीं, केवळ शरीरसामर्थ्यसंपादनाकडेच सामान्य लोकांस सर्व लक्ष पुरवितां येत नाहीं, व तसें करून फायदाही नाहीं. तरी सर्व सुखास अवश्य जें आरोग्य, तें असण्याची सर्वांनीं काळजी घेतली पाहिजे; व सुदैवानें ज्यांस पोटासाठींच शरीर झिजवावें लागत नसेल, त्यांनीं अन्नपचन होऊन रुधिराभिसरण चांगलें चालण्यासाठीं व्यायाम करणें अवश्य आहे.

मनुष्यास अनेक कारणांनीं मरण येतें, ही गोष्ट जरी सर्वमान्य आहे, तरी क्षीण शरिरांवर व्याधींचा अंमल लवकर बसतो व तशीं शरिरें तेव्हांच काळाच्या जबड्यांत पडतात, हें कोणता विचारी पुरुष कबूल करणार नाहीं ? महत्पदाची आकांक्षा असणें हें श्लाघ्य होय. पण दीर्घपरिश्रमसंपादित महत्पदाचा किंचित्कालपर्यंतही उपभोग घेतां येऊं नये, हें किती शोचनीय ! ही एकव्यवसाय-निरति किती निंद्य ! असो. अलीकडे निराळ्या तऱ्हेचें शिक्षण मिळूं लागल्याकारणानें नवीन पिढीच्या धर्मविचारांत मोठीच क्रांति होत आहे, ही गोष्ट प्रत्येक विचारी मनुष्याच्या नजरेस येण्याजोगी आहे. सूर्यास प्रातःकाळीं नमस्कार घालण्याची किंवा सायंकाळीं देवदर्शनास जाण्याची चाल नवीन लोकांतून दिवसें दिवस मुळींच जात चालली व तिच्या जागीं इंग्रजी रिवाजाप्रमाणें हवा खाण्यास जाण्याचा बराच प्रघात पडला आहे, व त्यांत दोष काढण्यासारखें कांहीं नाहीं. या प्रघाताचा उत्तरोत्तर प्रसार होईल तितकें चांगलेंच. पण पायांनीं व्यायाम करण्यानें अल्प काळांत जितकें हित व्हावें तितकें होत नाहीं. व्यायाम असा असावा कीं, तो थोडा काळ केला, तरी अंगांत चांगली उष्णता उत्पन्न होऊन सर्व अवयव एकसारखे दृढ व्हावे. हा हेतु कांहीं अंशीं साधारण पळण्यानें

तडीस जाईल. पण संध्याकाळ झाला कीं, रस्त्यारस्त्यानें आपलें पळत सुटावें, हें कोणास आवडणार नाहीं. यासाठीं इंग्रज लोकांतील क्रिकेट-कंपन्यांप्रमाणें "खोखो," किंवा "विटीदांडू," किंवा "मुदुंगपाट्या" खेळण्यासाठीं लहानमोठ्या लोकांनीं एकत्र जमण्याची चाल पडली, तर फार बरें होईल असें वाटतें. या खेळांनीं थोड्या वेळांत चांगली मेहनत होते व अंगांत हुषारी येते. निरनिराळ्या हुद्द्यांची मंडळी उच्चनीचत्वाचा भाव एकीकडे ठेवून एकत्र जमल्यानें त्यांच्यांत चांगली मैत्री होऊन प्रेमवृद्धि होण्याचा संभव आहे. अशा प्रकारचे खेळ खेळण्याच्या उद्देशानें एके ठिकाणीं आल्यामुळें एकांतच दोन कामें होतात. एकीकडे व्यायाम, आणि एकीकडे मंडळी आणि तीपासून होणारे फायदे. इंग्लंड देशांत आणि युरोपांतील इतर देशांत शहरोशहरीं कॉफी पिण्याचीं घरें झालीं आहेत; तेथें वर्गणी देऊन मोठमोठे विद्वान् ग्रंथकर्ते, कल्पक, नाटक आणि कादंबरीकर्ते, समयानुरूप खुबीदार भाषणकर्ते, राज्यकार्यनिष्णात मोठे मोठे राज्याधिकारी, अशा प्रकारची अनेक तऱ्हेची लहानमोठ्या योग्यतेची मंडळी एकत्र जमते. असें जमण्याची चाल युरोपखंडांत अंगदीं सर्वसाधारण आहे. तसेंच, युरोपखंडांत मोठमोठ्या शहरांतून सार्वजनिक उद्यानें आणि विनोदस्थानें आहेत. त्या ठिकाणीं आनंदानें हवा खाण्यास व व्यायाम करण्यास स्त्रीपुरुष निघतात व संध्याकाळच्या दोन घटका दररोजची कर्मकटकट एकीकडे ठेवून सुखांत घालवितात. आमच्या देशांत स्त्रियांनीं अशा रीतीनें बाहेर पडणें कोणास आवडणार नाहीं, तरी सध्यां लोकांच्या विचारांत एकसारख्या होणाऱ्या फेरफारांवरून पाहतां स्त्रियांच्या संबंधानें जें होईल तें होवो; पण पुरुषांनीं तरी शरीरशिक्षणाकडे विशेष लक्ष पुरवावें.

**गो. ग. आगरकर.** **के. नि. निबंध.**

# पाठ ३८ वा.



## मल्हारप्रतिज्ञा.

रघुनाथरावदादा, सुभेदार मल्हारराव होळकर व जयाप्पा शिंदे हे हिंदुस्थानांत मुलूखागिरीकरितां निघाले. नर्मदा उतरल्यानंतर खंडण्या घेत घेत ही मराठ्यांची फौज जाटांच्या[1] मुलुखांत येऊन थडकली. तेव्हां तेथील राजा सुरजमल्ल जाट याजकडील वकील रूपराम चौधरी हा दादासाहेबांस येऊन भेटला. नंतर खंडणीविषयीं बोलणें सुरू झालें, तेव्हां दादासाहेबांनीं एक कोट रुपये खंडणी मागितली! वकील चाळीस लक्षांपर्यंत देण्यास तयार झाला; परंतु दादासाहेबांस ती गोष्ट न रुचून त्यांनी कुंभेरीच्या[2] बाजूस आपल्या सर्व सैन्यासुद्धां कूच केलें.

रूपराम चौधरी तेथून परत जाऊन सुरज़मल्लास भेटला व त्यानें सर्व घडलेला वृत्तान्त त्यास सांगितला. सुरजमल्लही स्वतः चांगला फौजबंद होता. सबब त्यानें कुंभेरीचा बंदोबस्त करून तेथें मराठ्यांची फौज येऊन दाखल होताच, दादासाहेबांस, 'चाळीस लक्ष रुपये देतों, ते घ्यावे; मर्जी नसल्यास मी युद्धास सिद्ध आहें'. असा निरोप, स्वाराबरोबर पांच गोळे व दारू देऊन पाठविला. हा निरोप पोंचतांच दादासाहेबांस राग येऊन त्यांनीं कुंभेरीस चोंहीकडून मोर्चेबंदी करून वेढा दिला.

---

१ जाट लोक प्रथम पंजाबांतून निघून दिल्लीकडील मुलुखांत येऊन वसाहत करून राहिले. त्या वेळीं त्यांचा धंदा शेतकीचा होता. औरंगजेब बादशहाच्या मरणानंतर त्याच्या मुलांत आपसांत तंटे होऊन लढाई सुरू झाली. त्या वेळीं जाट लोक आपापल्या गांवांस गढ्या बांधून राहूं लागले व तेथून पुढें ते क्षात्रधर्मांत शिरले.—कर्नल टॉडकृत, ' राजस्तानाचा इतिहास.'

२ हें शहर भरतपूरच्या वायव्येस आहे.

वेढा पडतांच हल्लचास आरंभ होऊन परस्पर गोळागोळी सुरू झाली. याप्रमाणें आठपंधरा दिवस गेले. किल्ला फार मजबूत असल्यामुळें सर करण्यास असाध्य होता. कोटास सुरुंग पाडावे, तर तो प्रदेश रेतीचा असल्यामुळें सुरुंग पाडतां येईना. तोफ खालीं धरावी, तर गोळा रेतींत पडूं लागला. वर धरावी तर किल्ल्यावरून पार जाऊन उलट त्यांच्याच (मराठ्यांच्या) फौजेंतील लोक जायां होऊं लागले! तशांत आंतून कोणी सल्लचाचें बोलणें बोलावयासही येईना. याप्रमाणें कठिण प्रसंग प्राप्त झाला! अशा रीतीनें दीड महिना गेला.

याप्रमाणें युद्ध सुरू असतां एके दिवशीं सुभेदारांचे चिरंजीव खंडेराव होळकर, हे भोजन करून मोर्च्यांत निशाणापाशीं जाऊन उभे राहिले; तों अकस्मात् प्रळयकाळच्या विजेसारखा जेजालेचा गोळा येऊन त्यांच्या अंगावर पडला! त्यासरसें लागलेंच त्यांचें देहावसान झालें! हें वर्तमान ऐकतांच अंगावर पर्वत कोसळून पडल्याप्रमाणें सुभेदारांस दुःख झालें! मोर्च्यांत येऊन पुत्राचें प्रेत पाहातांच त्यांनीं धाडकन जमिनीवर अंग टाकिलें! त्यांस चिरंजीव काय ते एवढेच एकुलते एक असल्यामुळें ते अतिशय शोक करूं लागले! जगांत मनुष्याला जीं अनेक दुःखें होतात, त्यांत वृद्धापकालीं, एकुलत्या एक व तशांतही कर्त्या-सवरत्या पुत्राच्या निधनाच्या दुःखासारखें दुसरें कोणतेंही दुःख नाहीं! याचा अनुभव त्याच स्थितींतील मनुष्यास येतो. इतरांस कल्पना करून तो कळण्यासारखा नाहीं! असो. दादासाहेबांनीं व जयाप्पा शिंदे वगैरे सरदारांनीं सुभेदारांस चार ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगून शांत केलें. नंतर प्रेत मोर्च्यांतून उचलून नेलें.

ही हृदयविदारक बातमी खंडेराव होळकरांची मातुश्री गौतमाबाई व महापतिव्रता—केवळ पतिव्रतापंचकांतील अहल्येप्रमाणें परम

पवित्र—अशी त्यांची पत्नी अहल्याबाई, या दोघींस समजल्यावर त्यांच्या मनांची काय स्थिति झाली असेल, व तेथें केवढा आकान्त गुजरला असेल, याचें वर्णन करण्यास आमची लेखणी असमर्थ आहे! थोड्या वेळानंतर अहल्याबाई आपला शोक आंवरून पतीच्या शवापाशीं आल्या, व पतिमुखावलोकन करून सती जाण्यास आपल्या श्वशुराची परवानगी मागूं लागल्या! तेव्हां तर मल्हार-रावांस चोंहीकडून आभाळ कोसळून पडूं लागल्याप्रमाणें अपरि-मित दुःख झालें! व त्या दुःखवेदनांनीं विव्हळ होउन ते अति-शय शोक करूं लागले! एवढे धनंजयासारखे शूर व ज्यांचें नांव ऐकतांच शत्रूची पांचांवर धारण बसत असे, असे रणगाजी मल्हार-राव होळकर! पण या वेळेस एखाद्या दीन अबलेप्रमाणें अहल्या-बाईच्या पोटांत डोकें घालून रडूं लागले! व म्हणाले कीं, 'बाळे अहल्ये, तूंही या वेळेस सती जाऊन मला म्हाताऱ्याला चोंहीकडून उघडा करितेस काय? तुजकडे पाहून मी अहल्या गेली आणि खंडू आहे, असें समजून आपल्या मनास धीर देईन!' खरोखर, हे मल्हार-रावांचे अंतःकरणास झोंबणारे रडव्या सुरांतील शब्द आणि त्या वेळेचा तो उदास व शोकप्रद देखावा, यांचा विचार केला, तर ज्याचे हृदयास पाझर फुटणार नाहीं, असा पाषाणहृदयी मनुष्य क्वचित्च सांपडेल! असो. दोघां स्नुषाश्वशुरांचा व गौतमाबाईचा शोक कांहींसा शांत झाल्यावर सुभेदारांप्रमाणेंच आणखी इतर सरदारांनीं व दादासाहेबांनीं अहल्याबाईस सती न जाण्याविषयीं चार समजुती-च्या गोष्टी सांगून त्यांचें मन वळविलें. नंतर खंडेरावांचे प्रेतास यथाविधि अग्निसंस्कार होऊन उत्तरकार्यास आरंभ झाला!

ज्या मुलास आपण मांडीवर घेऊन खेळविलें, ज्याच्या कोमल व मृदु गालांचें अनेकवार प्रेमानंदांत चुंबन घेतलें, ज्याचे नाना-

प्रकारच्या वस्तु देऊन लाड व हट्ट पुरविले, ज्याचें रमणीय व कोमल हास्यमुख पाहून मोठमोठीं भयंकर दुःखें क्षणभर तरी विसरलों, ज्याचे बोबडे बोल ऐकून व बाललीला पाहून कर्णद्वारें व नेत्रद्वारें प्रेमामृताचे वारंवार घुटके घेतले, ज्याची दिगंतरीं कीर्ति व्हावी म्हणून त्यास उपयुक्त कला शिकविल्या, वयांत येतांच रूपवान् व सद्गुणी अशा कुलीन मुलीशीं ज्याचा लग्नसमारंभ केला, व सत्कीर्तिवान् निपजून आतां आपणांस वृद्धापकाळीं हा सुख देईल, अशी ज्याची आशा दिसूं लागली, अशा आपल्या एकुलत्या एक सत्पुत्राच्या आकस्मिक मरणास जो कोणी प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीनें कारण झाला असेल, त्याचा सूड उगविण्याचा प्रयत्न केल्याशिवाय कोणताही मानी व पाणीदार पुरुष—निदान त्या (इ. स. च्या १८ शतकांत) काळांत—राहिला असता असें आम्हांस तरी वाटत नाहीं! मग मल्हारराव तर स्वतः अत्यंत पराक्रमी असून मोठे फौजबंद सरदार होते. त्यामुळें सुरजमल्ल जाट हा आपल्या पुत्राच्या अकाली मरणास अप्रत्यक्ष रीतीनें कारण झाला, असें त्यांस वाटून त्याचा सूड घ्यावा, म्हणून खंडेरावांचें उत्तरकार्य करीत असतांच, त्वेषानें दांत-ओठ चावून त्यांनीं भयंकर प्रतिज्ञा केली कीं, "सुरजमल्लाचा शिरच्छेद करून कुंभेरीची माती यमुनेंत टाकीन, तरच जन्मास आल्याचें सार्थक! नाहीं तर प्राण-त्याग करीन!"

मु. म. अत्रे. मल्हारराव होळकर यांचें चरित्र.

---

## पाठ ३९ वा.



## श्रीकृष्णाची थोरवी.

### भाग १ ला.

श्रीकृष्णासारखा सर्वतोपरी अद्वितीय पुरुष हिंदुस्थानांतच काय, पण कोणत्याही देशांत आजवर झाला नाहीं. अलौकिक पराक्रम, अप्रतिम बुद्धिमत्ता, असामान्य स्वार्थत्याग, इत्यादि सद्गुणांनीं श्रीकृष्णाची व्यक्ति सर्व ऐतिहासिक, किंबहुना काल्पनिक व्यक्तींच्या शिरःस्थानीं अधिष्ठित झाली आहे. नेपोलियनसारखा पराक्रम व नेपोलियनसारखी बुद्धिमत्ता इतिहासांत अन्यत्र दिसत नाहीं. पण नेपोलियनची स्वार्थपरायणता त्याच्या पराक्रमाप्रमाणें व बुद्धीप्रमाणेंच अवाढव्य होती. या स्वार्थतत्परतेनें त्यास बुद्धि व पराक्रम यांच्या साहाय्यानें रंकाचा सार्वभौम बनविलें. पण त्याच स्वार्थतत्परतेनें त्यास पुन्हा सार्वभौमाचा रंक करून सोडलें. नेपोलियनचें भाग्यही त्याच्या पराक्रमासारखें अद्वितीय नव्हतें; व हा अभागी पुरुष शेवटीं कैदेंत पडून एका कोनाकोपऱ्यांतील बेटांत मरण पावला. याच्या उलट श्रीकृष्णानें आपल्या दीर्घ आयुष्यांत जें जें मनावर धरलें, तें तें सिद्धीस नेलें. मोठमोठ्या युद्धांत किंवा राजकारणांत त्याच्या बुद्धिमत्तेनें विजयच संपादन केला. आणि या सर्व कामांत स्वार्थ त्यास कधीं शिवला नाहीं. सारांश, नेपोलियनचा पराक्रम, वाशिंग्टनचा स्वार्थत्याग, ग्लॅडस्टनबिस्मार्कप्रभृति मुत्सद्द्यांचा नय, हे श्रीकृष्णाच्या ठिकाणीं एकवटले होते. आणि सर्वांत अधिक गोष्ट ही कीं, श्रीकृष्ण जसा राजकारणांत अग्रणी होता, तसा परमार्थांतही होता. बुद्ध, ख्रिस्त, महंमद इत्यादि धर्मसंस्थापकांत त्याची गणना करण्यास प्रत्यवाय नाहीं. महंमदानें निश्चयानें आपल्या

धर्मांचा प्रसार केला. ख्रिस्तानें सौजन्यानें व बुद्धानें बुद्धिवादानें. श्रीकृष्णाच्या ठिकाणीं निश्चय, सौजन्य व बुद्धिवाद या तिन्ही गोष्टी वसत होत्या. तात्पर्य, बल, सौंदर्य, बुद्धि, पराक्रम, साहस, नय, निश्चय, शांति, सौजन्य, ज्ञान, स्वार्थपराङ्मुखता, इत्यादि अनेक लोकोत्तर गुण भाग्यैश्वर्यासहित श्रीकृष्णाच्या ठिकाणीं होते. श्रीकृष्णास आम्ही भारतीय आर्य परमेश्वराचा पूर्ण अवतार मानतों, याचें इंगित हेंच आहे. श्रीरामचंद्र पराक्रम व नीति यांच्या उत्कर्षानें नरशिरोमणि होते, यांत संशय नाहीं. पण त्या अवतारांत ज्ञानाचा उपदेश भगवंतांनीं स्वमुखानें केला नाहीं. श्रीकृष्णानें आपल्या उपदेशामृतानें भारतवर्षाच्या हृत्पटलावर असा कायमचा ठसा उमठविला आहे कीं, तो पुसून टाकणें शक्य नाहीं. श्रीकृष्णाच्या चरित्रानें व उपदेशानें भारतीय इतिहासास जें वळण लागलें आहे, तें बदलणें संभवनीय नाहीं. ज्यांच्या कानांत भगवद्गीतेच्या वेणूचा ज्ञानरव पडला आहे, त्यांस अन्य मताचा ध्वनि मधुर लागणें शक्य नाहीं. आर्यांच्या वेदान्तज्ञानरूपी दुर्गाची भगवद्गीता ही शतघ्नी आहे. हिच्या माऱ्यापुढें या किल्ल्यावर इतर तत्त्वज्ञानांचा हल्ला चालत नाहीं; इतकेंच नव्हे, तर या दिव्यास्त्राच्या साहाय्यानें भारतीय आर्यांचें तत्त्वज्ञान सर्व जगास जिंकूं पाहात आहे. असो. याप्रमाणें श्रीकृष्णाविषयीं आम्हां भारतीय आर्यांस जो परमावधीचा आदर वाटतो, तो सकारण व योग्य आहे. आणि आश्चर्य हें कीं, आपल्या या आर्यभूमींत सर्व प्रकारच्या लोकांस श्रीकृष्ण सारखाच प्रिय व पूज्य आहे. वैदिक लोक, **'हरिः ओम्'** म्हणून वेदांचें पठण करितात. कर्मठ लोक कर्माच्या आरंभीं जीं परमेश्वराचीं चोवीस नांवें घेतात, त्यांत श्रीकृष्ण हेंच शेवटचें नांव आहे. योगी लोक श्रीकृष्णासच योगेश्वर मानतात. भक्तिमार्गी लोक श्रीकृष्णाचेंच भजन करून भगवच्चरणीं लीन होतात. मथुरावृंदावनांत तर

कृष्णनामाचा ध्वनि घरदार, मंदिर—घाट, पृथ्वी-आकाश भरून राहिला आहे. महाराष्ट्रांतही पंढरपुर येथें 'विठ्ठल, विठ्ठल' हाच गजर सतत ऐकूं येतो. श्रीकृष्णाचें गुणवर्णन करून महाराष्ट्र काय, बंगाल काय, मद्रास काय, आणि गुजराथ काय, सर्व ठिकाणचे भाविक लोक गातात, नाचतात, ध्यानस्थ होतात. सर्व हिंदुस्थानभर आर्य-स्त्रियांच्या मुखांतून श्रीकृष्णाच्याच बाललीलांचीं गाणीं सदोदित ऐकूं येतात. पहाटेस उठून त्याचेच गुणानुवाद त्या गातात, दळणें दळतात व मुलांना जागी करतात. फार काय वर्णन करावें ? भरत-खंडांतील आर्यधर्मी स्त्री पुरुष, बालवृद्ध, गरीब-श्रीमंत, नागर ग्राम्य, पंडित-मूर्ख, संस्कृत-असंस्कृत, संसारी-परमार्थी, सर्वांच्या विचारांत व उच्चारांत श्रीकृष्णाचें नांव व चरित्र भरून गेलें आहे. अशा या सर्ववंद्य विभूतीच्या चरित्राची साद्यंत माहिती प्रत्येक आर्याभिमानी मनुष्यास, विशेषत: हिंदु विद्यार्थ्यांस असावी, हें अधिक शब्दांनीं सांगितलें पाहिजे काय ?

---

## पाठ ४० वा.



## श्रीकृष्णाची थोरवी.

### भाग २ रा.

ज्याप्रमाणें हाराच्या सर्व मण्यांत एक दोरा ओंवलेला असतो, त्या-प्रमाणें श्रीकृष्णाच्या उदात्त चरित्रांत एकच हेतु ओतप्रोत भरलेला आहे. हरिवंशांत म्हटल्याप्रमाणें, " असुरांचें उन्मूलन करून प्रजा-जनांस वर्तनाची मर्यादा लावून देणें," हाच श्रीकृष्णचरित्राचा उच्च हेतु दिसतो. अवतारी पुरुषाचें चरित्र मननीय व वाचनीय याच कारणानें असतें. जगद्वंद्य विभूतींचीं चरित्रें आपल्यास पूज्य

व श्रवणीय असतात, याचें कारण हेंच होय. उदात्त नीतिमत्ता व अद्भुत पराक्रम, हेंच अवतारी पुरुषांचें लक्षण आहे. श्रीरामचंद्रापासून तों शिवाजीमहाराजांपर्यंत अवतारी मानलेल्या सर्व पुरुषांच्या चरित्रांत हाच विशेष दृष्टीस पडतो. श्रीकृष्णाचें उदार चरित्र, अद्भुत पराक्रम व लोकोत्तर नीतिमत्ता यांनींच मनोहर व स्मरणीय झालें आहे. मर्मज्ञ व्यास महर्षींनीं दर्शविल्याप्रमाणें इज्या, अध्ययन, दान व तप हीं धर्माचीं अंगें 'दंभार्थही' मनुष्याच्या ठिकाणीं असूं शकतील; पण सत्य, क्षांति, इंद्रियदमन व विशेषतः निर्लोभता हे बाकीचे चार गुण दंभानें येऊं शकत नाहींत. ते महात्म्यांच्याच अंगीं वसतात. अशा गुणांनीं श्रीकृष्णाचें चरित्र मंडित आहे व म्हणूनच तें रमणीय व उदाहरणीय झालें आहे.

श्रीकृष्णाचें चरित्र आणखी एका कारणानें विशेष रमणीय व प्रिय झालें आहे. श्रीकृष्णाचें चरित्र मानवी कक्षेंतील असून प्रत्येक मनुष्यास या संसारांत त्याचें उदाहरण घेण्यासारखी उपयुक्तता त्यात दिसून येते श्रीकृष्णाचे शत्रु प्रत्यक्ष असुर नसून नेहमीं संसारांत दिसणारीं आसुरी स्वभावाचीं माणसें हींच त्याच्या शत्रुस्थानीं होतीं. श्रीरामचंद्राप्रमाणें त्यास प्रत्यक्ष राक्षसांशीं लढावयाचें नव्हतें. किंवा त्याचे साहाय्यकर्ते वानर नव्हते. प्रत्येक समाजांत, प्रत्येक देशांत, प्रत्येक काळांत दुष्ट व दुराचारी मनुष्यें निसर्गनियमानें उत्पन्न होतात. अशा मनुष्यांस बुद्धि व पराक्रम यांचें जेव्हां पाठबळ मिळतें, तेव्हां त्यांचीं कारस्थानें कंस, जरासंध, दुर्योधन यांच्या कारस्थानांप्रमाणें अत्यंत कुटिल व भयंकर होतात. अशा बुद्धिमान् व पराक्रमी पण पापी व लुब्ध मनुष्यांचीं कारस्थानें नीतिमंतानीं कशीं उलथून पाडावीं, हा एक व्यवहारांतील अत्यंत बिकट प्रश्न आहे. अशाच प्रकारचे अन्य कठिण प्रश्न प्रत्येक समाजांत उपस्थित होतात; त्या वेळेस नीतिमान्

मनुष्यानें काय करावें, हें त्यास समजत नाहीं. हाच प्रकार तत्त्वज्ञानाचाही आहे. मनुष्याच्या बुद्धीस मोह पाडणारीं पुष्कळ पाखंडें जगतांत आजवर उत्पन्न झालीं आहेत, हल्लीं उत्पन्न होत आहेत व पुढेंही होतील. अशा मोहक पण असत् मतांपासून सन्मार्ग कसा ओळखावा, हें ठरविणें बुद्धिमंतासही कठिण पडतें. अशा प्रकारच्या व्यवहारांतील व परमार्थांतील कठिण प्रश्नांचा उलगडा श्रीकृष्णाच्या चरित्रापासून व उपदेशापासून होतो. या कारणानें श्रीकृष्णाचें चरित्र विशेष मनोवेधक व मननीय आहे. आणि ध्यानांत धरण्यासारखी गोष्ट ही कीं, असा उलगडा करितांना श्रीकृष्णानें मानवी उपायांचीच बहुधा योजना केलेली आहे. कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं समर्था अशी ईशशक्ति जर अवतारी पुरुष उपयोगांत आणतील, तर त्यांच्या चरित्रांपासून आपल्यास तादृश फायदा होणार नाहीं, हें उघड आहे. केवळ इच्छेनेंच रामचंद्रांनीं किंवा सीतेनें रावणाचा निःपात केला असता, तर त्यांचें चरित्र संसारी लोकांस कधींही उपयुक्त झालें नसतें. सारांश, अवतारी पुरुषांचीं मानवी कृत्येंच मनोहर व मननीय असतात. अशा दृष्टीनें श्रीकृष्णाचें चरित्र विशेष मानवी कोटींतलें आहे. श्रीकृष्णानें सर्व प्रकारें लहानपण पत्करिलें होतें. त्याचा जन्म श्रीरामाप्रमाणें राजाच्या पोटीं झाला नव्हता; इतकेंच नव्हे, तर राजवंशांतही झाला नव्हता. श्रीकृष्ण राजा नव्हता, राजपुत्र नव्हता, राजवंशीय नव्हता, ज्येष्ठपुत्रही नव्हता. किंबहुना, त्याचें बालपण ऐश्वर्यांत गेलें नाहीं; तर अगदीं सामान्य प्रतीच्या लोकांत गेलें. यामुळें श्रीकृष्णाच्या चरित्रास मानवीपणा अधिकच आला आहे. सारांश, श्रीकृष्णाचें चरित्र अनेक दृष्टींनीं अत्यंत मनोहर व उपयुक्त आहे. तें व्यवहाऱ्यास शहाणपण शिकविणारें, मुमुक्षूस मोक्ष देणारें, विपन्नास धैर्य देणारें, निरुत्साह्यास उत्साह उत्पन्न

करणारें, संशयितास निश्चयाच्या पायरीवर नेऊन पोंचविणारें, सामान्य जनांस प्रेम उत्पन्न करणारें, गरिबास आधार देणारें, दुष्टास भय उत्पन्न करणारें व सुष्टास नीतिपथ दाखविणारें आहे.

चिंतामण विनायक वैद्य. श्रीकृष्णचरित्र.

[ पुस्तक पहिलें समाप्त. ]

# वाचनपाठमाला.

## भाग १ ला.

## पुस्तक २ रें.

## पाठ १ ला.



### मानसिकरोगनिवारण.

ह्या जगांतील जीवयात्रा सुखकर व्हावी आणि परलोकाची प्राप्ति सुलभ व्हावी, यासाठीं धर्माचें अस्तित्व होय. परमेश्वरानें मनुष्याला कांहीं विशेष देणग्या दिल्या आहेत; म्हणून त्यांच्या नियमनासाठीं मनुष्यांमध्यें कांहीं विशेष प्रकारचे कायदे असणें आवश्यक आहे. पशु, पक्षी इत्यादि तिर्यग्योनींमध्यें, आपण ज्याला धर्म म्हणून समजतों, तसला कांहीं पदार्थ आहे किंवा नाहीं, याच्याबद्दल कोणाला जरी शंका असली, तरी आजकालच्या सामान्य समजुतीप्रमाणें त्यांना धर्म नाहीं, असेंच दिसतें. परंतु मनुष्यास परमेश्वरानें मन, बुद्धि, अहंकार, संकल्प, विकल्प, वासना, इत्यादि पुष्कळ अनन्यसामान्य गोष्टी दिलेल्या आहेत. त्यांच्या नियमनाला धर्माची फार आवश्यकता आहे. ज्या देशांत आगगाड्या नाहींत, त्या देशांत आगगाडीसंबंधाचे कायदे नसणें हें साहजिकच आहे; त्याचप्रमाणें आत्मा, मन, बुद्धि, इत्यादि आगगाडीपेक्षांही जलद धावणारे वेग, तिर्यग्योनींतील प्राण्यांचे अंगांत

दिसून येत नाहींत, तर त्यांच्यामध्यें त्या वेगांचें आकलन करण्याचें बलाढ्य साधन जें धर्म, तेंही नाहीं, असेंच म्हणणें ओघाला येतें. परंतु मनुष्याची स्थिति तशी नाहीं. मनुष्याला परमेश्वरानें नुसता जड देहच दिलेला नाहीं. देहरूपी मातीच्या गोळ्यांत चैतन्याचे निरनिराळे विकार घालून परमेश्वरानें मनुष्य हा प्राणी निर्माण केलेला आहे. मनुष्याच्या अंगामध्यें चैतन्याचे अनेक वेग चारी दिशांनीं उचंबळत आहेत. त्यांचें संयमन मनुष्याच्या ऐहिक योगक्षेमासाठीं आणि पारलौकिक निःश्रेयसासाठीं होणें अत्यंत जरूर आहे; आणि तें नियमन धर्माच्या द्वारानें होत असतें. आपले पाय फार चपळ आहेत आणि ते पाहिजे तिकडे धावतील, असें आपल्याला वाटतें; परंतु ते पाय आपल्या वासनांच्या पुढें किती धावणार ? आणि पाय फारच धावूं लागले, तर एक लहानशी दोरी त्यांच्या गतीचा प्रतिबंध करूं शकेल. पण आपल्या वासनांना कोण बांधूं शकणार आहे ? एका धर्माच्या दोरीशिवाय दुसऱ्या कोणामध्येंही त्याचें नियंत्रण करण्याचें सामर्थ्य नाहीं. आयुर्वेदामध्यें ज्याप्रमाणें शरीरगत रोगांवर औषधें आहेत, त्याप्रमाणें मानसिक रोगांवर औषधें देऊन ते बरे करण्याचें सामर्थ्य धर्मामध्यें आहे. शरिराचे भाग जड असतात, त्याप्रमाणें त्यांच्यावर झाडपाल्यांचीं किंवा मात्रादिकांचीं जड-स्वरूपाचीं औषधें उपयोगीं पडतात. परंतु ज्यांच्यावर औषध घ्यावयाचें त्याचें स्वरूप जसजसें सूक्ष्म असेल, तसतसें त्या औषधाचें स्वरूपही सूक्ष्मच असलें पाहिजे. जीवात्मा, मन, बुद्धि, अहंकार, वासना, हीं किती सूक्ष्म आहेत, हें अंतर्मुखदृष्टीनें विचार करणाऱ्या कोणाही मनुष्याला सांगावयाला पाहिजे, असें नाहीं. यांच्यावर जे उपाय योजावयाचे तेही यांच्याच इतके

सूक्ष्म पाहिजेत; किंबहुना यांच्यापेक्षांही जास्त सूक्ष्म आणि जास्त सामर्थ्यवान् पाहिजेत; व हेच उपाय धर्मामध्यें सांगितलेले असतात. आत्मा, बुद्धि, मन, यांची गति मानवी ज्ञानाला अगम्य असते. तेव्हां यांच्यावरही नियंत्रण चालविणारें जें धर्माचें सामर्थ्य, तें मानवी बुद्धीला किती अगम्य असेल, याची कल्पना करणें फारसें कठिण नाहीं. आणि यामुळेंच धर्म हा ईश्वरप्रणीत आहे, ही कल्पना साहजिक उत्पन्न झाली आहे. एखाद्या इसमाचा पाय जर तुटला, तर डॉक्टरला दुसरा लांकडाचा करून बसवितां येतो; परंतु एखाद्याच्या मनामध्यें इच्छा, द्वेष, राग, लोभ, हे जर नसले, तर ते लांकडाचे करून कोणालाही बसवितां येत नाहींत. कारण, त्या शरिरांतील चैतन्यमूलक ज्या गोष्टी आहेत, त्या केवळ परमेश्वराधीन आहेत, त्यांजवर आपली सत्ता चालत नाहीं, अशी मनुष्याची पूर्णपणें खात्री होऊन चुकली आहे. तेव्हां या शरीरांतर्गत चैतन्यविषयक गोष्टींवर नियामक सत्ता चालविणारें जें वरिष्ठ चैतन्य, ज्यालाच, 'धर्म' असें नांव देतां येतें, त्याचा परमेश्वराव्यतिरिक्त इतर कोणापासून उगम असल, असें मनुष्याच्या कल्पनेमध्यें येणें, ही गोष्ट सर्वथैव अशक्य आहे. परमेश्वर चिद्घन आहे; तो या सृष्टींतील सर्व चैतन्याचा मालक आहे. तेव्हां त्याच्यापासून धर्म उत्पन्न झाला, अशी कल्पना साहजिकपणें प्रचलित झाली. सृष्टीमध्यें पुष्कळ शास्त्रीय आणि लौकिक प्रयोगांवरून कधीं कधीं असें आढळून येतें कीं, कित्येक अत्यंत सूक्ष्म पदार्थ हे स्थूल पदार्थांपासून उत्पन्न होतात. लांकडांच्या घर्षणापासून अग्नि आणि प्रकाश, व रेशीम-आदिकरून वस्तूंपासून विद्युच्छक्ति हीं उत्पन्न होतात. मन हें अत्यंत सूक्ष्म, त्याच्यावरही जड अशा सात्त्विक अन्नाचे सात्त्विक परिणाम, आणि तामस अन्नाचे तामस परिणाम

झालेले स्पष्टपणें दृष्टीस पडतात. अशा उदाहरणांवरून स्थूलापासून सूक्ष्म उत्पन्न होत गेलेलें आहे, असें दिसतें; व त्यावरून चैतन्य म्हणजे जडापैकींच विशेष गुणयुक्त असा कांहीं अत्यंत सूक्ष्म भाग असावा असें वाटूं लागतें. परंतु अशी उपपत्ति बांधण्याला आणि जडाच्या शेवटच्या पायरीपासून चैतन्याच्या वरील पायरीपर्यंत जाण्याला, आपल्या ज्ञानापाशीं इतकी थोडी सामुग्री आहे कीं, तीवरून एखाद्या अज्ञात गोष्टीविषयीं एखादा तर्क करणें, कधींही श्रेयस्कर होणार नाहीं. अशा रीतीनें प्रत्यक्ष आणि अनुमान यांची गति कुंठित झाल्याकारणानें मनुष्य शेवटीं शाब्दप्रमाणावरच भार ठेवून स्तब्ध बसतो; धर्म हा ईश्वरप्रणीत आहे, असें तो मानतो; आणि त्या धर्मांत जे आचारविचार सांगितलेले असतील, त्यांप्रमाणें वागूं लागतो.

शि० म० परांजपे. का. नि.' निबंध.

---

## पाठ २ रा.



### जुने व नवे पंडित.

#### भाग १ ला.

निवळ एकांगी शिक्षणापेक्षां अनेकांगी शिक्षण अधिक चांगलें, हें कोणीही कबूल करील. पण एकांगी शिक्षणाचेही कांहीं फायदे असतात; व गेल्या शतकांतील शिक्षणपद्धतींच्या तुलनेनें त्यांतील कांहीं फायदे पाश्चात्त्यांच्या नजरेस आले आहेत. एकाग्रता ही शरसंधानाप्रमाणें विद्याभ्यासासही उपयोगी आहे. द्रोणाचार्य हे बालकौरव-वीरांस धनुर्विद्या शिकवीत असतां, त्यांनीं प्रत्येक विद्या-

ध्यर्याला 'तुला काय दिसतें तें सांग', म्हणून विचारलें; व 'मला बाणाचें टोंक व वेध करण्याची वस्तु यांशिवाय दुसरेंतिसरें कांहीं दिसत नाहीं', असें एकट्या अर्जुनाकडून उत्तर आल्यावर 'हाच खरा धनुर्धर होईल', असें त्यांनीं मनाशीं ठरविलें. या गोष्टीचें तात्पर्य उघडच आहे. मानवी मनाच्या समीकरणांत एका गोष्टीला जें लक्ष दिलें, तें दुसऱ्या गोष्टीवरून कमी झालें, हें व्हावयाचेंच. मानवी शक्तीस मर्यादा आहे; व 'पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते' असला अमर्याद वस्तूंचा गणितशास्त्रांतील सिद्धान्त त्याला लागू पडत नाहीं. जुन्या पद्धतीच्या शिक्षणांत ही एकाग्रता असे, आणि यामुळें त्या पद्धतीनें शिकणारा विद्यार्थी आपल्या विषयांत खरा निष्णात होत असे. जुन्या काळचा उत्तम वैय्याकरण किंवा नैयायिक घेतला, तर व्याकरण किंवा न्याय या विषयांत त्याला अगोचर असा कोणताही ग्रंथ-उपग्रंथ किंवा वादाचा मुद्दा सहसा राहात नसे. आतां या एकांगी अध्ययनामुळें त्या विषयाबाहेरचा कांहीं मुद्दा निघाल्यास, जुन्या पंडितास पाण्यांतून बाहेर काढलेल्या माशाप्रमाणें चुकल्या-चुकल्यासारखें होणें स्वाभाविक असे. पण जोंपर्यंत तो पाण्यांत राही, तोंपर्यंत त्याची शक्ति इतकी अचाट असे कीं, त्याला विद्यासमुद्राच्या थेट तळापर्यंत बुडी मारून तेथील गूढ मुक्ताफळें वर आणतां येत असत. जुन्या पद्धतीचा दुसरा एक विशेष गुण म्हटला, म्हणजे स्मृतिसामर्थ्य हातांत पुस्तक धरून अध्यापन करणें हा पूर्वीं एक प्रकारें कमीपणा मानला जाई; व अध्ययन करण्याच्या वेळीं विद्यार्थ्यांस जरी ग्रंथांचा आश्रय करावा लागे, तरी अध्ययन संपून तो स्वतः अध्यापकाच्या पदवीस येण्याच्या सुमारास त्याचे सर्व अध्ययन-ग्रंथ प्रायः तोंडपाठ होऊन जात. आणि केवळ या अर्थानेंच पण तो पुस्तकांस सोडचिठ्ठी देत असे.

शिष्यांकडून अध्ययन करवितांना गुरुजींच्या हातांस चाळा हवाच असला, तर तो ग्रंथाचीं पानें चाळण्याचा नसे; तर पत्रावळी लावणें, तपकीर ओढणें, सुपारी कातरणें, असला. डेक्कन कॉलेजांतील जुने प्रसिद्ध पंडित अनंतशास्त्री पेंढारकर याना, विद्यार्थ्यांस पाठ सांगतांना लहान मुलांच्या हातीं खेळण्याकरितां देण्याच्या चाबकाच्या दोऱ्या वळीत बसण्याचा चाळा असे, असें सांगतात. असो. अशा रीतीनें जुने पंडित हे खरोखरच चालतेबोलते ग्रंथ असत. त्यांचें विषय-निष्णातत्व व पाठांतर हीं पाहून अलीकडच्या काळांतील मनुष्य थक्कच होऊन जावयाचा! पण एकांगी शिक्षणामुळें जुन्या पंडितांच्या बुद्धीस एककलीपणा येत असे. व्यवहार-चातुर्य अंगीं नसल्यामुळें त्यांची क्वचित् थट्टाही होई. समाजांतील अष्टपैलू—व्यवहारांत शहाणपणाच्या चलनी नाण्याची मोड पुष्कळशी लागते; तेथें चवल्या-पावल्याच काय, पण पैसे, पया व कवड्याही लागावयाच्या. जसा पदार्थ भेटेल, तशा योग्यतेचें नाणें दुकानदाराच्या अंगावर टाकावयाला लागतें. जुन्या एकदेशीय पंडितांच्या पदरीं शहाणपण पुष्कळ असे खरें, पण तें सगळें मोहोरा, पुतळ्या किंवा बंदे रुपये यांच्या रूपानें; त्यांच्याजवळ परचुरण नाहीं; आणि दुकानदारास तर त्यांची मोहोर घेऊन खपावयाची नाहीं व पचायची नाहीं. यामुळें पदरीं द्रव्य व व्यवहाराच्या बाजारांत पदार्थ मांडलेले असतां भाजीही घेतल्याशिवाय त्यांना हात हालवीत परत यावें लागणार! बरें, भाजी मिळालीच, तर अंगापासून केव्हांही दूर न होणाऱ्या जरीकांठी शालजोडीच्या पदरांत बांधून शास्त्रीबुवा ती घरीं आणणार!

अनेकांगी अशी जी आधुनिक शिक्षणपद्धति तिचेही नफेतोटे असेच आहेत. नव्या युगांत ग्रंथसंग्रह विपुल. कोणताही विषय

घेतला, तरी त्याच्यावर प्रत्यंतराच्या तोफखान्याचा सडकून मारा करितां येईल, इतकी चोहोंकडे ऐसपैस मोकळी जागा, व उंच-वटच्यांचीं ठिकाणें. तसेंच, त्या त्या विषयाच्या अभिमान्यांनीं वेशीचीं कवाडें लावून घेतलीं, तरी आंत प्रवेश करण्यास शेंकडों गुप्त मार्ग. यामुळें हल्लींच्या काळांत कोणताही विषय कोणालाही सुलभ. गुरु-मुखाच्या गंगोत्रीचा प्रवास जुन्या काळाइतका हल्ली दुःखद नाहीं. किंबहुना कोणालाही स्वावलंबनानें व गुरुमुखाशिवाय एखादी विद्या सांगोपांग शिकणें कठिण नाहीं. उद्योगमात्र हवा; साधनांची कमतरता नसते. पूर्वकाळीं नैयायिक, वैय्याकरण, मीमांसक, अथवा द्वैत-वादी, अद्वैत-वादी, अशीं विशेष गुणदर्शक--पण त्याच कारणा-मुळें अल्पमर्यादासूचक--विशेषणें पंडितांस लागत. पण हल्लीं अशा विशेषणांचें कारण उरलें नाहीं. कां कीं, साधारणतः उद्योगशील असा विद्यार्थी घेतला, तर त्याला अमुक एक विषयांतलें थोडेंबहुत तरी माहीत नाहीं, असें सहसा व्हावयाचें नाहीं. गुलाबदाणीच्या कारंज्यांतून निघाल्याप्रमाणें, आधुनिक विद्वानांच्या मुखांतून प्रसंगो-पात विद्येच्या सहस्र-धारा एकाच वेळेस स्रवत असून शिवाय प्रत्येक धारेस निरनिराळ्या शास्त्रांचा निरनिराळा सुगंध येत आहे, हा अजब चमत्कार पाहून, जुन्या काळचा पंडित आज आश्चर्यानें थक्कच होऊन जावयाचा ! आणि विद्येचें असलें हें सुवर्ण-युग अव-तरलें असतांही जुन्या विद्या-पीठांचें काम अजून चालू आहे, व आणखी नवीं विद्या-पीठें काढण्याचा हव्यास सुरूच आहे, याचें त्यास गूढ वाटेल. दुष्यंत राजा मारीच ऋषींच्या आश्रमांत आला, तेव्हां चहूंकडे कल्पतरुच कल्पतरु उगवलेले असतांही हे ऋषि अजून तपश्चर्या कां करीत बसले आहेत, याचें त्याला क्षणभर आश्चर्य वाटलें ! " यत्कांक्षन्ति तपोभिरन्यमुनयः तस्मिंस्तपस्यंत्यमी." त्याच-

प्रमाणें सर्व विद्या सकृद्दर्शनीं हातीं आल्या असतांही आधुनिक विद्वान् लोक शिक्षण-पद्धति सदोषच आहे, म्हणून दुःखी-कष्टी होत आहेत, याचें जुन्या विद्वानांस कोडेंच पडेल. पण या अनेकांगी शिक्षणाचा मोहकपणा कांहीं अंशीं केवळ दिखाऊ आहे, हें त्या बिचाऱ्यांस काय माहीत ! आधुनिक विद्वानांच्या ज्ञानाची लांबी-रुंदी फार विस्तृत; पण त्याची खोली फार थोडी असते. वादाचा विषय बदलला असतां जुन्या पंडितांप्रमाणें त्याला पाण्याबाहेर काढून टाकलेल्या मत्स्यासारखें चुकल्या-चुकल्यासारखें होऊन तो तडफडणार नाहीं; कारण तो जलचर व स्थलचर म्हणजे उभय—चर आहे खरा,—बकाप्रमाणें तो जमीन असेल तेथपर्यंत चालेल व पाणी भेटतांच पोहूं लागेल—पण त्याची गति खोल पाण्यांतमात्र होणार नाहीं. यामुळें विद्यासमुद्राच्या तळाशीं बुडी मारून मोत्यें वर आणणें, हें त्याला दुष्कर होय. फार तर त्यानें सरस्वती-देवीच्या क्रीडा-सरोवरांतील कमळांबरोबर उथळ पाण्यांत खेळावें. कोणताही विषय तळहातावरील आंवळ्याप्रमाणें त्याला चोहोंकडून दिसेल; पण आंवळ्याच्या पोटांतल्या बीची कल्पनामात्र त्याला होणार नाहीं.

---

## पाठ ३ रा.



## जुने व नवे पंडित.

### भाग २ रा.

नव्या शिक्षणपद्धतींत पाठांतरास महत्त्व नसतें. यामुळें विद्यार्थ्यांची स्मरणशक्ति कमकुवत राहते. डोक्यांत ज्ञान असतांही, डोळ्यांपुढें पुस्तक असेल, तेव्हांच त्याची जीभ किंवा हात चालावयाचा. जुन्या पंडितांच्या स्मरणशक्तीचा ‘अक्षय भाता’ नेहमीं

भरलेला असे; यामुळें झोंपेंतून जागें केलें, तरी तो वादास सिद्ध व्हावयाचा. नव्या पंडिताचा भाता वरचे वर दुसऱ्यानें भरून द्यावा लागतो. पुस्तकें हातीं येतपर्यंत त्याला धर्मयुद्धाच्या नियमांचा आश्रय करून मुदत मागून घ्यावी लागते. व सुदैवानें आधुनिक काळचे वाद लेखनद्वारा होत असल्यामुळें ती मुदत त्यास मिळतेही ! जुन्या काळच्या युद्धाप्रमाणेंच जुन्या काळचे वाद म्हणजे प्रतिपक्ष्याची गांठ समक्ष पडून तरवारीनें युद्ध व्हावयाचें. तरवार फिरविण्यास लागेल इतकाच स्थलावकाश, व तरवार उगारून मारण्यास लागेल इतकाच कालावकाश. जुन्या सभेंतील वाद तोंडानें व्हावयाचा; तेथें ग्रंथ उघडून दाखविण्याची व पहाण्याची अपेक्षा नसे. प्रतिपक्ष्यास व न्यायाधिशांस प्रायः ग्रंथ पाठच असावयाचे. कोट्या व प्रतिकोट्या उत्तरें व प्रत्युत्तरें सर्व जिभेवर असावयाचीं; व केवळ बुद्धीच्या तरळपणावर व तत्परतेवर विजय मिळावयाचा. प्रतिपक्षी—क्षणभर कां होईना—निरुत्तर झाला, म्हणजे वाद जिंकला गेला, असें ठरे. शंकराचार्य व मंडनमिश्र यांचा वाद चाळीस दिवस चालला होता; पण वादाचा निकाल लागला तो मंडनमिश्राचे गळ्यांतील पुष्पहार कोमेजल्यावरून सिद्ध झाला ! जुन्या पंडित लोकांच्या वादाची गोष्टही एकंदरीनें अशीच होती. एखाद्या कोटीवर त्याचा निर्णय अवलंबून असावयाचा; व निरुत्तर केलेल्या किंवा गोंधळलेल्या प्रतिपक्ष्याच्या म्लान झालेल्या मुख-श्रीवरून तो सिद्ध व्हावयाचा ! आधुनिक विद्वानांच्या वादाची गोष्ट बरीच निराळी आहे. ज्या प्रतिपक्ष्यांनीं एकमेकांचीं तोंडें कधींही पाहिलीं नाहींत, अशांचे वाद निरनिराळ्या खंडांतूनही चालू असतात. यास्तव क्षणभर निरुत्तर झाल्यामुळें मुखश्री म्लान होऊन फड जिंकला अगर हरला जाण्याचा संभव नाहीं. वादांतील युक्तिवाद व फारच तर कांहीं अंशीं भाषेची ओजस्विता

यांवरूनच जग निकाल लावतें. आधुनिक वादांना कालाचाही निर्बंध नसतो. एका देशांत पूर्वपक्षकार व दुसऱ्या देशांत सिद्धान्ती हें जसें चालतें, तसेंच यंदांच्या पावसाळ्यांत पूर्वपक्ष होऊन भिजत पडलेल्या वादास पुढल्या वर्षींच्या उन्हाळ्यांतही पालवी फुटण्यास हरकत नाहीं ! वादाचीं साधनेंही तशींच निराळीं. आधुनिक युद्धाच्या सरंजामाप्रमाणें आधुनिक वादाचा सरंजामही निराळा. आधुनिक पंडितांना मोठमोठ्या ग्रंथ-संग्रहालयाच्या पहाडी 'बातेऱ्या' बांधतां येतात; व त्यांच्या साहाय्यानें त्यांचा मारा चालावयाचा. शत्रुपक्षाच्या किल्ल्यांतील मर्में सांगण्यास सूचिपत्र-रूपी गुप्त हेर शेंकडों तयार असतातच ! प्रमाणांतररूपी स्नेही, सल्लागार व योद्धे यांची कुमक दोन्ही पक्षांस मुबलक व अखेर जय व्हावयाचा तो शक्याशक्यतेच्या सूक्ष्म विचारावर अवलंबून असल्यामुळें, कालांतरानें विवक्षित मतांची परंपरा जेव्हां सरोस चालू होईल, तेव्हांच वादाचा अखेर निर्णय झाल्याची खबर यावयाची. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, जुन्या व नव्या पंडितांचें उद्दिष्ट, साधनें व परिस्थिति हीं बहुतेक वेगवेगळीं आहेत. जुन्या पंडितांच्या शिक्षणाचें एकांगीत्व व नव्या पंडितांच्या शिक्षणाचें अनेकांगीत्व हीं सर्वस्वीं त्यांच्या निरनिराळ्या परिस्थितींचेच परिणाम होत.

वर दिलेलें वर्णन हें एकांगी व अनेकांगी शिक्षणांच्या अतिरेकांचेंच वर्णन अर्थात् होय. कारण जुन्या काळींही एकांगी शिक्षणाचाच प्रकार मुख्यत्वेंकरून असतां अनेकांगी शिक्षण मिळविलेले पंडित मुळींच नसत असेंमात्र नाहीं. बुद्धिमान् पुरुषाला कोणत्याच काळांत अध्ययनाचे विषय मुद्दाम मर्यादित करून घेण्याचें कारण असत नाहीं. बेकनसंबंधानें त्याचे अभिमानी असें म्हणतात कीं, 'तत्का-लीन ज्ञान-विज्ञानाचे सर्व विषयरूपी प्रांत त्यानें खालसा करून

आपल्या मनाच्या राज्यास जोडले होते'. आपल्या इकडेही अध्ययनाचा कोणताही विषय म्हणून न सोडणाऱ्या अनेकांगी पंडितांचीं उदाहरणें नाहींत असें नाहीं. सायणाचार्य, माधवाचार्य, क्षेमेंद्र, वगैरे पंडितांचीं उदाहरणें असल्या प्रकारचीं होत. तसेंच, जे जे प्रसिद्ध टीका-ग्रंथकार म्हणून होऊन गेले, त्यांच्या टीकांकडे पाहिलें, तर प्राय: असें दिसून येतें की, जेथें जेथें म्हणून दुसऱ्या शास्त्राचा मुद्दा आला, तेथें तेथें त्यांनीं त्या त्या शास्त्रांत निष्णात असणाऱ्या पंडितांप्रमाणें विवेचन केलेलें आहे. म्हणजे एकांगी शिक्षणाच्या कालांतही अनेकांगी शिक्षणाची किंमत लोकांस कळत नव्हती, असें नाहीं. याच्याच उलट हल्लींची स्थिति आहे. कारण हल्लीं अनेकांगी शिक्षण हा नियम, व एकांगी शिक्षण हा अपवाद होऊन बसला आहे, व यामुळें अनेकांगी शिक्षणापासून होणारे तोटे—म्हणजे विशेषत: ज्ञानाचा उथळपणा—नजरेस आल्यामुळें एकांगी शिक्षण हवें, असें लोकांस वाटूं लागलें आहे.

न. चिं. केळकर. केळकरकृत लेखसंग्रह.

---

## पाठ ४ था.



### पाव आण्याची चूक.

**ब्रह्मज्ञान नव्हे लेंकुराच्या गोष्टी ।**
**तेथें व्हावा पोटीं अनुताप ॥**

—तुकाराम.

एकनाथ जसा इतर गुणांनीं मंडित होता, त्याप्रमाणेंच तो व्यवहारचतुर असून लेखणीचा बळकट असे. राज्यधुरेचीं मोठमोठीं कामें जनार्दनपंतांनी एकनाथावर सोंपवावीं व तीं या कुशल पुरुषानें

निर्दोष शेवटास न्यावीं. कोणत्या प्रसंगीं कसें वागावें, हें तो पूर्णपणें जाणत असून मनुष्यमात्राच्या अंतरंगाची त्यास चांगली पारख असे. सारांश, जनार्दनपंतांसारख्या दरबारी व साधुश्रेष्ठ अशा पुरुषाच्या साहचर्यानें एकनाथ इतका अष्टपैलू बनून गेला होता कीं, ज्या ज्या हुन्नरांत त्याची योजना करावी, त्या त्या हुन्नरांत त्यानें बहाद्दरीच मिळवावी.

जनार्दनपंतांनीं दप्तरांत हिशेब राखण्याचें जबाबदारीचें काम एकनाथावर सोंपविलें होतें. एकनाथ हा बांका कारकून असून त्याचें अक्षर दिव्य असे. एके दिवशीं सायंकाळीं यजमानांनीं कारकुनास सांगितलें कीं, 'उदईक दप्तराची तपासणी व्हावयाची आहे, तेव्हां हिशेब तयार करून ठेवावा'. कारकुनांनीं 'फार उत्तम आहे' म्हणून सांगितलें.

नंतर नित्यनेमाप्रमाणें पादचूरणादि गुरुसेवा झाल्यावर रात्रीं अकरा वाजण्याच्या सुमारास, हिशेब तयार करण्यास एकनाथानें आरंभ केला. नाथाचें लिहिणें चोख असल्याकारणानें भानगड मुदलींच नव्हती. सुमारें अर्ध घटकेच्या आंत सर्व हिशेब तयार झाला; परंतु जमेचा व खर्चाचा मेळ बसण्यास पाव आण्याचें अंतर पडूं लागलें. म्हणून सर्व हिशेब तो पुनः पाहूं लागला. परंतु पाव आण्याची चूक सांपडेना. पुनः तेरीज, पुनः बेरीज, पुनः ताळेबंद, याप्रमाणें बहुत वेळ करून पाहिलें. तथापि कोणत्या ठिकाणीं बेरीज चुकते, हें कळेना.

इतक्यांत जनार्दनपंत अकस्मात् जागृत होऊन पाहतात, तों एकनाथाच्या खोलींत दिवा असून कांही ध्वनि ऐकूं येत आहे.

मग नाथाच्या खोलीजवळ जाऊन अवलोकन करतात, तों खोलीचें दार उघडें असून आंत एकनाथ रुमालांचे मोठे मोठे ढीग

सोडून बसला आहे ! मध्यरात्र उलटून तीन वाजण्याचा सुमार झालेला आहे ! चोहोंकडे शांतता व सामसूम असून रात्रीचामात्र 'किर्र' ध्वनि ऐकूं येत आहे ! दिव्यांत पुनः पुनः तेलाचें भरण घालून एकनाथाचा बेरजेचा तडाका चालला आहे ! तहान लागून घशाला कोरड पडली आहे ! एकसारखें बसण्यानें पाठ ताटकळून नेत्र आरक्त झाले आहेत ! असा हा प्रकार पाहून जनार्दनपंतांस परम आश्चर्य वाटलें, व खोलींत जाऊन नाथाच्याजवळ ते उभे राहिले.

एकनाथ इतका तल्लीन होऊन गेला होता कीं, आपल्याजवळ गुरुमूर्ति उभी आहे, याचें त्यास मुदलींच भान नव्हतें. पैशाची चूक न सांपडल्यामुळें अत्यंत खिन्न व भयभीत होत्साता तो विचार करतो कीं, 'उद्ईक हिशेब मागितला असतां काय उत्तर द्यावें ? गुरुरायाची मजवर वक्रदृष्टि झाल्यास माझ्या कुदशेची परमावधि होणार नाहीं काय ? माझ्या अभ्युदयाचा समय सन्निध आला असून ह्या चुकीच्या रूपानें माझें दुर्दैव तर ओढवलें नाहीं ना ? कोटचवधि रुपयांची उलाढाल माझे हातून झालेली असून आजच एक पैशाची चूक माझ्या प्रामाणिकपणास व स्वामिसेवेस काळिमा लावणार काय ?' याप्रमाणें आपल्या मनांत विचार करतो आहे, भयानें अंगास कंप सुटला आहे, दुःखाश्रूंनीं डोळे भरून येऊन गळा दाटून आला आहे, व हातांनीं वह्यांचीं पानें वारंवार चाळीत आहे, इतक्यांत हस्तदोषानें विपरीत पडलेला आंकडा आढळून पाव आण्याची चूक सांपडली. चूक सांपडतांच आपण आज कृत-कृत्य आहोंत, असें वाटून आनंदभरांत एकनाथानें मोठ्या हर्षानें टाळ्या पिटल्या व तो मोठ्यानें गदगदां हासूं लागला.

जो एकनाथ हात जोडून निरंतर नम्रपणानें उभा असणार, तो आज इकडे तिकडे न पाहतां आनंदभरानें टाळ्या पिटतो, तेव्हां

त्यास इतका परमानंद होण्याचें कारण काय आहे, तें विचारावें, म्हणून जनार्दनपंत खालीं बसले व त्यास प्रश्न केला.

आपल्याजवळ गुरुश्रेष्ठ बसले आहेत, हें पाहून एकनाथ चपापला व संभ्रमानें उभा राहून विनयानें म्हणाला, "महाराज, आपल्या आज्ञेप्रमाणें हिशेब तयार करीत असतां एक पैशाची चूक सांपडेना. त्यामुळें चित्त उद्विग्न होऊन आपली अवकृपा झाली असतां माझी काय अवस्था होईल, ह्याविषयीं विचार करीत होतों; इतक्यांत पाव आण्याची चूक सांपडली; व तेणेंकरून पराकाष्ठेचा हर्ष वाटून मीं आनंदभरांत टाळ्या पिटल्या."

एकनाथाचें हें भाषण ऐकून जनार्दनपंतांना गहिंवर आला; एकनाथाचें आपणावरील अप्रतिम प्रेम, त्याचें शुद्ध व पवित्र आचरण, व उपदेश करण्याविषयीं त्यास दिलेलें अभिवचन, ह्यांचें स्मरण होऊन त्यांनीं त्याचा हात धरला व मोठ्या ममतेनें त्यास आपल्याजवळ बसविलें; आणि ते सद्गदित अंतःकरणानें म्हणाले:—

"हे शिष्यश्रेष्ठा, तुझ्या भक्तीच्या योगानें मी फार संतुष्ट झालों. तुला ब्रह्मोपदेश करण्याविषयीं दिलेलें वचन पुरें करण्यास प्रस्तुत प्रसंग फारच उत्तम आहे. यास्तव तुला सांगतों ती गोष्ट चित्त देऊन ऐक. एकनाथा, एक पैशाची चूक शोधून काढण्याकरितां तुझें चित्त जर इतकें एकाग्र होऊन गेलें होतें कीं, मी एक तासपर्यंत तुझेजवळ उभा असून तुला यत्किंचित्सुद्धां कळलें नाहीं, तर ही मायारूप जी मोठी चूक ती शोधून काढण्यास चित्ताची एकाग्रता धारण कर. या चुकीनें आम्ही ब्रह्मानंदास आंचवून क्षणिक व भासमान संसारसुखाचे ठिकाणीं आसक्त झालों. याच मायेच्या योगानें आम्ही नानाविध अलंकारांचे ठिकाणीं सुवर्ण ओळखीत नाहीं. याच महामायेच्या प्रभावानें चित्ताची निर्विषयता राखणें महत

कष्टसाध्य आहे. हे शिष्यवरा, स्वप्नावस्थेंत असतांना जशा आपल्या नानाविध मनोवृत्ति होतात, म्हणजे राजपद प्राप्त झालें असतां आपण गदगदां हंसतों, चोरी केली असतां राजदंड भोगून आक्रंदन करतों, परंतु जागृतावस्था प्राप्त झाल्याबरोबर राजपदाची व पाठीवर बसलेल्या फटक्यांची योग्यता सारखीच समजतों व स्वप्न मिथ्या मानतों, तद्वत् हें जें संसाररूप महास्वप्न त्यांतील सुखदुःखांची किंमतही सारखीच जाण. वस्त्राचे धागे पृथक् पृथक् केले असतां जशी 'धोतर' ही संज्ञा नष्ट होऊन कापूसमात्र राहतो; किंवा गोट, पाटल्या, आदिकरून सुवर्णाच्या आभरणांवर आघात केला, तर गोट, पाटल्या, या संज्ञांचा नायनाट होऊन केवळ सोनें दिसावयास लागतें, तद्वत् केवळ अज्ञानेंकरून भासणारें हें जें जगत् त्या ठिकाणीं अद्वैत पाहूं लागलें, म्हणजे ब्रह्माखेरीज दुसरा पदार्थ नाहीं, असें स्पष्ट दिसून येईल.

" परमार्थ साधण्याकरितां संसाराचा त्याग करण्याची किंवा अरण्यांत बसून पंचाग्निसाधनाप्रमाणें अघोर तप करण्याची आवश्यकता नाहीं. पूज्य व पवित्र मातापितरांस वियोगजन्य दुःख दिल्याशिवाय प्रपंचांत राहून निराधार कच्च्यां-बच्च्यांचें योग्य रीतीनें संरक्षण करूनही परमेश्वरप्राप्ति होते. आश्रमचतुष्टयापैकीं कोणत्या ही आश्रमांत जीवन्मुक्त होण्यास प्रतिबंध नाहीं. गृहस्थाश्रमाची थोरवी ही आहे कीं, त्यांत प्रपंच व परमार्थ हे दोन्ही साधिता येतात. कामक्रोधादि षड्रिपु जिंकण्याचे भयंकर प्रसंग जसे संसारांत येतात, तसे अरण्यांत येत नाहींत. याकरितां गृहस्थाश्रमांत शमदमादि देवता जर षड्रिपूंचा पाडाव करतील, तर ती गोष्ट विशेष अभिनंदनीय होय. यथाशक्ति आर्तांचें दुःखविमोचन, अज्ञजनांस सन्मार्ग-

दर्शन, यांतच खरा पुरुषार्थ आहे. 'परोपकारः पुण्याय', परोपकारासारखें पुण्य नाहीं. ह्याकरितां बा एकनाथा, एक तपपर्यंत ब्रह्मचर्यव्रत धारण करून आचरलेलें गुरुभक्तीचें तप आज समाप्त झालें. या तपाची सफलता जें दत्तदर्शन, तेंही तुला लवकरच घडेल. तुझ्या आचरणावरून तूं असाधारण पुरुष आहेस, यांत संदेह नाहीं. तुझ्या हातून पुढें महत्कार्य होणार, अशी तुझी वृत्ति साक्ष देत आहे. तर या पाव आण्याच्या चुकीची गोष्ट लक्षांत वागवून द्वैतभावाची घातुक चूक काढून टाक, म्हणजे तादात्म्य पावून ब्रह्मानंदांत निमग्न होशील." असें म्हणून जनार्दनस्वामींनीं एकनाथाच्या कानांत ब्रह्मविद्येचा गुरुमंत्र सांगितला, व मस्तकीं हात ठेवून अनुग्रह दिला. याप्रमाणें हा ब्रह्मविद्येच्या गुरुमंत्राचा व अनुग्रहाचा प्रसंग फाल्गुन कृष्ण षष्ठीस घडला.

धों. बा. सहस्रबुद्धे. एकनाथाचें चरित्र.

---

## पाठ ५ वा.



### विद्यारण्य.

#### भाग १ ला.

परमेश्वरकृतीचें कौतुक अवलोकन करण्यास्तव प्रवास करण्याला निघालों असतां, एक दिवस माझा मुक्काम मथुरेस झाला. ग्रीष्म ऋतूच्या दुःसह तापानें शरीर क्लांत झालें होतें. अशा वेळीं मथुरेसारख्या ठिकाणीं संध्याकाळीं यमुनातटाकीं घाटावर मंदशीतल वायूनें उठणाऱ्या सुललित लहरींची मजा किती प्रेक्षणीय असते म्हणून सांगूं! सुस्निग्ध मारुतकल्लोल आपल्या शीतल स्पर्शानें शरिरास सुखवीत होते. वर गगनमंडलांत एकामागून एक उगवणाऱ्या

हजारों चांदण्या आणि त्यांच्या मध्यभागीं विराजमान होणारा दिव्य लावण्ययुक्त पूर्णचंद्र आकाशास अनिर्वचनीय शोभा आणीत होता. खालीं यमुनेच्या पात्रांत पडलेलीं त्यांचीं प्रतिबिंबें लाटेबरोबर वर-खालीं नाचत असलेलीं पाहून, जणूं काय, चंद्रमा आपल्या प्रियजनां-सह जलविहारच करीत आहे, असा भास होत होता. हळुहळू अंधकार सर्वत्र आपला अंमल जास्त जास्त बसवूं लागला; तसतसा शहरांतील लोकांचा कलरव मंदमंद होत, अखेर अगदींच बंद झाला; आणि सर्वसंतापनाशिनी निद्रा प्राणिमात्राच्या नेत्रांत आविर्भूत होऊन त्याचे क्लेश हरण करूं लागली. अशा वेळी मी त्या घाटावर डोळे मिटून विश्वाचें अमर्यादित्व, प्रभूची अगाध लीला आणि मनुष्य-ज्ञानाचा संकुचितपणा, यांविषयीं विचार करीत असतां लवकरच निद्रावश झालों; आणि या अकल्पित रीतीनें मिळालेल्या निद्रा-सुखाचा अनुभव घेतां घेतां मला एक चमत्कारिक स्वप्न दिसलें. तें असें:—

'मला वाटलें, मी एका विस्तीर्ण, निबिड अरण्यांत भ्रमण करीत आहें. त्या अरण्यांत खालीं नूतनोद्गम कोमल दूर्वादलांनीं जमीन आच्छादलेली असून, बाजूस प्रचंड गगनभेदी प्राचीन वृक्ष उभे होते; आणि वर आकाश तारकांनीं दैदीप्यमान दिसत होतें. खालीं दूर्वादलांचा गालिचा, बाजूस वृक्षरूपी स्तंभ आणि वर तारकारूपी दीप, यांजवरून हें कोणाचें तरी विलासमंदिर असावें, असा मला क्षणभर भास झाला; म्हणून मी इकडे तिकडे कोणी आहे का, म्हणून पाहूं लागलों. तों पलीकडे एका सरोवराचे तीरीं स्तब्ध, निश्चळ, गंभीर आणि प्रशात अशी एक रमणीय मूर्ति माझ्या दृष्टीस पडली. तिचें तें अप्रातिम लावण्य, अवर्णनीय तेज आणि या दोहोंस अत्यंत शोभविणारी ती सुप्रसन्न मुद्रा पाहून

माझ्या मनांत इतका पूज्यभाव उत्पन्न झाला कीं, प्रथमदर्शनींच तिला साष्टांग नमस्कार घालून ती कोण, कुठली, काय वगैरे गोष्टींचा पूसतपास करण्याचा मीं विचार केला. परंतु आश्चर्य आणि आनंद यांच्या अतिरेकामुळें वाचा स्तब्ध झाली. बोलण्याकरितां मीं पुष्कळ धडपड केली, परंतु शब्द फुटेना. अंगचेष्टितांनीं मीं आपलें इंगित तिला कळविलें. तेव्हां ती हासून म्हणाली, "मी तुझें इंगित समजल्यें. माझें नांव विद्या, आणि या अरण्याचें नांव विद्यारण्य. या वनाची शोभा पाहाण्याची तुझी उत्सुकता दिसते. तर चल माझ्या मागून आणि तृप्ति करून घे."

दोहों बाजूंच्या वृक्षश्रेणींतून वनश्रीची शोभा अवलोकन करीत करीत मी विद्यादेवीच्या मागून चाललों. ती शोभा पाहून मला अत्यंत कौतुक वाटलें, आणि त्या वृक्षांची माहिती विचारण्याची मला उत्कंठा लागली. माझी उत्कंठा पाहून ती म्हणाली, "या विद्यारण्यांत अतिभाग्यवान् लोकांचाच काय तो प्रवेश होत असतो; आणि त्यांनाही इथल्या वृक्षांचीं फळें प्राप्त करून घेण्यास अति आयास पडतात. तीं मिळण्याइतकें भाग्य सर्वांचेंच असतें, असें नाहीं. कित्येक तर या वनांत येऊन व या वृक्षांची उंची पाहून फलाविषयीं निराश होत्साते माघारे फिरतात. कित्येक वृक्षांवर मोठ्या उत्साहानें चढतात, परंतु अर्ध्यावर जाण्याच्या आधींच थकतात. जे विशेष यत्नशील आणि निश्चयी असतात, त्यांच्याच हातीं हीं फळें लागतात; आणि हीं फळें ज्यानें एकदां चाखलीं आहेत, तो त्यांची रुचि कधीं विसरणार नाहीं, इतकीं हीं गोड आहेत. आतां या वृक्षांपैकीं ठळक ठळक आहेत, त्यांची माहिती मी तुला करून देत्यें.

तो पहा समोरचा मनोहर वृक्ष! त्याच्या शाखा फुलभारानें

कशा लवल्या आहेत! त्याच्या स्कंधांतून सुधामय मधुधारा अखंड गळत आहेत! आणि रसज्ञ भृंगांच्या झुंडीच्या झुंडी त्याच्याभोंवतीं घिरट्या घालीत आहेत! पहा, अलंकृतिरूपी लतांनीं त्याला वेष्टून कशी अपूर्व शोभा आणली आहे ती! या वृक्षाचें नांव काव्यतरु.

आतां पलीकडे जो अतिप्राचीन, जीर्ण, तथापि तेजस्वी वृक्ष आहे, त्याकडे पहा. एकदोनच भृंग, परंतु ते कसे त्या वृक्षाच्या मधुपानांत गर्क झाले आहेत! त्याचें नांव ज्योतिष."

हें तिचें वाक्य ऐकून त्या वृक्षाजवळ जातांच एक विलक्षण चमत्कार माझ्या दृष्टीस पडला. तो असा कीं, ह्या ज्योतिषवृक्षाचें मूळ जमिनींत नसून तो दुसऱ्या एका प्राचीन, परंतु टवटवीत आणि बळकट वृक्षाच्या स्कंधावर उगवलेला दिसला. हें गूढ काय आहे, म्हणून विद्यादेवीला मीं विचारलें तेव्हां ती म्हणाली:—

" हा जो दुसरा प्राचीन परंतु टवटवीत असा सारवान् वृक्ष आहे. त्याचें नाव गणित; या वृक्षावर ज्योतिषासारखे आणखी कित्येक लतावृक्ष उगवले आहेत. तथापि तो यत्किंचितसुद्धां वांकला नाहीं. एवढ्यानेंच काय झालें? आणखीही कित्येक चमत्कार तुला दिसतील. पुढें चल."

धीरोदात्त गतीनें पावलें टाकीत ती पुढें चालली होती, आणि मी तिच्या मागोमाग आश्चर्य करीत चाललों होतों. कांहीं पावलें चालल्यावर ती मागें वळून म्हणाली:—

" निरनिराळ्या देशांत होणारे सर्व वृक्ष व लता यांचे समुदाय येथें आणून लाविले आहेत. ज्योतिष आणि गणित हे वृक्ष हिंदुस्थानांतले आहेत. परदेशीय लोकांनीं या ठिकाणीं येऊन या दोन वृक्षांचीं कलमें करून आपापल्या देशीं नेलीं. यांशिवाय दर्शन, शास्त्र, इत्यादि वृक्षांचींही कलमें ते हरहमेष नेत आहेत. परंतु स्वदेशीय

लोकमात्र या वृक्षांकडे ढुंकूनसुद्धां पहात नाहींत. यामुळें या वृक्षांचीं फळें पिकून खालीं गळून पडतात आणि जागच्या जागीं कुजून जातात! धिक्कार असो अशा मैंदांना!"

यानंतर विद्यादेवीनें दर्शन, श्रुति, स्मृति, पुराणें वगैरे वृक्ष दाखविले. त्यांना कित्येक वर्षांत पाणी न मिळाल्यामुळें ते वाळत चालले होते; पानें सगळीं गळून पडलीं होतीं; मुखापाशीं किडच्यांनीं कोरून घरें केलीं होतीं; आणि ते अगदीं शून्यगर्भ झाले होते. ही त्यांची अत्यंत शोचनीय स्थिति पाहून मला पराकाष्ठेचें वाईट वाटलें. शास्त्रवृक्षाकडे मीं निरखून पाहिलें, तों त्याच्याखालीं कांहीं माणसें बसलेलीं दिसलीं, आणि तीं या झाडाची मशागत करीत असतील, असा आशेचा अंकुर मनांत उद्भवून थोडासा संतोष वाटला. परंतु जसजसा मी त्याचेजवळ गेलों, तसतसा माझा संतोष नाहींसा होऊन त्याची जागा संतापानें घेतली कारण हे लोक त्या झाडाची मशागत करीत नव्हते, तर उलट आपापसांत हमरीतुमरीवर येऊन हातां-तल्या कोयत्यांनीं त्या वृक्षाच्या शाखा छिन्नविछिन्न करीत होते. हा प्रकार पाहून मला अतिशय संताप आला. तथापि हें भांडण कशाकरितां चाललें आहे, हें समजून घेण्यासाठीं मीं विद्यादेवीला प्रश्न केला. तेव्हां ती म्हणाली:—

"हे भांडखोर लोक दंभ, अभिमान आणि स्वार्थ, या तीन मादक पदार्थांच्या पानानें बेफाम होऊन येथें येऊन असें नीच कर्म करीत आहेत. हें पाहून मला मनस्वी दुःख होतें. यांना ताळ्यावर आणण्याला आजपर्यंत मीं पुष्कळ इलाज केले, पण व्यर्थ! 'जित्याची खोड मेल्याशिवाय जावयाची नाहीं', म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं!"

---

# पाठ ६ वा.



## विद्यारण्य.

### भाग २ रा.

यानंतर आम्हीं रसायन, शारीर, चिकित्सा वगैरे कित्येक लहानमोठे वृक्ष पाहिले. ते पाहून मला अति संतोष वाटला आणि जिच्या प्रसादानें आज मला हें विद्यारण्य यथेच्छ अवलोकन करण्यास सांपडलें, त्या विद्यादेवीविषयीं माझ्या मनांतली पूज्यबुद्धि दुणावली. अतिश्रद्धायुक्त अंतःकरणानें मी तिला म्हणालों, " देवि ! आज या अनुपम सुखाचा लाभ मला घडला, हा सर्व तुझ्या कृपेमुळें. अखिल भूमंडळांत यासारखें रमणीय व निर्मल सुखधाम आढळावयाचें नाहीं, अशी माझी खात्री आहे. तुझ्या ठायीं शुद्ध प्रेम ठेवून तुझी एकनिष्ठपणें सेवा करणारे खरोखर धन्य होत. अशांचाच येथें येण्याचा अधिकार, इतरांचा नाहीं, यांत शंका नाहीं ! "

हें माझें भाषण संपतें न संपतें तोंच विद्यादेवी खिन्न वदन करून म्हणाली, " तूं बोललास हें खरें; तूं म्हणतोस, असें पूर्वीं होतें खरें. परंतु हाय हाय ! आतां माझ्या या वनाची लोकांनीं कोण विटंबना मांडली आहे! पूर्वींचे परोपकाररत, तत्त्वपरायण, अध्ययनशील, एकनिष्ठ, पुण्यप्रतापी आचार्य, व त्यांचे गुरुसेवापरायण, भक्तियुक्त, ब्रह्मचर्यव्रतानें राहणारे सच्छिष्य कोणीकडे, आणि आतांचे वृथाभिमानी, दंभयुक्त, शांतिशून्य, श्लाघाभोजी, गर्विष्ट गुरु आणि त्यांचे शिष्य कोणीकडे ! दुःखांत सुख एवढेंच म्हणावयाचें कीं, हल्लींच्या काळींसुद्धां लाखांत पांचचार माझे निष्ठावंत भक्त सांपडतात."

आम्ही परस्परांशीं अशा सुखदु:खाच्या गोष्टी बोलत होतों, इतक्यांत एक प्रचंड राक्षस आपला स्थूल देह जास्त जास्त लंबायमान करतांना मला दिसला. होतां होतां तो इतका वाढला कीं, सगळें जग त्याच्या उदरांत मला दिसूं लागलें. तेव्हां मी अगदीं भांबावून गेलों, परंतु भ्यालों नाहीं. कारण, त्या राक्षसाचें रूप अक्राळविक्राळ नव्हतें. त्याची मुद्रा तर इतकी मोहक होती कीं, त्याला पाहतांच त्याच्या सन्निध जाण्याचा मोह पडे. सगळें जग उदरांत समाविष्ट झालें होतें, तरी तो क्षुधेनें व्याकुळ होऊन दीर्घ स्वरानें ओरडत होता. 'याचें नांव लोभ', असें मला विद्यादेवीनें सांगितलें. त्याच्या-पलीकडे लहानमोठा हवा तसा आकार व वेष धारण करणारीं, आणि ताडताड उड्या मारून झाडांझुडपांचा विध्वंस करणारीं अनेक पिशाचें दिसलीं. त्यांच्या चेष्टा पाहून मन उद्विग्न झालें. कांहीं एक न बोलतां मी विद्यादेवीच्या मागून मुकाट्यानें चालूं लागलों; तों तीं पिशाचें अगदीं माझ्या पाठीशीं येऊन ठेपलीं, आणि आपल्या अस्थिचर्मावशिष्ट हातांच्या बोटांनीं मला खुणवूं लागलीं, तेव्हां मी फार भयभीत झालों. विद्यादेवीनें हें माझ्या चर्येवरून ताडलें; आणि तिनें धैर्य व तितिक्षा असे दोन नोकर माझ्या संरक्षणासाठीं दिले. अशा बंदोबस्तानें चालतां चालतां आम्ही एका रम्य पर्वताच्या पायथ्याशीं आलों. या पर्वतावर चढण्याच्या वाटेच्या तोंडाशींच, एका बाजूस एक दृढव्रता आणि सुशीला स्त्री, व दुसऱ्या बाजूला तसाच एक पुरुष अशीं दोघें उभीं होतीं. जे कोणी पांथिक त्या पर्वतावर जाण्यास येत, त्यांना आदरसत्कारपूर्वक योग्य मार्गाला लावून देण्याचें काम तीं करीत. या स्त्रीचें नांव श्रद्धा आणि पुरुषाचें नांव यत्न, असें विद्यादेवीकडून मला कळलें. या पर्वताची चढण फार मोठी आणि कष्टकर होती. कांहीं थोडा मार्ग मोठ्या

नेटानें कंठिल्यावर थोडा वेळ वाटेंतच मुक्काम करावा, अशी मला इच्छा झाली. विद्यादेवीनें आपल्या दिव्यज्ञानशक्तीनें ती इच्छा तेव्हांच ताडली आणि ती म्हणाली, " छे छे! हें अगदीं उपयोगाचें नाहीं. येथें तसें करतांही यावयाचें नाहीं. या पर्वताच्या चढणींत अशी कांहीं खुबी आहे कीं, अर्ध्या वाटेंत जो मुक्काम करूं पाहील, तो घसरलाच म्हणून समजावें! जावयाचें तर थेट शिखराला जाऊन भिडलें पाहिजे. नाहीं तर पायथ्याशीं रहावें हें बरें. मध्यें पायरीच नाहीं. म्हणून तुला सांगत्यें, सावध रहा आणि नेटानें पावलें टाक; नाहीं तर घसरशील!"

विद्यादेवीचा हा प्रेमळ आणि हिताचा उपदेश ऐकून मला थोडासा धीर आला आणि मी नेटानें चालूं लागलों.

धर्माच्या माथ्यावर जाऊन पोहोंचल्यावर जें अनिर्वचनीय व अनुपम सुख वाटलें, त्याचें किती वर्णन करूं! तेथें सुशीतल, मंद वायूच्या स्पर्शानें अंगावर रोमांच उभे राहिले. द्वेष, हिंसा, काम, क्रोध, लोभ, मोह, वगैरे दुष्ट मनोविकारांचे पाश तटातट तुटून त्यांत बंदिवान होऊन पडलेलें मन स्वतंत्र झालें. आनंद आणि आरोग्य या गोष्टींची तर तेथें विपुलता होती. तेथून कांहीं अंतरावर एक रम्य, स्वच्छोदक सरोवर होतें. त्याचे कांठीं कित्येक लावण्य-लतिका सुंदरी स्वेच्छ विहार करीत होत्या. त्यांचीं शरिरें अलंकारां-वांचून स्वाभाविक सौंदर्यानें फार मोहक दिसत होतीं. त्यांची मुद्रा प्रफुल्ल, व स्वभाव सरळ आणि वात्सल्ययुक्त दिसत होता. या काय नागकन्या आहेत कीं देवकन्या आहेत, असा विस्मय पडून मी आपल्या मनाशींच विचार करीत होतों. विद्यादेवीनें माझ्या मनांतला हा विचार ओळखून म्हटलें, " तुझ्या मनांत आलेली कल्पना अगदीं बरोबर आहे. या कांहीं मृत्युलोकच्या स्त्रिया नव्हेत. हा धर्माचल

हेंच यांचें वसतिस्थान. दया, भक्ति, क्षमा, शांति, अहिंसा, अशीं यांचीं नांवें आहेत. यांचीं नांवें यांच्या गुणांवरून ठेविलेलीं आहेत. या धर्माचलावर जो भाग्यवान् पुरुष येऊन वास करील, त्याच्या सेवेला या अगदी तत्पर असतात. जो कोणी या सरोवरांत स्नान करील, त्याचें शरीर आणि मन अत्यंत स्निग्ध आणि जीवन पवित्र होईल."

असें विद्यादेवीनें सांगितल्यावरून मला त्या सरोवरांत स्नान करण्याची अनावर उत्कंठा झाली. विद्यादेवीच्या संमतीनें मी त्यांत स्नान केल्यावर मला जी कृतार्थता वाटली, आणि जो आनंद झाला, तो वर्णन करतां येत नाहीं. मी त्या सरोवरांत नव्हे, तर खरोखर आनंदसरोवरांतच डुंबत होतों.

इतक्यांत बाराचे ठोके पडले. त्यामुळें माझ्या निद्रेचा भंग झाला. आणि डोळे उघडून पाहतों, तों अरण्य नाहीं, पर्वत नाहीं, सरोवर नाहीं, काही नाहीं ! यमुनेच्या विस्तीर्ण तीरावरील घाटावर मी एकटाच पडलों आहें, माझ्याशिवाय तेथें चिटपांखरूंसुद्धां कोणी नाहीं, हें पाहून आमच्या स्थित्यंतरांविषयीं विस्मय आणि विद्यादेवीचें चिंतन करीत मी घरचा मार्ग धरिला.

वा. गो. आपटे. मासिक मनोरंजन.

---

## पाठ ७ वा.



### भाषण.

कित्येकांच्या भाषणामध्यें विचारसरणीपेक्षां कोटीक्रम अधिक असतो, व त्यांना सत्य समजण्याची शक्ति नसली, तरी 'त्यांना वादविवाद करितां येतो' असें लोकांकडून म्हणवून घेण्याची त्यांची

इच्छा असते. जणूं काय, विचार कसा करावा, हें समजण्यापेक्षां, कोणता कोटीक्रम लढवावा, हें समजण्यांतच अधिक भूषण आहे !

कित्येकांचे बोलण्याचे विषय ठरीव असतात. त्यांवर त्यांना चांगले भाषण करितां येतें. पण त्यांच्यापाशीं भरणा फार नसतो. या प्रकारचें विषयदारिद्य कंटाळवाणें होतें, व तें एक वेळ कळून आलें म्हणजे थट्टास्पद होतें.

भाषणविषयाचा उपक्रम करणें व विषयांतर होऊं न देणें आणि एक विषय संपला म्हणजे दुसरा पुढें आणतां येणें, हें योग्यतेचें काम आहे.

वादविवादामध्यें व संभाषणामध्यें कोटीक्रम, गोष्टी व तर्कसरणी, प्रश्न व उत्तरें, विनोद व गांभीर्य, यांचें मिश्रण असावें. कारण, एकाच प्रकारची काथ्याकूट करणें कंटाळवाणें होतें.

विनोदाच्या संबंधानें इतकें सांगावयाचें कीं, कित्येक विषयांची थट्टा करूं नये. उदाहरणार्थ--धर्म, राजकीय गोष्टी, थोर लोक, एकाद्याचें महत्त्वाचें प्रस्तुत कार्य, व कोणतीही दया येण्याजोगी गोष्ट, यांची थट्टा करूं नये. पण कित्येक असे असतात कीं, त्यांना वाटतें, आपण कांहीं तरी खरमरीत व मर्मभेदक असें बोललों नाहीं, तर आपलें बुद्धितैक्ष्ण्य झोंपी गेलें, असें लोकांना वाटेल. पण असला स्वभाव लगामीं ठेविला पाहिजे. मनुष्यानें तिखट, मीठ व कडू यांतला भेद लक्षांत ठेवावा.

छद्मभाषी मनुष्याच्या जिभेला जसे लोक भितात, तसें त्यानें लोकांच्या स्मरणशक्तीला अवश्य भ्यालें पाहिजे. कारण छद्मी भाषण लोक विसरत नसतात; व वेळ आली म्हणजे ते सूड उगविण्याला चुकणार नाहींत.

जो पुष्कळ प्रश्न करील, त्याला पुष्कळ ज्ञान मिळेल, व त्याच्यावर पुष्कळ लोक खुश होतील. ज्या विषयांत जो निपुण आहे, त्या विषयाच्या संबंधानें त्याला प्रश्न करावे, म्हणजे विशेष फायदा होतो. कारण आवडत्या विषयावर बोलावयाला संधि सांपडली, म्हणजे बोलणाराला आनंद होतो; व ऐकणाराला सतत ज्ञानप्राप्ति होत जाते. पण प्रश्न करावयाचे ते क्लिष्ट असूं नयेत, कारण, असले प्रश्न करणें फक्त परीक्षकालामात्र शोभतें.

सर्वकाळ आपण स्वतःच बोलत असूं नये, दुसऱ्यालाही बोलायाला सांपडेल असें करावें, व आपलेंच घोडें सारा वेळ पुढें सारणारे कोणी असले, तर त्यांना युक्तीनें मागें काढावें व त्यांच्या जागीं दुसऱ्यांना सवड द्यावी.

जी गोष्ट तुम्हांला ठाऊक आहे, असें लोकांना वाटतें, ती जर तुम्हीं कांहीं प्रसंगीं चोरून ठेविली, तर दुसऱ्या प्रसंगीं असें होईल कीं, जी गोष्ट तुम्हांला खरोखर माहीत नाहीं, ती तुम्हांला माहीत आहे, असें लोकांना वाटेल.

मनुष्यानें स्वतःविषयीं क्वचित्च बोलावें व तेंही मोठ्या विचारानें बोलावें. आत्मस्तुति करावयाला एकच विषय आहे. तो हा कीं, जे गुण आपल्यामध्यें आहेत, तेच दुसऱ्यांमध्यें पाहून त्यांची प्रशंसा करावी; म्हणजे आपली स्तुति केल्यासारखें होतें, व तें वाईट दिसत नाहीं.

दुसऱ्याला वर्मीं लागणारें भाषण करूं नये. वक्तृत्वापेक्षां सद्सद्विचारी भाषणाची योग्यता अधिक आहे; व सुसंगत व सुभाषित भाषणापेक्षां ज्याशीं आपण बोलतों त्याला आवडणारें असें भाषण अधिक योग्यतेचें आहे.

पूर्वपक्षनिरूपणाचें भाषण चांगलें अस्खलित कारितां यावें, पण उत्तरपक्ष कोणीं स्वीकारल्यास त्याचें ताबडतोब चांगलें खंडण करितां येऊं नये, हें मंदपणाचें लक्षण आहे. आणि चांगलें उत्तर देतां येतें, पण पूर्वपक्षनिरूपणविषयक चांगलें भाषण करितां येत नाहीं, तर तें उथळ बुद्धीचें व कमजोरपणाचें लक्षण आहे. कित्येक जनावरांतही असेंच आहे. जीं धावण्याच्या कामीं फार कमकुवत असतात, तीं वळण्याच्या कामीं अतिशय चपळ असतात. उदाहरणार्थः—शिकारी कुत्रा व ससा यांचें असें आहे. सशाला फार धाववत नाहीं, तो लवकर थकतो; पण धावतां धावतां तो पटकन वळतो; तसें कुत्र्याला करितां येत नाहीं. कुत्रा एकसारखा पुढें धावेल, पण मागें वळायला त्याला अवकाश लागतो, तितक्यांत ससा बरीच मजल मारतो.

मुख्य विषयाला हात घालण्यापूर्वीं लांबलचक प्रस्तावना सांगणें कंटाळवाणें होतें; पण मुळींच न सांगणें हेंही बरें दिसत नाहीं.

शि. सि. वागळे. बेकनचे निबंध.

---

## पाठ ८ वा.



### लक्ष्मण-झोला.

#### भाग १ ला.

अरुणोदय होऊन पूर्वदिशा आरक्त झाली होती. आमच्यासारखेच [ करमणूककार ] कित्येक यात्रेकरू उठून मुखमार्जनादि करण्याच्या विचारांत होते; कित्येक केव्हांच उठून गंगेवरून स्नानसुद्धां करून आले होते. धर्मशाळा [हरिद्वार] थोडीशी उंचावर आहे; तिच्या पायऱ्या उतरून आम्ही खालीं आलों व थोडेसे

डाव्या बाजूस वळलों, तों निर्मळ गंगेचा सुंदर प्रवाह दृष्टीस पडला. या प्रवाहाच्या कांठी पुष्कळ झोंपड्या असून त्यांतून भस्मचर्चितांग जटाधारी असे दोनदोन चारचार गोसांवी धुन्या पेटवून स्वस्थपणें हरिनामाचा घोष करीत, किंवा गप्पागोष्टी सांगत बसलेले दिसले. गंगातटाकाच्या या गांवास हृषीकेश असें नांव आहे. आणि येथें मुख्य देवळें दोन आहेत; एक रामाचें व दुसरें त्याचा अत्यंत प्रेमळ भाऊ जो भरत, त्याचें. सत्ययुगांत जो हृषीकेश या नांवानें प्रसिद्ध होता, तोच पुढें रामावतारीं भरत झाला; व त्यानें या स्थानी येऊन तपश्चर्या केली. म्हणून या स्थानास हृषीकेश असें नांव आहे. एका पाश्चात्त्य तत्त्ववेत्त्यानें म्हटलें आहे की, मनुष्याची परमेश्वराच्या किंवा देवतांच्या स्वरूपाची कल्पना ज्याच्या त्याच्या अनुभवासारखी असते. आमचे इकडील प्रांती देवादिकांच्या मूर्तींना मिशा दाखविण्याची मुळीच पद्धति नाहीं. त्यांतून दाढी लावलेली देवमूर्ति तर स्वप्नांतसुद्धां यावयाची नाहीं. परंतु इकडल्या प्रांतीं दाढीमिशांच्या मूर्ति फार. भरताची मूर्ति अशाच प्रकारची आहे. ती पाहून आम्हांस थोडें हंसूं आलें. पुरभय्ये लोक आपली दाढी दुभागून दोनही बाजूंनीं वर चढवितात, तशीच या मूर्तीची दाढी दाखविलेली आहे.

गंगेच्या तीरीं जाऊन तिच्या शीतल व निर्मल जलांत मुखमार्जन करून आम्ही लक्ष्मण-झोल्यास जाण्यास निघालो. हृषीकेशापासून झोल्याच्या वाटेवरली गंगातटाकाची व हिमालयाच्या पहाडाची अनुपम रमणीयता पहाण्यासाठीं म्हणून तर आम्हीं हरिद्वारांतून निघालों, तेव्हां आमची उत्सुकता किती असेल, हें काय सांगावें! हृषीकेशापासून सुमारें अर्ध मैल गेल्यावर एके बाजूस पहाड, दुसरे बाजूस गंगा आणि तिच्या पलीकडे पहाड, असा

देखावा सुरू झाला. ज्या पहाडाच्या कडेकडेनें रस्ता आहे, त्यावर बेलांच्या झाडांची इतकी गर्दी आहे कीं, कांहीं विचारूं नये! आणि त्या बेलांचीं बिल्वपत्रेंही फार सुंदर व अगदीं हिरवींगार. वाटेनें ठिकठिकाणीं कोठें एखाद्या वृद्ध झाडाच्या ढोलींत, कोठें जुनाट वडाच्या झाडाच्या बुंध्याखालीं उकरून जमिनींत तळघराप्रमाणें करून त्यांत, कोठें पहाडांत एखादा प्रचंड प्रस्तर फोडून तो गुहेप्रमाणें करून तींत, किंवा स्वतःच बनलेल्या अशा एखाद्या गुहेंत साफसूफ करून, गोसांवी लोक बसलेले आढळले. कित्येकांनीं केवळ सृष्टिनिर्मित निवासस्थानांवर निर्वाह न चालवितां, आपल्या अंगमेहनतीनें पानेंफांद्या जमवून पर्णकुटी करून आपल्यास निवासस्थानें निर्माण केली होती. हे गोसांवी बाराही मास येथें असेच राहतात. कधी म्हणून आपलें स्थान सोडून जात नाहींत, असें आमच्या सोबत्यांनी सांगितलें. तें ऐकून आम्हांस अतिशय आश्चर्य वाटलें! गोसांवी म्हटले कीं, कामधाम न करितां दुसऱ्यांजवळ भिक्षा मागून किंवा दुसऱ्यांस फसवून आपला उदरनिर्वाह चालविणारे एक प्रकारचे दरोडेखोरच, असें साधारणतः लोक समजतात. बहुशः सर्वांची बुद्धि 'या लोकांस कांहीं देऊं नये, ते समोर आले कीं त्यांना हाकून द्यावें', अशाच प्रकारची असते. तशी बुद्धि होण्यास या लोकांपैकी पुष्कळांचें वर्तनच कारण होय, यांत शंका नाही. परंतु या ठिकाणी मनुष्यवस्तीपासून लांब येऊन राहून, कोणापाशीं मुळींचसुद्धां याचना न करितां केवळ गंगातटाशीं राहून आपल्या अपरिमित श्रद्धेप्रमाणें जपतपांतच आयुष्याचे दिवस काढणारे हे तपस्वी नसतील, असें निदान या स्थानीं आल्यावर व त्यांपैकीं कित्येकांच्या मुद्रेकडे पाहिल्यावर खरोखरच वाटत नाहीं. कमरेला कोणच्या तरी चिवट वेलीचा कणखर कडदोरा, रूक्ष वल्कलाची

वीतदीडवीत रुंदीची लंगोटी, डोकीवर पिंगट वर्णाचा जटाभार, अंगाला नुसता विभूतीचा लेप आणि झाडाची ढोली अगर कांट्या-कुट्यांनीं व वाळलेल्या पानांनीं बनविलेली पर्णकुटी हें निवासस्थान, अशा ऐश्वर्यानें वर्षानुवर्ष काढणें, हें केवळ निरुद्योगीपणानें बसून दुसऱ्यांजवळ भिक्षा मागून परपुष्ट व गलेलठ्ठ बनावें, एवढ्यासाठीं असेल, असें निदान येथें तरी वाटत नाहीं. अशा या निवास-पद्धतीच्या मुळाशीं अगदीं अनिर्वचनीय अशी श्रद्धाच असली पाहिजे, यांत शंका नाहीं. ज्या अन्नावांचून आपणां गृहस्थाश्रमी लोकांचें चालत नाहीं, तेंच अन्न मनुष्यमात्रास लागतें, अशी आपली साधारणतः समजूत असते. किंबहुना कांहीं वनस्पतींच्या भक्षणानें प्राणधारणा होते, इतकेंच नव्हे, तर शरीर पुष्ट व तेजःपुंज राहतें, ही कल्पनासुद्धां आपणांस कशीशीच वाटते. परंतु या ठिकाणीं असल्या मूर्ति पाहिल्या, म्हणजे त्या कल्पना केवळ कल्पनाच नव्हेत, त्यांस कांहीं तरी सद्रूप आहे, असें वाटल्या-खेरीज राहात नाहीं.

या मार्गावर अशा प्रकारच्या मूर्तींस पाहून, त्यांच्याविषयीं केव्हां विचार करीत, व केव्हां एखाद्या स्थानाचें विलक्षण सृष्टिसौंदर्य पाहून तल्लीन होत, आम्ही चाललों असतां, पुनः गंगाप्रवाहाचा व पर्वतश्रेणीचा अत्यंत मनोवेधक असा देखावा आमचे दृष्टीस पडला. आम्ही एक लहानसें पर्वतशृंग चढत होतों, परंतु चढण्याच्या श्रमांनीं आम्हांस कांहींसुद्धां वाटलें नाहीं. ज्यास शहरा-बाहेर व्यायामासाठीं दोनचार मैल जाण्यापलीकडे फारसें चाल-ण्याची संवय नाहीं, त्यानें सुमारें बारातेरा मैलांची मजल मारून पुन्हा अडीचतीन मैल चढण चढून जाण्याचा उपक्रम केला, तर त्रास वाटण्याचा किती संभव? परंतु तसें आम्हांपैकीं कोणासही

वाटलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर जों जों आम्ही आपला मार्ग आक्रमूं लागलों, तों तों मार्गावरील दोन बाजूंस दोन प्रकारचें सृष्टीचें ऐश्वर्य पाहून मन अगदी तल्लीन होऊन जाऊन परस्परांशीं गोष्टी बोलण्याचेंसुद्धां बंद पडलें. मन इतकें प्रसन्न झालें कीं, जणूं काय, तेथल्या त्या गंगाप्रवाहाच्या प्रसन्नतेचें प्रतिबिंबच प्रत्येकाच्या चर्येवर अगदीं स्पष्टपणें दिसूं लागलें. उजवे बाजूस बिल्वादि पल्लवमय वृक्षांची गर्दी आणि उंच पहाड, दुसरे बाजूस स्वभावतःच पांढरा स्वच्छ, व त्यांत आणखी रांगोळीप्रमाणें पांढऱ्या वाळूनें व त्याच वर्णाच्या गोट्यांनीं बनविलेल्या मार्गावरून धावत धावत जाणारा विस्तीर्ण असा गंगेचा प्रवाह, त्या प्रवाहांत मधून मधून उघडा पडलेला पुलिनप्रदेश, आणि दुसऱ्या तीरावरचीं पर्वतपदावरील हिरवींगार क्षेत्रें, हीं पाहण्यासाठीं आम्ही उभे राहिलों होतों. त्या मार्गावर ज्याची ओळख झाली, असा एक गोसांवी जवळच उभा होता. आम्ही दोघेही तो देखावा पहाण्यांत अगदीं दंग झालों होतों. इतक्यांत त्या गोसांव्यानें माझ्या पाठीवर हात टाकून म्हटलें, 'बादशहा आपल्या महालांतून संगमरवरी दगडांची फरशी करतो व तीवर नानाप्रकारच्या रंगांच्या मऊ गालिच्यांची बिछाईत पसरतो; परंतु या आपल्या पुढें असलेल्या बिछायतीपुढें त्याच्या त्या बिछायतीची काय मातब्बरी !'

हे त्याचे अंतःप्रेरित उद्गार कानीं पडतांच, त्याच्या वर्णनाच्या समर्पकतेबद्दल अत्यंत आश्चर्य वाटून त्याच्याकडे पाहिलें, तों त्याच्या अंतःकरणांतील हर्षाच्या उकळ्या त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होत्या. हर्षाची किंवा आनंदाची उकळी कशी असते, तिचें खरें खरें स्वरूप त्या वेळीं दृष्टीस पडलें; आणि असें वाटलें कीं,

या बुद्धीनें जो सदैव या सृष्टिसौंदर्याकडे पाहात राहील, तो कृत्रिम बादशाही किंवा त्या बादशाहीपासून लाभणारीं कृत्रिम सुखें आपणास मिळावी, अशी आशा करील तरी कशाला? त्यास या सृष्टिवैभवापुढें इतर सगळे वैभव तुच्छ वाटेल व तो भर्तृहरीप्रमाणें एखाद्या राजास:—

**त्वं राजा वयमप्युपासितगुरुप्रज्ञाभिमानोन्नताः।**
**ख्यातस्त्वं विभवैर्यशांसि कवयो दिक्षु प्रतन्वन्ति नः।**
**इत्थं मानद नातिदूरमुभयोरप्यावयोरन्तरम्।**
**यद्यस्मासु पराङ्मुखोऽसि वयमप्येकान्ततो निःस्पृहाः।**

असें म्हणून तुच्छ करील, तर त्यात नवल काय? या नैसर्गिक ऐश्वर्यापुढें कोणच्या कृत्रिम ऐश्वर्याची मात्रा चालणार आहे?

श्रद्धावान् लोकांनी या ऐश्वर्याच्या प्रेक्षणानें अगदी मोहित होऊन या ऐश्वर्याचा स्वामी जो षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वर, त्याच्या गुणांचें-मात्र गायन केलें, व इतर सर्व ऐश्वर्यांस तुच्छ मानून त्यांचा धिक्कार केला, तर त्यांत कांहींसुद्धां नवल नाहीं. आणि असलें ऐश्वर्य जेथें नांदत आहे, तेथें जपतपसंख्या करीत आपला आयुष्यक्रम घालविण्याचा कोणीं निर्धार करून सर्वसंगपरित्याग केला, तर त्यांतही खरोखर नवल नाही. ज्याचें अंतःकरण श्रद्धेनें भरलें आहे, त्यास तर या ऐश्वर्याच्या स्वामीबद्दल अत्यंत भक्ति वाटून तो त्याच्या ठायीं लीन होईल यांत नवल नाहीं: परंतु श्रद्धाहीनसुद्धां क्षणमात्र तरी, 'ऐहिकाच्यापलीकडे कांहीं नाहीं, हें शक्य आहे काय?' असा प्रश्न आपल्याशीं विचारील; किंबहुना तो सर्वांगसुंदर देखावा पाहून त्या सौंदर्याला मोहून येथेंच सदैव वास करावा, अशा इच्छेला आपल्या मनांत तो क्षणभर तरी थारा देईल. थारा देणें अगर न देणें, हें त्याच्या मर्जीवर राहणारच नाहीं. ती इच्छा त्या वेळीं त्याच्या मनावर स्वामित्व करीलच करील.

———

# पाठ ९ वा.



## लक्ष्मण झोला.

### भाग २ रा.

ज्या स्थानीं वरील प्रकारचे एकंदर विचार माझ्या मनांत आले, त्या स्थानापासून लक्ष्मण-झोल्याच्या अलीकडे सुमारें दोनशें-तीनशें पावलेंपर्यंत, या मनोहर देखाव्याचें स्वरूप पावलोपावलीं व क्षणोक्षणीं अधिकाधिक मनोहर होत चाललें. गंगेचा प्रवाह अधिक गंभीर व अधिक उदात्त दिसूं लागला, व सभोंवतालच्या पर्वतनगपंक्तीवरील वनस्पतिही अधिकाधिक दाट व अधिक हिरव्या दिसूं लागल्या. पर्वतश्रेणी अधिकाधिक उंच व अधिकाधिक निकट दिसूं लागली; आणि या देखाव्याच्या मनोहरतेची परमावधि लक्ष्मण-झोल्यास झाली. दोनही बाजूंस प्रचंड वृक्षांनीं व विविधवर्ण वनस्पतींनीं आच्छादित असे प्रचंड पर्वत एकापुढें एक, आणि मधून मोठ्या वेगानें प्रतिक्षणीं थोडथोडी खालीं उतरणारी ती गंगा हीं पाहून असें वाटलें कीं, जणूं काय, भगीरथानें आपल्यास मोठ्या भक्तीनें आणिलें आहे, तर त्याच्या मागोमाग जावें, म्हणूनच ती उत्सुकतेनें चाललेली आहे, आणि तिला पाहून तिच्या सन्मानार्थ हे पर्वत नव्हेत, तर प्राचीन काळचे ऋषिच, तिला उत्थापन देत आहेत. या ठिकाणीं गंगाप्रवाह फार गंभीर असून वेगवान् आहे. येथील पात्र अत्यंत विस्तीर्ण नाहीं, पण मोठेंही नाहीं असें म्हटलें तरी चालेल. परंतु थोड्याच पात्रांत पाणी अपार, आणि अत्यंत वेग असल्यामुळें एका तीरावरून दुसऱ्या तीरावर जाण्यास कोठें उतार नाहीं. इतकेंच नव्हे, तर नाव घालूं म्हटलें तरी शक्य नाहीं.

आणि याच ठिकाणीं बद्रीनारायणास जाण्यास गंगेच्या या तीरावरून त्या तीरावर जावें लागतें. पूर्वीं अशा यात्रिकांसाठीं दोनही तीरांवरून एक अत्यंत भक्कम असा सोल टाकून यात्रेकरूंस एक प्रकारच्या शिंक्यांत बसवून, तें शिंकें सोलांत बसवून सरकवीत सरकवीत पलीकडच्या तीरावर नेऊन सोडण्याची युक्ति केलेली होती; परंतु आतां त्याची कांहींसुद्धां जरुरी राहिली नाहीं. कोणा उदारचरित अशा श्रीमंतानें येथें पोलादी दोरांनीं जखडलेला पूल बांधिला आहे. पूल कांहीं फार मोठा नाहीं; कारण ज्या दोन पर्वतांनीं बनलेल्या खिंडारांत तो घातला आहे, तें खिंडार फार मोठें नाहीं. परंतु पूल झुलता, त्यावरून चाललें असतां तो हलतो व त्याच्या ऐल तीरावर जवळच रामचंद्रानुज लक्ष्मणाचें देवालय असल्या-कारणानें, या पुलास व त्यावरून या स्थानासही लक्ष्मण-झोला असें नांव पडलें आहे. येथें एकंदर देखावा फार बहारीचा आहे, हें वर सांगितलेंच आहे. या पुलावरून पैलतीरावर जातांना वारा फार जोराचा लागतो. ज्याप्रमाणें खालीं गंगाप्रवाह, त्याचप्रमाणें त्याच खिंडारांतून जणूं काय, वरच्या बाजूस वायुप्रवाह बांधून काढल्यांप्रमाणें वाहतो. वारा इतका जोरानें वाहतो कीं, पुलाच्या अगदीं मध्यावर असतांना आपण उडून खालीं प्रवाहांत तर पडणार नाहीं ना, असें भय वाटतें; आणि खालीं गंगाप्रवाह इतका खोल दिसतो कीं, तिकडे पाहाण्याचेंही भय वाटतें. त्यांत आणखी पुलाची झुलती गति आपणांस खालींवर, खालींवर करते, यामुळें त्या भीतींत भरच पडते. कित्येकांस तो देखावा पाहून तेथून उडी टाकून गंगाप्रवाहांत आपण मिळून जाऊन त्याच्याशीं तादात्म्य करून घ्यावें, अशी इच्छा होऊन तेथून उडी घालण्याचाही मोह झाला, तर

त्यांतमुद्धां विशेष आश्चर्य वाटावयास नको. या अनुपम, सर्वांगसुंदर, भव्य व उदात्त स्थळीं उभे असतां मनांत अनेक प्रकारचे विचार येऊं लागले. आपण ज्या ठिकाणीं उभे आहों, तें हिमालयाचें केवळ द्वार होय. या द्वारांतच जर इतकी विचित्र शोभा, इतकें विलक्षण ऐश्वर्य, तर अंतरंगाचें स्वरूप कसें असेल, असा विचार मनांत येऊन नाना प्रकारचे कल्पनातरंग उठूं लागले. परंतु दर तरंगाचे मागोमाग असेंही वाटे कीं, आपल्या परिमित कल्पनेनें अपरिमित अशा उदार व रमणीय सृष्टीचें चित्र कसें वठणार! तथापि कल्पनेच्या तरंगांस जितकें उंच जातां येईल, तितकें निरंकुशपणें उंच जाऊं देऊन, बाह्य व आंतर चक्षूंनी तिचें जितकें म्हणून निरीक्षण करतां येईल, तितकें करीत अगदीं स्तिमितपणें उभे राहिलों. खालीं आपले पायांपाशीं असणाऱ्या प्रवाहावर डोळे लावून त्या प्रवाहाबरोबरच ते पुढें पुढें नेत नेत अगदीं आतां दिसत नाहीं, तेथपर्यंत निरीक्षण झालें, म्हणजे पुन्हा दृष्टि खालीं वळवावी आणि पुनः आपल्या सन्निध दिसणाऱ्या जलौघाकडे दृष्टि देऊन पुनः त्याच्याबरोबर तिनें तो अदृश्य होणाऱ्या स्थानापर्यंत प्रवास करावा, अशी बाह्य चक्षूंची स्थिति होती; आणि अंतश्चक्षु तर आपल्या अंगावरून वाहात जाणाऱ्या वाऱ्यापेक्षांही जास्त वेगानें कल्पनासृष्टींत सैरावैरा धावत होते. त्या वेळीं मनोवेग आणि वायुवेग यांच्यांत तारतम्य पाहावयाचें मनांत आणिलें असतें, तर खात्रीनेंच मनास त्याच्या वेगाबद्दल श्रेष्ठत्व मिळालें असतें. एका मिनिटाच्या सहस्रांश वेळांत फोटोग्राफ घेणारे क्यामेऱ्याप्रमाणें आमच्या कल्पनेनें उभीं केलेलीं चित्रें जर अंतश्चक्षूंच्या क्यामेऱ्यांतून घेतां आलीं असतीं, तर आजला संख्येनें व प्रकारांनीं किती तरी चित्रें वाचकांचे पुढें उभीं केलीं असतीं.

बराच वेळ या हिमालयाच्या अंतर्भागांतील सौंदर्यमंदिराचें कल्पनाचित्र काढून तें पाहून त्या आनंदांत गर्क झालों. नंतर या प्रवाहांत स्नान करण्याच्या हेतूनें पुनः पुलाच्या ऐल तीरावर येऊन स्वस्थ मानसानें स्नान केलें. स्नान करितां करितां आमच्या सोबत्यांपैकीं एकानें सहज म्हटलें, "लक्ष्मणानें आपला आश्रम या ठिकाणीं स्थापला होता. तेथें त्यानें बारा वर्षे तप केलें. आणि म्हणूनच या स्थानीं आणखीही अनेक ऋषींनीं आपआपले आश्रम स्थापून तपश्चर्या केल्या, म्हणून या प्रदेशास तपोवन म्हणतात." हें ऐकून मनास सहजच वाटलें कीं, तपश्चर्येला अगदीं सर्वथैव योग्य अशीं जर कोणतीं स्थानें सांपडतील, तर तीं या हिमालयांतच असलीं पाहिजेत, यांत शंका नाहीं. ज्या स्थानीं आम्ही उभे होतों, तें केवळ अगदीं तळचें स्थान. त्याच्यावरून जों जों अंतरंगांत व उंच प्रदेशीं जावें, तों तों मनास एकाग्रता येऊन व सृष्टिकर्त्याकडेच त्याचें पूर्ण लय लागून सदासर्वदा ध्यानस्थ बसण्याची स्फूर्ति होईल, अशीं स्थानें येथें किती तरी दिसून येतील. दक्षप्रजापतियज्ञासारखे महायज्ञ आणि निरनिराळ्या ऋषींनीं आपापल्या आश्रमांतून केलेले यज्ञ पार पडले तें हेंच हिमालयाचें स्थान. यज्ञयागादिकांचा म्हणजे ब्राह्मणग्रंथांचा काल जाऊन आरण्यकांचा व उपनिषदांचा काल आला. त्या वेळच्या ऋषींनीं या हिमालयांतच अगदीं त्याच्या अंतरंगीं जाऊन बसून केवळ आत्मपरीक्षण करून जीवात्मा आणि परमात्मा यांच्या संबंधाविषयीं विचार केले व त्या विचारांचा मंत्ररूपानें उच्चार केला काय? या हिमालयांतच सर्व उपनिषदांचा उद्गम झाला काय? होय, झालाच असला पाहिजे. सृष्टीचें कल्पनातीत, अजस्र, परंतु अत्यंत रमणीय स्वरूप पाहूनच, त्या अध्यात्मनिरत ऋषींस जीवात्मा आणि परमात्मा यांच्यांतील परस्परसंबंधाचें

यथार्थ ज्ञान होण्याची निराशा वाटून परमात्म्याचें स्वरूप 'नेति नेति' ( असा नव्हे, असा नव्हे ) असें निषिद्ध पद्धतीनें वर्णन करावें लागूनही शेवटीं 'यतो वाचो निवर्तते अप्राप्य मनसा सह' असें विधान करण्याखेरीज गत्यंतर दिसलें नाहीं. येथलें सृष्टीचें विलक्षण विराट स्वरूप पाहून आणि त्याच्यापुढें आपण किती क्षुद्र आहों हें मनांत येऊन जीवात्मा ( म्हणजे आपण ) आणि परमात्मा म्हणजे या विराटस्वरूप सृष्टीचा कर्ता कोणी असल्यास तो, या दोहोंतील अत्यंत प्रचंड अंतर मनापुढें उभें राहून त्याच्या ठिकाणीं लीन होण्याखेरीज दुसरें आपल्यास कोणचेंच साधन नाहीं, असें वाटून त्याच्या ठिकाणीं आपण भक्ति करावी, असा विचार येणें किती नैसर्गिक आहे? परंतु अत्यंत आश्चर्याची गोष्ट ही कीं, असलें विराट स्वरूप पाहूनच उपनिषद्द्रष्टच्या व सूत्रकार ऋषींच्या मनांत अद्वैतविचार येऊन त्यांनीं परमात्म्या-खेरीज कोठें कांहीं नाहीं, जीवात्मा व परमात्मा एकच, असें प्रतिपादिलें. परंतु जाऊं द्या. द्वैताद्वैताच्या वादविवादाचें किंवा विवरणाचें 'करमणूक' हें स्थळ नव्हे. करितां आपण प्रस्तुता-कडे वळूं.

वरील प्रकारचे अनेकविध विचार एकामागून एक येऊन मनाची स्थिति फारच विलक्षण झाली. परंतु तशी स्थिति किती वेळ टिकणार? थोड्याच वेळांत मनास त्या विचारांच्या तडाक्यां-तून काढून प्रस्तुताकडे लाविलें. ऐलतीरावर धोतरें धुऊन, वाळवून गंगेच्या शीतल प्रवाहांत स्नान केलें, आणि थोड्याच वेळांत परत निघून मार्गांतील सुंदर देखावा आतां पुनः आपणांस कधीं दिसावयाचा नाहीं, तेव्हां तो मनसोक्त पाहून घ्यावा, म्हणून जिकडे तिकडे डोळे भरून पहात, मार्गावरच असणाऱ्या शत्रुघ्नाचे

मंदिरांत जाऊन दर्शन घेऊन परत हृषीकेशास आलों. तेथें उपाहार करावयाचा तो करून हरिद्वाराकडे परत जाण्यास निघालों; व तेथें येऊन पोहोंचल्यावर दुसरे दिवशीं, "पुनः आतां हा रमणीय प्रदेश कधी दिसेल तो दिसो". असें आपल्या मनाशींच निराशेनें म्हणत सती अहल्याबाईचे धर्मशाळेचे परमदक्ष व सर्वांस उपयोगीं पडण्यास अत्यंत तत्पर असे कारभारी रा० पिंगळे यांचा व आमच्या नवीन मित्रमंडळीचा निरोप घेऊन स्टेशनवर गेलो.

ह. ना. आपटे. करमणूक.

---

## पाठ १० वा.



### नारायणरावाचा वध.

माधवराव पेशव्याच्या मरणामुळें पेशव्यांच्या घराण्यास उतरती कळा लागली. यापुढें पेशवाई फक्त नांवाची राहिली. मराठ्यांचें राज्य ज्या एकसूत्रानें हालत होतें, तें सूत्र ढिलें पडलें. पुण्याचा दाब कमी झाला व मराठ्यांची राजसत्ता यापुढें विभागली गेली. "मराठे, मराठे" म्हणून शत्रूंना जो आजपर्यंत वचक होता, तो यापुढें कमी झाला. 'मराठे' या व्यापक शब्दाच्या ऐवजीं पेशवे, शिंदे, होळकर, भोसले, गायकवाड हीं घराणींच स्वतंत्रतेनें हिंदुस्थानच्या राज्यकारस्थानांत मन घालूं लागलीं. मध्यवर्ती शक्ति लय पावल्यामुळें शिथिल झालेले अवयवमात्र वेगळे वेगळे हालूं लागले. पेशव्यांचा कमजोर झाला नसता, व गृहकलहामुळें पेशव्यांच्या घराण्याची दुर्दशा उडाली नसती, तर हा प्रसंग कदाचित् आला नसता. माधवरावाच्या कारकीर्दींत

खासगी द्वेष व गृहकलह यांमुळें अव्यवस्थित झालेल्या मराठ्यांच्या राष्ट्राची पुनः एकजूट करण्याविषयीं, त्याला जास्त आयुष्य असतें तर, त्यानें प्रयत्न केला असता. सातारच्या महाराजांस पुनः पुढें करून, मराठ्यांची शक्ति एकवटण्याची माधवरावाची फार इच्छा होती. परंतु त्याच्या अकालिक मृत्यूमुळें महाराष्ट्राचा व मराठ्यांचा सर्वस्वीं नाश झाला. हिंदुस्थानभर पसरलेल्या शेंकडों लहानमोठ्या मराठे सरदारांचें आकलन करण्याची शक्ति जी इतके दिवस पेशव्यांकडे होती, ती नाहींशी झाली. माधवरावाच्या थोड्या कारकीर्दीतच मराठ्यांनी आपल्या विजयी स्वाऱ्यांनीं, पानिपतच्या महाघोर प्रसंगाचें विस्मरण पाडलें होतें, व सर्व महाराष्ट्राचें लक्ष या शूर, तरुण, प्रजापालनदक्ष व भाग्यशाली माधवरावाकडे लागलें होते. आपल्या प्रजेचें न्यायानें पालन करण्याविषयीं त्याची फार इच्छा असे व राजधर्माच्या कर्तव्यकर्मास तो जागृत होता. त्याच्या अकालिक मृत्यूमुळें महाराष्ट्राच्या सर्व आशांचा भंग झाला व पेशव्यांच्या वैभवसमुद्रास ओहोटी लागली.

पेशव्यांप्रमाणेंच गायकवाडादि मराठे सरदारांच्या घरांमध्येंही कलह माजले. पेशव्यांच्या खालोखाल, मराठ्यांचें दुसरें मोठें बलाढ्य राज्य नागपुरच्या भोसल्याचें होतें. रघुजी भोसल्यानें बंगाल, बहार, ओरिसा, वऱ्हाड, गोंडवण वगैरे प्रांतांत मुलुखगिऱ्या करून आपला अंमल बसविला होता व पुष्कळ संपत्ति जमविली होती. परंतु त्या बलाढ्य घराण्यांतही अतिशय द्वैत माजून भावांभावांमध्यें लढाया सुरू झाल्या. जानोजी भोसले, सेनासाहेब सुभा, माधवरावाच्या मागून थोडक्याच महिन्यांनीं तुळजापुरास मरण पावला. त्याच्या मागें त्याचे बंधु साबाजी व मुधोजी भोसले, सेनाधुरंधर, या उभयतांमध्यें दत्तकासंबंधानें वितुष्ट पडलें. जानोजीच्या मनांत मुधोजीचा

मुलगा रघोजी याला दत्तक घ्यावयाचें होतें; पण 'सेनासाहेबसुभा' हें पद आपणास मिळण्याविषयीं साबाजीची इच्छा फार होती. माधवरावानें रघोजीलाच तें पद दिलें असतें, परंतु त्याच्या मरणापासून पुढें पुणें येथील दरबारांत दुफळी झाली होती. रघुनाथराव व त्याचें मंडळ ह्यांचा, नारायणराव व त्याचें कारभारीमंडळ यांशीं, बेबनाव झाला होता. यामुळें रघुनाथरावाच्या पक्षाच्या मुधोजी भोसल्यास पेशव्याचें पाठबळ नाहींसें होऊन, नारायणरावानें 'सेनासाहेबसुभा' हें पद साबाजीस दिलें. यामुळें मुधोजी व साबाजी युद्धास तयार झाले. साबाजीला पेशवे व निजाम यांची मदत होती, व मुधोजीला राघोबादादाचें आंतून साहाय्य होतें. हें प्रकरण निकरावर ठेपलें, इतक्यांत एकाएकीं नववयस्क पेशवे नारायणराव, यांच्या भयंकर खुनाची बातमी चोहोंकडे पसरली, व या विलक्षण अमानुष कृत्याकडे हिंदुस्थानचे डोळे लागले.

राघोबादादा ऊर्फ रघुनाथराव हा पुरुष मोठा शूर सरदार होता, हें त्याच्या शत्रूंसही कबूल करणें भाग होतें. परंतु तो जितका तरवारबहाद्दर होता, तितकाच व्यवहारशून्य, मंदबुद्धि व स्त्रीलंपट होता कोणत्याही राष्ट्राच्या अवनतीस प्रारंभ होण्यास अनेक कारणें असतात; परंतु कांहीं प्रसंगांनीं एकटाच मनुष्य त्या राष्ट्राच्या दुर्दशेस प्रत्यक्ष कारण होतो. त्याप्रमाणेंच रघुनाथरावाची कथा आहे. पेशव्यांच्या घराण्यात त्याच्यामुळेंच प्रथम कलीचा प्रवेश झाला, असें म्हटलें तरी चालेल. सदाशिवरावानें कारभार सोडून पानिपतचें भारतीय युद्ध करण्याचें मनावर घेण्यास दादाच कारण झाले. पुढें माधवरावाला अनेक वेळा दादांनीं उपद्रव देऊन राज्यस्थितीस व व्यवस्थेस व्यत्यय आणिला. त्यामुळें त्यांना प्रतिबंधांत ठेवणें भाग पडलें; परंतु आपण क्षीण झालों, पुढें

वांचणें कठिण व नारायणराव तर अल्पवयी कोंवळें मूल; त्याच्या हातून दिवसेंदिवस जड होणारा महाराष्ट्रराज्यरूपी शकट हाकणें कठिण होईल, हें लक्षांत आणून मरण्याचे पूर्वीं कांहीं दिवस, माधवरावानें रघुनाथरावास मुक्त करून कारभारांत घेतलें व मरते वेळींही 'नारायणरावाचें मुलाप्रमाणें पालन व रक्षण करीन', असेंही त्याचेकडून अभिवचन घेतलें. माधवरावाच्या मरणापूर्वींच पुढें आपण पेशवा व्हावें म्हणून रघुनाथरावानें निजाम व हैदर याशीं अनुसंधान बांधलें होतें. माधवरावाच्या अगदीं असाध्य अवस्थेंतच त्याचे फितुरी कागद पकडले जाऊन, त्या मसलतींत असणाऱ्या बऱ्याच मंडळींस गडावर वास करावा लागला. पण रघुनाथरावाला क्षमा करणेंच भाग होतें. माधवरावाच्या मागून रीतीप्रमाणें पेशवाईचीं वस्त्रें नारायणरावास आलीं. नंतर कांहीं दिवस चुलतेपुतणे एकविचारानें काम पहात होते. पण रघुनाथरावाची खूपसुरत, परंतु जितकी वरून चा[illegible] तितकीच आंतून दुष्ट अंतःकरणाची स्त्री आनंदीबाई, हिच्या राजकीय मसलती सारख्या चालू होत्या. आपण पेशव्याची बायको म्हणवून घ्यावें, ही महत्त्वाकांक्षा तिला होती. माधवरावाच्या पश्चात् आपले हेतु सिद्धीस जातील, ह्या आशेची, नारायणरावाला पेशवेपद मिळाल्यावर निराशा होऊन, तिला चैन नाहींसें होऊन ती राजकीय उलाढालींच्या मसलतीस लागली. रघुनाथराव तिच्या सौंदर्यास लुब्ध होऊन तिचा गुलाम झाला होता. त्याला तिचें मन मोडवेना व तोही मसलतींत मिळाला. इतक्यांत वर सांगितलेलें भोसले प्रकरण उद्भवलें व त्यांत तर चुलतेपुतण्यांचे वेगळे विचार झाले. रघुनाथरावाच्या एकूण एक मसलती नाना फडणीस वगैरे कारभाऱ्यांस कळत असत. तेव्हां रघुनाथरावाचा कांहीं तरी

बंदोबस्त करणें अवश्य वाटून, माधवरावानें पूर्वीं ज्याप्रमाणें त्यास ठेविलें होतें, त्याप्रमाणेंच पुनः त्यास नजरकैदेंत ठेवण्याची पेशव्यांस कारभाऱ्यांनीं मसलत दिली. त्याप्रमाणें कैदेंत ठेवल्यामुळें तर कलह जास्तच माजला व रघुनाथरावाचे स्नेही भारी मसलतींत पडले. या मसलतींत मुधोजी भोसल्याचे वकील गुंतले होते, इतकेंच नाहीं, तर ज्या गार्द्यांनीं नारायणरावाचा खून केला, त्यांना भोसल्याचे पैशाचें आमिष मिळालें होतें. नारायणरावाचा खून करण्यांत आनंदीबाई दुर्लौकिकास पुढें आली; परंतु आंतन जीं कारस्थानें चाललीं होतीं, त्यांत भोसल्याचे पदरच्या परभू लोकांचें आंग होतें. परभू लोकांचा व पेशव्यांचा कांहीं जातीसंबंधी न्यायावरून द्वेष पडला होता. त्याचा सूड उगवण्यामध्यें त्यांनीं आनंदीबाईस पुढें करून गार्दी मंडळीस आपण फितुर केलें, ही हकीगत तेव्हां पुण्यामध्येंसुद्धां फारशी कोणास समजली नव्हती.

नारायणराव अल्पवयांतच मारला गेल्यामुळें त्याच्या स्वभावाविषयीं मत देणें कठिण आहे. तथापि माधवरावाच्या आंगीं जी धूर्तता व पोंच होता, तीं त्याच्या ठायीं वास करीत नव्हतीं. गोपिकाबाईच्या चिथावणीनें त्यानें रघुनाथरावाची पुष्कळ अमर्यादा केली, ह्यांत संशय नाहीं. त्याचप्रमाणें तो आपल्या तर्फेच्या कारभाऱ्यांशींसुद्धां नीट नसून हलक्या लोकांचे नादीं लागला होता. आपल्या वाड्यांत इतका फितुर झाला आहे, हें नारायणरावाच्या लक्षांतही आलें नाहीं. नारायणरावास कैद करण्याचे मसलतींत मुधोजी भोसल्याचे वकील व सखारामबापू हे मुख्य असून, रघुनाथराव त्यांस अनुकूल होता. हैदरचा वकीलही या मसलतींत होताच. पावसाळ्यांत पुण्यांत फौज शिल्लक नव्हती व

दुसरा अद्यापि दूर होता; तोंपर्यंत मराठी फौज बहुतेक रजेवर असे. ही संधि राखून परदेशी गार्द्यांस तीन लाख रुपये देण्याचें करून पेशव्यास कैद करण्याची मसलत वरील मंडळीनें केली. खुद्द नारायणरावाचे खिजमतगारसुद्धां फितुरांत सामील होते. कांहीं फंदाफितूर आहे, अशी कांहीं दिवस गांवांत गुणगुण होती. परंतु श्रीमंतांचे जिवावरचा प्रसंग आहे, असें कोणाच्याही ध्यानीं नव्हतें; शिवाय माधवराव पेशव्यानें मरणापूर्वी नारायणरावाबद्दल आपल्या चुलत्यास इतकें सांगून ठेवल्यावर, त्याचे हातून असें क्रूर व दुष्ट कृत्य होण्याची शंकासुद्धां कोणाच्या मनांत येईना. शेवटीं अखेरच्या दिवशीं स्वतः नारायणरावास फितुरीची बातमी समजली असतांही तो बंदोबस्ताशिवाय पर्वतीहून वाड्यांत गेला. दुपारची शांत वेळ असून शहरांत चोहोंकडे स्वस्थता पाहून पूर्वसंकेताप्रमाणें, गार्द्यांनीं वाड्यांत अकस्मात् प्रवेश करून अत्यंत क्रूर रीतीनें राघोबाच्या-समोर पेशव्याचा खून केला! हें राक्षसी कृत्य झाल्यावर पुतण्याच्या रक्ताचा टिळा लावून दुष्ट, नीच, कुलांगार रघुनाथराव पेशव्यांच्या गादीवर विराजमान झाला! पेशव्यांची व ब्राह्मणी शहाणपणाची सीमा झाली!!

वि. र. नातू. महादजी शिंद्यांचें चरित्र.

---

## पाठ ११ वा.



### मनुष्यजातीची पूर्णावस्था.

**भाग १ ला.**

जगाच्या प्राचीन व अर्वाचीन इतिहासावर थोडी नजर टाकिली असतां मनुष्यजातीची पूर्णावस्था कोणती, ह्याविषयीं भिन्नकालीं भिन्न मतें होतीं, हें सहज लक्षांत येतें; व हीं अशीं मतें होण्यास त्या त्या वेळची सामाजिक व राजकीय स्थिति कारण होती असेंही दिसून येतें. प्रत्येक देशांत कोणत्या तरी रीतीनें प्राचीन काळापासून जातिभेद हा प्रत्येकाच्या धंद्यापासून उत्पन्न झाला; कोठें धर्मसंबधानें किंवा राजकीयसंबंधानें लोकांची उच्चनीच स्थिति होऊन जातिभेद उत्पन्न झाला. याप्रमाणें निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या रूपांनीं जातिभेद उत्पन्न झाला, व त्याचें अस्तित्व समूळ नाहींसें झालेलें अद्यापिही दिसत नाहीं. तथापि हल्लीं या जातिभेदाचें प्राबल्य युरोप व अमेरिका या खंडांतील बहुतेक देशांत पुष्कळ कमी झालें आहे. आतां जातिभेद जों जों कमी होत आहे, तों तों मनुष्यामध्यें अधिकाधिक समानता वाढत चालली आहे, हें स्पष्टच आहे. परंतु ज्या ठिकाणीं अद्यापि जातिभेदाचें फार प्राबल्य आहे, (उदाहरणार्थ आमचाच देश) तेथें मनुष्यामध्यें समानता कोणत्याही प्रकारें दिसून येत नाहीं. जो ज्या जातींत निपजतो, त्याचे मनांत व आचरणांत आपणामध्यें एकप्रकारची श्रेष्ठता आहे किंवा नीचता आहे, हा विचार सर्वत्र दिसून येतो; आणि त्याचा समूळ उच्छेद करणें विचारवंतासही फार दुर्घट आहे.

आतां जेथें मनुष्याची पदवी व महत्त्व हीं केवळ त्याच्या जन्मावरच अवलंबून असतात, आणि जेथें हीं केवळ त्याच्या उद्योगावर

व गुणांवर अवलंबून असतात, अशा दोन समाजांच्या स्थिति घेऊन, त्यांमध्यें मनुष्यजातीच्या पूर्णावस्थेबद्दल काय मत आहे, हें पाहिलें असतां आपणांस जमीन-अस्मानाचा फरक दिसून येईल; व अशा मतांचा समाजावर केवढा परिणाम साहजिक घडून येत आहे, हेंही आपल्या लक्षांत येईल.

आमच्या सांप्रतच्या सामाजिक स्थितीचें आपण विचारपूर्वक अवलोकन केलें असतां आपणांस असें दिसून येईल कीं, प्रत्येकास असें वाटतें कीं, आपणास अमुक एक धंदेच करितां येतील, व त्यांतूनच आपण एक पसंत केला पाहिजे. कोणी ब्राह्मण असल्यास त्यास वाटतें कीं, जेथें बुद्धीचें व स्वच्छतेचें काम असतें, तेथेंच आपल्या निर्वाहाची सोय करावी; मग प्राप्ति कितीही अल्प असली तरी चालेल. अशा प्रकारचे धंदे सोडून केवळ हमालीचें किंवा कांहीं प्रकारें अमंगळ काम पत्करून आपली प्राप्ति वाढवावी, ही गोष्ट सहसा त्याच्या मनांत येत नाही. याचप्रमाणें मारवाडी, शूद्र, अतिशूद्र इत्यादिकांची स्थिति. आपले जे ठराविक धंदे आहेत, ते सोडून, प्राप्तीच्या, सन्मानाच्या, कीर्तीच्या, किंवा कोणत्याही लालुचीनें मनुष्याचें मन दुसऱ्या धंद्याकडे वळत नाहीं; व जेथें जातिभेद फार प्रबळ, तेथें तर ही स्थिति परिपूर्णपणें दिसून येते. उलट जेथें जातिभेदाचें प्राबल्य कमी होत चाललें आहे, तेथें ही स्थिति पुष्कळ कमी होत चालली आहे. आणि जोंपर्यंत मनुष्यांस परस्परांमध्यें ऐहिक स्थितीत समानता वाटत नाहीं, तोंपर्यंत ही स्थिति कांहींशी तरी कायम राहाणारच.

आतां जातिभेदावर ज्यांची खरी श्रद्धा आहे, अशा लोकांस मनुष्यजातीची पूर्णावस्था कोणती, म्हणून प्रश्न केल्यास, ते काय

उत्तर देतात? त्यांस वाटत असतें कीं, ह्या पूर्णावस्थेचा काळ मागेंच होऊन गेला; निदान त्यांच्या मतें सांप्रतच्या व्यावहारिक रूढींचें जींत अनुसरण होईल, तीच पूर्णावस्था होय. जगाच्या अनिवार क्रमामुळें ज्या अर्थी असें दिसून येतें कीं, कोणतीही रूढि बदलल्यावांचून फार दिवस टिकत नाहीं, व ज्या अर्थी आधुनिक सर्व व्यवहार व राजनीति यांवरून असें दिसतें कीं, मनुष्यजातीचा कल सर्वसाधारण समानतेकडे आहे, त्या अर्थी वरील लोकांस वाटतें की, दिवसानुदिवस मनुष्यजाति भ्रंश पावत आहे, व म्हणून आपली आहे हीच स्थिति उत्कृष्ट; हीहून पुढें सुधारणा होण्याची व पूर्णावस्था येण्याची सर्व आशा व्यर्थ आहे. हा विचार ज्यांच्या मनांत बळकट बिंबला आहे, व याप्रमाणेंच ज्यांचें नित्यशः आचरण चाललें आहे, असे लोक आम्हांमध्यें किती तरी सांपडतील. इंग्रजी विद्येमुळें हल्लीं बहुधा घरोघर नवी पिढी व जुनी पिढी बनली आहे; परंतु जुन्या पिढीच्या मनांत पुढील ऱ्हासकाळची कल्पना इतकी भरून गेली आहे कीं, ते आपण जरी स्वधर्माचें यथेष्ट अनुवर्तन करितात, तथापि नव्या पिढीच्या तरुणांस आपणांप्रमाणें वागविण्याचें स्वाधीन असूनही तसें करीत नाहींत. राजनीतींतही हाच प्रकार दिसून येतो. आपण आहों हीच स्थिति उत्कृष्ट, याप्रमाणें पुढील लोक वागतील तर पुरे आहे, ही कल्पना मनांत धरूनच कीं काय, आमच्या मन्वादि नीतिकारांनीं आपल्या भावी प्रजेस आपल्या समजुतीं-प्रमाणें सर्व आचरणाचे नियम घालून दिले; सर्वांचे हक्क ठरविले; सर्व अपराधांचें शिक्षाप्रमाणही दिलें; व पुढें लोकांस पुनः राज-नीति व आचार ह्यांचा विचारच करावयास नको, इतकी त्यांनीं आपणांकडून तयारी करून ठेविली! आमच्या सामान्य व्यवहारांतही

अशाच प्रकारची वागणूक दिसून येते. पिढ्यांच्या पिढ्या एकच धंदा केलेले किती तरी लोक आम्हांत सांपडतील ! आम्हांमध्यें प्रत्येक मातापितरांस बहुधा वाटत असतें कीं, सर्व प्रकारें आपणांप्रमाणें आपल्या संततीनें कालक्रमण करावें ! देशांत स्थित्यंतर केवढें झालें आहे, ह्याचें त्यांस मुळींच कांहीं वाटत नाहीं. तसेंच, रूढीप्रमाणें सर्वथा चालणें आमच्या लोकांस किती अवश्य व हितकर वाटतें, हें आमच्या घरें बांधण्याच्या तऱ्हेंत, आमच्या पेहेरावांत व आमच्या हरएक कामांत दिसून येतें, असें म्हणण्यास चिंता नाहीं.

याप्रमाणें जेथें जातिभेदावर विशेष श्रद्धा आहे, तेथें आहे ही स्थिति फार उत्तम व पुढें सर्व भ्रष्टता माजणार, पूर्णावस्थेची व सुखाची स्थिति मागें गेली, व ती पुनः येण्याचा संभव कमी, इत्यादि विचारां चें अत्यंत प्राबल्य होतें. याप्रमाणें एका स्थितीचें वर्णन झालें.

जातिभेदापासून आमच्या समाजाची व आमच्या मनांची कशी स्थिति झाली आहे, याचें थोडक्यांत वर्णन केलें. त्यावरून वाचकांच्या असें लक्षांत येऊन चुकलें असेल कीं, ज्या वेळीं जातिभेद आम्हांमध्यें फार प्रबल होता, त्या वेळीं म्हणजे गेल्या दोनतीन हजार वर्षांत, आमच्या समाजांत चळवळ किंवा ज्यास हल्लीं आपण सुधारणा म्हणतों, तो प्रकार मुळींच नव्हता. आमच्या पूर्वजांनीं प्राचीन नीतिशास्त्रकारांच्या कायद्यांचें पूर्णपणें अनुसरण केलें, त्यांनीं आचार व रूढि यांचा कधींही अवमान केला नाहीं, व जेथें जेथें प्राचीन लोकांनीं आपलीं मतें व निर्णय दिले आहेत, तेथें तेथें त्यांनीं बहुधा अधिक विचारही केला नाहीं. आमच्या देशांत राजकारणी पुष्कळ उलाढाली झाल्या, व त्यांचा समाजावर बराच परिणाम झाला; परंतु आचारविचारांत व विचार-पद्धतींत इतका थोडा पालट झाला आहे कीं, त्याचें युरोपिअन

लोकांस मोठें आश्चर्य वाटतें. परंतु जर आपण जातिभेदादि आपल्या धर्मप्रणीत व्यवस्थांकडे लक्ष दिलें, तर वरील गोष्ट साहजिकच भासेल. आतां या प्रकारच्या समाजस्थैर्यानें आमचें किती नुकसान झालें आहे, व त्यामुळेंच आपण युरोपियन राष्ट्रांच्या किती मागें राहिलों आहों, ह्याचें विवेचन पुढें करूं. प्रथम युरोपिअन राष्ट्रांत समाजाची काय स्थिति आहे, हें पाहूं.

---

## पाठ १२ वा.



### मनुष्यजातीची पर्णावस्था.

#### भाग २ रा.

युरोपिअन राष्ट्रांमध्यें प्राचीन काळीं दोन मोठीं प्रबळ राष्ट्रें होऊन गेलीं. एक ग्रीसचें व दुसरें रोमचें. या दोन्ही राष्ट्रांत आरंभीं आमच्याप्रमाणेंच एक पौराणिक धर्म होता व देवांची संख्याही आमच्यापेक्षां फारशी लहान नव्हती. परंतु या त्यांच्या धर्मानें जातिभेदासारखा कोणताही भेद मानिला नाहीं; व जरी त्यांचे देव पुष्कळ वेळा पक्षपात करितांना दिसत, तथापि त्यांनीं मनुष्यांमध्यें जन्मतः कोणताही भेद मानिला, असें दिसत नाहीं. राजकारणीं पाहिलें असतांही अशीच स्थिति दिसून येते. वरील दोनही राष्ट्रांत प्रथम एकसत्ताक राज्यें होतीं, व तीं थोडा वेळ टिकून त्यांच्या जागीं लोकसत्ताक राज्यें झालीं. या दोनही कारणांमुळें वरील दोन राष्ट्रांमध्यें सर्व लोकांत समानता उत्पन्न झाली. प्रत्येकास वाटे कीं, आपण जन्मतः कोणाहूनही कमी योग्यतेचे नाहीं; आपले सर्व सामाजिक व राजप्रकरणी हक्क दुसऱ्यांच्या

बरोबरींचे आहेत. नीच-श्रेष्ठ हा भेद केवळ प्रत्येकाच्या गुणांवर अवलंबून राहतो, व श्रेष्ठ स्थिति ही प्रयत्नसाध्य आहे. ह्या सर्वसाधारण समानतेचे तत्त्वास वरील राष्ट्रांत ख्रिस्ती धर्माची जेव्हां प्रवृत्ति झाली, त्या वेळीं पुनः बळकटी आली; व तेव्हांपासून सर्व युरोपिअन व अमेरिकन ख्रिस्ती राष्ट्रांत जन्मतः सर्व जण सारखे, हा विश्वास सर्वांच्या अंतःकरणांत खिळून गेला आहे.

हें सर्व समानतेचें तत्त्व युरोपिअन राष्ट्रांमध्यें कोणच्या प्रकारें लोकांच्या बहुतेक सर्व चळवळींस, सुधारणेस व उन्नतीस कारण झालें, हें आतां पाहूं. रोमच्या अति विस्तृत राज्याचा जेव्हां रानटी लोकांनीं विध्वंस केला, त्या वेळीं सर्वत्र अज्ञान पसरलें व पूर्वींच्या रोम व ग्रीस या राष्ट्रांचे इतिहासही लोक विसरले. मग राज्यक्रांतीमुळें व अज्ञानामुळें लोकांत जातिभेद व देवभोळेपणा उत्पन्न झाला. परंतु तो फार दिवस टिकण्याचा संभवच नव्हता. पूर्वींच्या रोमन व ग्रीक भाषांचें अध्ययन जेव्हां सुरू झालें, व त्यामुळें पूर्वींच्या राजनीतीवर व धर्मतत्त्वांवर जेव्हां प्रकाश पडला, त्या वेळीं लोकांची विचारसरणी एकदम बदलून लोकांच्या मनांत सर्वांच्या साम्याचे विचार एकदम जागृत झाले. असें होतांच धर्मसंबंधी पोपाच्या माहात्म्याचा विचारवंत लोकांस वीट येऊन लूथरसारखे लोक पुढें आले, व त्यांनीं जीविताचीही पर्वा न बाळगून धर्माची सुधारणा केली. पुढें जातिभेद काय तो राजे लोक व बडे लोक हेमात्र आपणांमध्यें व इतर लोकांत मानीत असत. परंतु लोकांत ज्ञानवृद्धि जसजशी होऊं लागली, तसतसा हाही भेद त्यांस असह्य होत चालला. तेव्हां व्हाल्टेअर व रूसो असे लोक पुढें सरसावून त्यांनीं वरच्या प्रकारच्या जातिभेदाचा सर्व लोकांमध्यें अत्यंत

द्वेष उत्पन्न केला; व त्या योगानें फ्रान्समध्यें मोठा प्रचंड दंगा उत्पन्न होऊन, लोकांनीं फ्रान्सच्या राजकुलाचा अगदीं बीमोड केला; जे आपणांस बडे लोक समजत असत, अशा बहुतेकांचा त्यांनीं गिलो-टीन नामक यंत्रानें शिरच्छेद केला व ज्या ज्या राष्ट्रांत वरील दोन लोकांचें प्राबल्य होतें, त्यांमध्यें मोठी दहशत पाडिली, आणि लोकसत्ताक राज्याचा पाया घातला. त्या वेळीं फ्रेंच लोकांची या मानवी साम्याच्या तत्त्वावर इतकी श्रद्धा बसली होती कीं, त्यांस कोणताही देश, राजे लोकांच्या व धर्माध्यक्षाच्या प्राबल्याखालीं सुखी होणार नाही म्हणून वाटत होतें, व त्याप्रमाणें, होईल तर, सर्व भूमंडळावरून या लोकांचीं पाळेंमुळें खणून टाकून लोकसत्ताक राज्याची स्थापना करावी, असा त्यांचा निर्धार झाला होता. आतां ही गोष्ट त्यांच्या हातून झाली नाहीं, यांत मोठें आश्चर्य नाहीं; परंतु त्या दिवसापासून युरोपिअन राष्ट्रांची लोकसत्ताक राज्याकडे प्रवृत्ति आहे, ही गोष्ट वरील फ्रेंच लोकांच्या धामधुमीचाच कांहीं अंशीं परिणाम आहे. हल्लीं युरोपिअन व अमेरिकन लोकांमध्यें मनुष्यांत जितकी साम्यबुद्धि आहे, तितकी जगांत नसेल. तीमुळें धर्मांत व राज्यकारस्थानांत पुष्कळ सुधारणा झाली व लोकांस आपले हक्क कळूं लागले, हें वरील लेखावरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल.

आतां सामाजिक स्थितीवर या साम्यबुद्धीचा काय परिणाम झाला, तें सांगितलें पाहिजे.

जेथें जातिभेदावर मनुष्यांची श्रद्धा असते, तेथें स्वभावतःच लोकांस वाटत असतें कीं, ज्या स्थितींत आपण जन्मलों तीच स्थिति आपली पूर्णावस्था, तीहून श्रेष्ठतेस येणें अगदीं अशक्य, इत्यादि. ही स्थिति वर वर्णन केली आहे. जेथें मनुष्यास जन्मतः

सर्वांमध्यें साम्य वाटत असतें, तेथें याहून फार भिन्न स्थिति असते. कोणासही, आपण आहों हीच आपली पूर्णावस्था, असें भासत नाहीं. आपणांमध्यें व आपल्या स्थितीमध्यें पुष्कळ सुधारणा होण्यास अद्याप जागा आहे, असें प्रत्येकास वाटतें; व त्यास ती करण्यास पुष्कळ उमेद असते. अशा समाजांत, आपले पूर्वज आपणांहून शहाणे व श्रेष्ठ होते, हा समज बहुधा नाहींसा होतो; उलट आपणच त्यांहून पुष्कळ अंशीं शहाणे, असा लोकाचा समज होतो; व पुढील पिढ्या उत्तरोत्तर अधिकाधिक शहाण्या व श्रेष्ठ निपजतील, अशी त्यांची खात्री असते; व या शहाणपणाची व श्रेष्ठत्वाची पूर्णावस्था केव्हां होईल, ह्याची त्यांस कल्पनाच करितां येत नाही. अशी त्यांची समजूत होण्याचें मुख्य कारण असें कीं, त्यांस वाटतें कीं, ज्ञान हे अनुभवानें प्राप्त होतें. प्रत्येक पिढी आपला अनुभव मागील लोकांच्या अनुभवास मिळवीत असते, व त्यामुळें ती त्या लोकांहून अधिक शहाणी साहजिकच होते. जे लोक दोनतीन हजार वर्षांपूर्वीं जन्मले, त्यांना सर्व प्रकारें आपणांहून कमी अनुभव असला पाहिजे, व त्या मानानें त्यांचे विचार कोते व त्यांचीं सुखसाधने कमी असलीं पाहिजेत. मुलांच्या बुद्धीपेक्षां वृद्धांच्या बुद्धीस आपण अधिक मान देतों; याचें कारण मुलांचा अनुभव कमी व वृद्धांचा अधिक; एकानें जगाच्या रहाटीचा अनुभव दहापांच वर्षें घेतला असतो, व दुसऱ्यानें पन्नाससाठ वर्षें घेतला असतो. तसेंच जे लोक या पिढींत जन्मले आहेत, व ज्यांनीं सांप्रतच्या विद्येचें व ज्ञानाचें परिसेवन केलें आहे, ते दोन हजार वर्षांपूर्वीं जन्मलेल्या मोठ्या विद्वानांहून वृद्ध होत. त्यांच्याशीं तुलना केली असतां प्राचीन लोक केवळ सृष्टिक्रमांतील बालकें समजलीं पाहिजेत. ह्या समजुतीला

जगाच्या व मुख्यत्वेंकरून युरोपच्या इतिहासानें दृढता येते. पहा कीं, हल्लींचें युरोप गेल्या शतकाच्या युरोपापेक्षां शहाणें आहे. हल्लीं युरोपांत ज्या नानाविध कला चालल्या आहेत, त्यांचा शतांशही गेल्या शतकांत नव्हता. वाफेच्या व विजेच्या योगानें हल्लीं मनुष्यजातीस जी मदत होत आहे व मनुष्यांचीं जीं सुखसाधनें वाढत आहेत, तीं अंशतःहीं त्या वेळीं नव्हती. अठराव्या शतकाच्या मागें आणखी एक शतक गेलें, तर त्या वेळीं धर्मासंबंधी व राज्यकारस्थानासंबंधीं लोकांचे विचार आपणांस फारच कोते होतेसे भासतील. परस्परप्रीति लोकांच्या हृदयांत त्या वेळीं फारच थोडी वागत होती; व सृष्टिशास्त्राची त्या वेळीं लोकांस क्वचित्च अभिरुचि होती. त्याच्याही मागें आणखी दोनचार शतकें गेलें, तर उत्तरोत्तर आपणांस निकृष्टावस्थाच दिसून येईल. हल्लीं जें ज्ञानप्रसाराचं मोठें साधन, म्हणजे मुद्रणकला, ती लोकांस त्या वेळीं अवगत नव्हती. लेखनवाचनादि साधारण गोष्टी त्या वेळीं हजारांत एखाद्यास येत होत्या. देवभोळेपणा तर इतका माजला होता कीं, त्या वेळच्या पोपांनीं नुसत्या भाकडकथा सांगून लाखों रुपये लोकांपासून उपटावे, व राजेलोकांसही धर्मभीतीनें बर्फांत उघडें उभें करावें.

याप्रमाणें ज्या ज्या राष्ट्राचा खरा इतिहास उपलब्ध आहे, तेथें तेथें ऐतिहासिक काळांत तरी मनुष्य उत्तरोत्तर सुधारणा पावत आहे, असें स्पष्ट दिसून येतें; व युरोपिअन समाजांत वरतीं सांगितलेली समजूत दृढ होत आहे. या समजुतीनें त्यांचे सुधारणेकडे सदोदित प्रयत्न चालले आहेत. सर्व शास्त्रांत नवीन शोध सुरू आहेत. सर्व कलांत नवीन युक्त्या काढून मानवी श्रमांची आवश्यकता कमी करून, भौतिक शक्तींचा उपयोग कर-

ण्याची खटपट सुरू आहे. रितीभाती, पोषाख, घरबांधणी, राज्यकारस्थान वगैरे कोणत्याही गोष्टींत स्थैर्य व तटस्थता हीं आपणांस आढळणार नाहींत; निरंतर उत्तरोत्तर सुधारणा व उत्कर्ष यांवर त्यांची दृष्टि लागली आहे. आपण पूर्णावस्थेला आलों किंवा सर्व ज्ञानसंपादनाची व सुधारणेची सीमा होऊन कधीं तरी आपण मानवी ऐहिक पूर्णावस्थेस येऊं, हें बहुधा त्यांस अशक्य वाटतें. या त्यांच्या समजुतीनें युरोपिअन व अमेरिकन लोकांमध्यें किती परिश्रम, किती उद्योग, किती धाडस व किती घडामोड सुरू आहे, ह्याची प्रत्यक्ष पाहिल्यावांचून आमच्यानें कल्पनाही करवत नाहीं; त्यांच्या प्रकाशांत आमचे डोळे अगदीं दिपून जातात, व आमची शोचनीय स्थिति पाहून आम्हांस खिन्नता येते.

गो० ग० आगरकर. के० नि० निबंध.

---

## पाठ १२ वा.



## पंत आपलें कार्य करून गेले!

मोरोपंतांनीं आमरण विद्याव्यासंग सतत चालवून भगवत्सेवा केली; 'फाटका संसार विवेकानें नेटका करून' पंचवीसतीस माणसांचें संगोपन केलें; संसाराचें लोढणें गळ्यांत वागवून पाऊण लाख मराठी कविता निर्माण केली, व देशभाषावैभव अपार वाढविलें; विनय, प्रेमळपणा, सदाचार इत्यादि सद्गुणांनी संसर्गीजनांस मोहवून सच्छीलाचें पोषण केलें; 'प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो ज्यानें केला, तो नर भला भला', या साधूक्तीप्रमाणें वागून इहपरलोक साधले; व स्वतःस, स्वतांच्या कुळास व स्वदेशास धन्यता आणली.

पूर्ववयांत योजलेले सर्व संकल्प त्यांनीं भगवत्कृपेनें सिद्धीस नेले. 'भगवंत व भगवज्जन यांचे गुणानुवाद गाण्यांत चतुर रसिकानें आयुष्य घालवावें', असें त्यांनी २७ व्या वर्षी एका काव्यांत म्हटल्याप्रमाणें त्यांनी आपलें उद्दिष्ट सिद्धीस नेलें. पुष्कळ तरुण तारुण्याच्या ऐन भरांत हवे तितके सत्संकल्प करितात, पण संसाराच्या ज्वाला अंगाला लागूं लागल्या की, त्यांचे ते संकल्प मनांतल्या मनांत जिरून जातात, व भवचक्रांत सांपडून 'तुका म्हणे काय वायांविण धिंद। पती ना गोविंद दोन्हीं नाहीं', या साधुवचनाप्रमाणें धड प्रपंचही हातीं लागत नाही, व धड परमार्थही साधत नाही, अशी त्यांची स्थिति होऊन जाते. एक उद्दिष्ट मनांत जागृत ठेवून त्याच्या सुकाणूप्रमाणें आयुष्याची नौका हाकारीत राहण्यास मनाचा खंबीरपणा लागतो, धैर्य लागतें, विषयसुखलालसा जिंकावी लागते, एकनिष्ठता लागते, परमेश्वरावर दृढविश्वास असावा लागतो व पूर्वपुण्य पदरी असावें लागतें. आपल्या आयुष्याचें अंतिम निश्चित ठरवून 'शेंडी तुटो कीं पारंबी तुटो' अशा निग्रहानें जे त्याच्या सिद्धीसाठीं कायावाचामनें अहर्निश झटतात, तेच वीरपुरुष होत. अशा पुरुषांत कोणी धर्मवीर असतात, कोणी युद्धवीर असतात व कोणी भाषावीर असतात. शिवाजी व रामदास हे धर्मवीर, बाजीराव व झांशीची राणी हे युद्धवीर, व वामन व मोरोपंत हे भाषावीर होत! महाराष्ट्रभाषेची योग्यता मोरोपंत जन्मास आले तेव्हां जी होती, तीपेक्षां ते आटोपले तेव्हां ती किती तरी वाढली. नानाप्रकारच्या अक्षरगणवृत्तांत व मात्रावृत्तांत सयमक, निर्दोष व मनोहर अशी विविध विषयावर पाऊणलाख कविता निर्माण करून त्यांनी मराठी भाषेला संस्कृत किंवा अभियुक्त भाषेच्या पदवीस चढविलें, हा त्यांनीं मोठा पराक्रम केला. 'जरि हा मयूर नाहीं, तरि लोकांना न दीसती आर्या',

हा या भाषावीराची गर्जना सर्वथा खरी आहे. 'मी जर जन्मास आलों नसतों, तर अमुक लोककार्य झालें नसतें', असें ज्याला वाटतें, तोच धन्य होय. असो. पंतांनीं महाभारत, रामायण, व भागवत हे ग्रंथ व त्यांतील शेंकडों आख्यानें व उपाख्यानें मराठी भाषेंत आणलीं, तीर्थक्षेत्रांवर व संतांवर हजारों आर्या केल्या, व कित्येक कमालीचीं सुंदर अशी स्वतंत्र स्तोत्रें व लघुकाव्यें रचून अखेर आपल्या काव्यशक्तीचें सर्वस्व वेंचून केकावलीसारखें जगत्तोष-कर व परममनोहर दिव्य काव्य निर्माण केलें. सामान्यतः असा नियम आहे कीं, परमेश्वर ज्याच्या अंगात जे लोकोत्तर गुण ठेवितो, त्या सर्व गुणांचा उत्कृष्ट परिपाक त्याच्या ज्या कृतीत होतो, त्या कृतीनंतर त्याला फार दिवस तो मृत्युलोकीं ठेवीत नाहीं ! परिपक्व झालेलें अमृतफल या मानवांना न देतां तो स्वतःच घेऊन जातो ! ज्याच्याकडून जें कार्य परमेश्वराला करावयाचें असतें, त्याच्या हातून तें कार्य होण्यापुरती दिव्य गुणांची सामुग्री त्याला देऊन त्या गुणांच्या उत्कृष्टत्वात तें कार्य त्याच्याकडून तो करवितो व लागलेंच त्याला आपल्या स्वरूपांत नित्य विश्रांतीचें स्थान देतो.

पंतानीं हें केकावली स्तोत्र अखेर रचिलें व रामरूप होऊन जडदेहाचें विसर्जन केलें. केकावलीनंतर पंतांना साक्षात्कार झाला व ते रामरूप झाले, अशी जुन्या लोकांनही प्रसिद्धि आहे. पंतांनीं जन्मादारभ्य भगवत्सेवा केली. त्यांची काव्यरचना हें त्यांचें बाह्यरूप होय; रामपरता हें त्यांचें अंतःस्वरूप होय. पंत मुख्यतः भगवद्भक्त होते. त्यांनीं काव्यरचना केली, ती भक्तिभावाच्या दृढतेसाठीं केली. पूर्ववयांतल्या कांहीं काव्यांत कोठें कोठें कीर्तिलालसा व स्वाभिमान प्रकट झाला आहे; पण मंत्रभागवत व केकावली यांच्या रचनाकालींच त्यांचा अवशिष्ट सात्त्विक अहंभावही लयाला गेला, व नंतर ते

'मिसळे जसें नभ नभीं, कीं तेजीं तेज, तोय तोयांत', याप्रमाणें रामरूपांत मिसळून गेले, व संसारपाशांतून मुक्त झाले.

शके १७१६ चा चैत्रमास उगवला. नित्याप्रमाणें पंतांनीं रामनवमीचा उत्सव स्वगृहीं हर्षनिर्भर होऊन केला. रामनवमीचें पारणें दशमीस सुटलें, व एकादशीच्या दिवशीं पंतांना ताप आला. तो द्वादशीस पुष्कळ वाढला. आपला अवसानसमय जवळ येऊन ठेपला आहे, असें पंतांस वाटलें. पंतांचें सर्व गणगोत जमा झालें. पंतांनीं सर्वांस अखेरचा निरोप सांगितला, निरवानिरव केली, 'मरणसमयीं कोणी भोंवती जमून रडारड करूं नका; उलट आनंदानें रामनामाचा गजर चालू द्या', असें आप्तेष्टांस बजाविलें, व 'प्रांतप्रार्थना' म्हणून अगदीं अखेरचें १७ आर्यांचें अत्यंत हृदयद्रावक असें काव्य केलें. या 'प्रांतप्रार्थनेंत' पंतांचा उदार भाव प्रकट झाला असून गोमाता, भूमाता, तुळस, गंगा, रामनाम, भक्तजन, आप्तजन, यांना त्यांनीं करुणरवानें विनविलें आहे, त्यांनी जन्मभर केलेल्या उपकारांचें प्रेमपूर्वक स्मरण केलें आहे !

× × ×

चैत्री पौर्णिमेच्या दिवशी म्हणजे हनुमज्जन्माच्या मंगल दिवशीं पंत रामरूप झाले. रामभक्त मारुतीच्या जन्मकाळीं रामनामाचा जयघोष सर्वत्र चालला असतांच रामभक्त मोरोपंत रामरूप झाले, हें योग्यच झालें. भक्तांचा अंतही गोडच व्हावयाचा. मंगलाचें मंगल असें जें रामरूप त्याचा निरंतर ध्यास करणारें चित्तही मंगलांतच लीन होऊन जातें. मग तो समयही मंगलच कसा असणार नाहीं ? मोरोपंत शके १७१६ च्या चैत्र शुद्ध पौर्णिमेस मंगळवारीं हनुमज्जयन्तीच्या पर्वणीवर मंगलरूप झाले. रामनामाचा साद घालीत पंतांनीं देह ठेविला. गीर्वाणसागरांतून आपल्या अतर्क्य बुद्धिप्रभावानें

या मयूरमेघानें काव्यामृत शोषून त्याचा काठिण्यक्षार नाहींसा करून महाराष्ट्रभूमीवर पेयामृताचा वर्षाव सतत चाळीस वर्षे केला, व नश्वर झालेला नश्वर देह ठेविला. पंत आपलें कार्य करून गेले. पुण्यबलानें त्यांचे सत्संकल्प सिद्धीस गेले.

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर. मोरोपंत,—चरित्र व काव्यविवेचन.

---

# पाठ १४ वा.



## पंत व पंडित.

मोरोपंत व वामनपंडित हे दोघेही जाडे पंडित होते. दोघेही संस्कृतभाषेंत निष्णात होते. दोघांसही मराठी भाषेचा अभिमान होता व दोघांनींही भारतभागवतांतलीं स्फुट आख्यानें सोप्या व सरळ मराठी भाषेंत वर्णिलीं आहेत. वामनाचा श्लोक व मोरोपंताची आर्या सर्वत्र सारखी गाजलीं आहेत. अनेक मात्रागणवृत्तांत यमकप्रासादि शब्दचमत्कार साधून आपलीं काव्यें दोघांनींही रचिलीं आहेत. सगुणोपासनेवर दोघांचाही भर आहे. पंडित कृष्णभक्त होते व 'भागवतधर्मानुयायास जी गति मिळते, ती मला मिळाली आहे', असें ते सांगतात; पंत रामभक्त होते, व 'रामचरणपद्मप्रसाद मजवर झाला आहे', असें तेही सांगतात ! असें आहे, तरी दोघांनींही 'वाङ्मन पूत कराया' काव्यरचना केली आहे. दोघांचेंही बुद्धिवैभव सारखें असून दोघांचीही ग्रंथसंपत्ति पुष्कळ आहे. मराठी भाषेवर संस्कृतांतले अलंकार चढवून तिला अभियुक्तता आणण्याचें श्रेय दोघांसही आहे. वामनी श्लोक व मोरोपंती आर्या हरिदासांस सारख्याच प्रिय झाल्या आहेत; व रसिकांनीं पंतपंडितांस एका सिंहासनावर शेजारीं शेजारीं बसविलें आहे !

पंतपंडितांतलें हें सादृश्य जसें उघड आहे, तसें त्यांच्यांतलें वैसादृश्यही उघड आहे. पंडितांचा भर अध्यात्मविषयावर जास्त आहे. त्यांची यथार्थदीपिका, निगमसार, ब्रह्मस्तुति, कर्मतत्त्व वगैरे ग्रंथ लोकमान्य झालेले आहेत. पंडितांना वेदान्ताची म्हणजे आत्मविद्येची गोडी परमावधीची असल्यामुळें ते वर्ण्य विषयाशी केवळ तादात्म्य पावतात. वेदान्तासारखा रूक्ष वाटणारा विषय सोपा करण्यासाठीं त्यांनी भाषाही फार सरळ व सोपी घातली आहे. केवळ आध्यात्मपर असा पंतांचा एकही ग्रंथ नाहीं; पण इतिहासपुराणग्रंथांत पंतांची बुद्धि जशी दिव्य दिसते, तशी पंडितांची दिसत नाहीं. [illegible] ग्रथांत पंतांची प्रतिभा जशी चमकते, तशी इतर ग्रंथांत फारशी चमकत नाही. यामुळेंच पंतांना सुसंगत कथानकें वर्णन करितांना स्वभाववैचित्र्य हृदयंगमपणें जसें दाखवितां येतें, तसें तें पंडितांना येत नाहीं पंडित नांवाप्रमाणें पंडित होते; म्हणजे न्यायमीमांसादि शास्त्रांत त्यांचा हात धरणारा पुरुष त्यांचे काळीं साऱ्या भरतखंडांत कोणी नव्हता. वेदार्थ यथार्थ जाणणारा, अनेक मतवाद्यांचे ग्रंथ उत्तम तऱ्हेने समजणारा, वेदांतविषय सुलभतेनें प्रतिपादन करणारा वामनासारखा महापंडित मराठी भाषेला दुसरा कोणी लाभलेला नाही. मोरोपंतांनी वामनाप्रमाणें वेदांचें व षट्शास्त्राचें अध्ययन केलेलें नव्हतें;तरी साहित्यशास्त्रांत पंत परमनिपुण होते. यामुळें पंतांनी जितक्या वृत्तांचा व रसांचा अवलंब केला, तितक्या वृत्तांचा व रसाचा पंडितांनीं केला नाही. निरनिराळ्या रसांची पोषक अशीं वृत्तें योग्य प्रसंगीं योजण्याचें चातुर्य पंतांत आहे; अनेक प्रकारच्या अलंकारांची गर्दी पंतांनीं आपल्या काव्यांत उडवून दिली आहे; व विलक्षण कल्पनाचातुर्यानें संशयरत्नमाला, सन्मनोरथराजि, केकावलि वगैरे

काव्यें परमावधीचीं मधुर व आल्हादप्रद करून सोडिलीं आहेत. अशी चमत्कारिक कल्पना प्रसविण्याची शक्ति मोरोपंतांसारखी पंडितांत दिसत नाहीं. तरी कांहीं पंडित, 'वामनांत रसिकताच नव्हती, व तो रूक्ष वेदान्ती होता,' असें म्हणतात. तेंमात्र खरें नाहीं. अत्यंत कोमल कल्पनांशीं पंत खेळत, तसे वेदान्तविचारांशीं पंडित खेळत; पण प्रसंगीं पंडितानींही लोकोत्तर रसिकता प्रकट केली आहे. त्यानीं शृंगारपर विषयावर राधाविलास, भामाविलास, व रुक्मिणीविलास अशीं तीन लहान काव्यें केलीं आहेत; तीं व द्वारकाविजय, वेणुसुधा, भीष्मयुद्ध व भरतभाव हीं चार, अशी सात काव्यें त्यांनीं फारच सरस केली आहेत. ही सात काव्यें वाचणाऱ्यांस पंडितांच्या भाषेंतही रसवत्ता चांगली दिसून येईल. राधाविलासांत शृंगार जरा जास्त झाला आहे; हा नसता तर बरें झालें असतें. पण एवढ्यावरून प्रो० श्रीधरपंत परांजपे वामनास 'रंगेल' म्हणतात, हीमात्र अती मोठी चूक आहे. वामनासारख्या श्रेष्ठ कृष्णभक्तास व आत्मविचारांत सर्वदा निमग्न असणाऱ्या भागवतास 'रंगेल' हें विशेषण लावणें मोठ्या अरसिकतेचें लक्षण आहे! पडितांचा भामाविलास तर मराठींतल्या अत्यंत सरस काव्यांपैकीं एक आहे. पंडिताच्या भाषेंत विलक्षण माधुर्य व प्रसाद आहे. पंतांनीं भाषेच्या ठाकठिकीकडे लक्ष दिलें आहे, तसें पंडितानी दिलें नाहीं. यामुळें छंदोभंग, यतिभंग, च्युतसंस्कृति वगैरे दोष त्यांच्या कवितेंत फार आढळतात, व संस्कृतकविता वाचणाऱ्या रसिकाच्या कानाला ती जरा कठोर लागते. पंडित महाविद्वान् असूनही त्यांनीं व्याकरणशुद्धीकडे लक्ष दिलें नाही, याचें कारण ते नेहमी वर्ण्यवस्तूशीं तादात्म्य पावत. पंतांची व्याकरणशुद्धता सर्वमान्य आहेच, व प्रसाद आणि माधुर्य हेही गुण त्यांच्या कवितेंत आहेत; तरी पंडितांच्या

कवितेंतला प्रसाद पंतांपेक्षांही कधीं कधीं अधिक आल्हादकारक असतो. पंडितांचा आणखी एक लोकोत्तर गुण सांगावयाचा आहे. भाषांतर करण्याची कला पंडितांसारखी आजवर कोणासही साधली नाहीं. भगवद्गीतेची समश्लोकी, गंगालहरी, भर्तृहरीच्या शतकत्रयाचीं भाषांतरें ही इतकी उत्तम साधलीं आहेत की, मूळ व वामनी श्लोक जवळ टेवून बारकाईनें पाहिल्यास मूळ कोणतें व भाषांतर कोणतें, हेंही कळण्यास मारामार पडेल! समश्लोकांत, मूलार्थाला धक्का न लावतां, भाषांतर करणें किती कठिण आहे, याची कल्पनाही कित्येकांस येणार नाही. भाषांतर करावें वामनानेंच. मूळांतला सगळा अर्थ—भाषा अत्यंत सोपी, सरळ व मोहक योजून—अन्य भाषेंत आणणें म्हणजे अत्यंत कौशल्याचें काम आहे, व या कामी वामनाच्या तोडीला कोणीही बसणार नाही. वामनाला शांतरस फारच सुरेख साधला आहे. क्वचित् शृंगार व वत्सल या दोन रसांची छटा आहे. पंतानीं बहुतेक सारे रस चांगले साधले आहेत. पंडित व पंत उभयतांही भगवद्गुणवर्णनांत तल्लीन होतात, दोघेही मोठेच [illegible] आहेत; पण स्वानुभवाच्या दृष्टीनें पंडितांची पायरी पंतांच्या वरची दिसते. पंडितांचा पूर्ववयांतला मद पार उतरून गेल्यावरचीच त्यांची काव्यरचना आहे, तरी पंतांइतके ते कधींही वांकले नाहीत. रसिकतेचा उत्कर्ष जसा पंतांत दिसतो, तसा पांडित्याचा उत्कर्ष पंडितांत दिसतो पंतांनीं इतक्या कवींवर व संतांवर आर्या केल्या, पण कोणावरही व कोठेंही चुकूनसुद्धां दोषारोपाचा भासही होऊं दिला नाहीं; व सर्व लहानथोर कवींचा चरणरज आपणांस म्हणवून घेतलें आहे. पंडितांनीं यथार्थदीपिकेंत पुष्कळ गीताटीकाकारांवर प्रहार केले आहेत. 'गीतार्थ अन्यथा वाणी। मज नावडे ती थोरांची वाणी' असें

म्हणून प्रथम सामान्य आक्षेप केले आहेत, व दोनतीन ठिकाणीं ज्ञानेश्वरांचा अर्थ चुकीचा आहे, असें मोघम म्हणून, 'जगीं मिरवोनिया केली सिद्धी। आपल्या टीकेची प्रसिद्धी।' असा गुप्त आक्षेप त्यांजवर केला आहे! ज्ञानेश्वराचा योगाकडे विशेष ओढा होता, पंडितांचा सगुणभक्तीकडे होता. यथार्थदीपिका हा ग्रंथ फारच योग्य आहे, व गीतार्थाचें रहस्य समजून घेण्यास मुमुक्षूंनीं त्याचीच प्रथम कास धरावी. माधुर्य, प्रसाद, ओज, कोमलता, हे गुण सामान्यतः दोघांच्याही काव्यात आहेत. एकंदरींत पंत व पंडित यापैकीं श्रेष्ठ कोण, हें ठरविणें फार कठिण आहे. महाराष्ट्र-काव्योदधींतली ही दोनही अत्यंत तेजस्वी अशी मौक्तिकें आहेत, एवढें-मात्र खरें!

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर. मोरोपंत,—चरित्र व काव्यविवेचन.

---

## पाठ १५ वा.



### ग्रंथतात्पर्यनिर्णय.

ग्रंथ, प्रकरण किंवा वाक्ये यांचा अर्थ-निर्णय करण्याच्या कामांत अत्यंत कुशल जे मीमांसक त्यांचा या (ग्रंथतात्पर्य-निर्णयाचे) बाबतीत सर्वांस मान्य असलेला खालीं लिहिल्याप्रमाणें एक जुना श्लोक आहे:—

> उपक्रमोपसंहारौ अभ्यासोऽपूर्वता फलम्।
> अर्थवादोपपत्ती च लिंगं तात्पर्यनिर्णये॥

मीमांसक म्हणतात कीं, कोणत्याही लेखाचें, प्रकरणाचें किंवा ग्रंथाचें तात्पर्य काढणें असल्यास वरील श्लोकात सांगितलेल्या सात गोष्टी साधनीभूत (लिंग) असून त्या सातही गोष्टींचा विचार

अवश्य केला पाहिजे. पैकीं, 'उपक्रमोपसंहारौ' म्हणजे ग्रंथाचा आरंभ व शेवट या पहिल्या दोन गोष्टी होत. कोणीही झाला, तरी तो मनामध्यें कांहीं विशिष्ट हेतु धरून ग्रंथ लिहिण्यास सुरुवात करितो; आणि सदर विशिष्ट उद्देश सिद्ध झाल्यावर ग्रंथ समाप्त करितो. म्हणून ग्रंथाचा उपक्रम आणि उपसंहार ग्रंथतात्पर्यनिर्णयाचे कामीं प्रथम लक्षांत घेतले पाहिजेत. सरळ रेघेची व्याख्या देताना भूमितिशास्त्रांत असें सांगतात की, आरंभींच्या बिंदूपासून जी रेघ डाव्याउजव्या बाजूस किंवा खालींवर न कलतां शेवटच्या बिंदूपर्यंत नीट जाते, तिला सरळ रेघ म्हणावें. ग्रंथाच्या तात्पर्यास हाच न्याय लागू आहे. जें तात्पर्य ग्रंथाचा आरंभ आणि शेवट यांस न सोडितां या दोन टोंकांमध्यें नीट बसतें, तेंच त्या ग्रंथाचें सरळ तात्पर्य होय. प्रारंभापासून शेवटापर्यंत जाण्यास दुसऱ्या वाटा असल्या, तर त्या सर्व वांकड्या किंवा आडवाटा समजल्या पाहिजेत. आद्यन्त पाहून अशा रीतीने ग्रंथाचें तात्पर्य काय, याची दिशा प्रथम निश्चित केल्यावर त्या ग्रंथांत 'अभ्यास' म्हणजे पुनरुक्ति किंवा वारंवार काय सांगितलें आहे, तें पाहावें. कारण, ग्रंथकाराच्या मनांत जी गोष्ट सिद्ध करावयाची असते, तिच्या समर्थनार्थ तो अनेक वेळी अनेक कारणे दाखवून दर वेळीं, "म्हणून ही गोष्ट सिद्ध झाली." किंवा, "म्हणून अमुक केलें पाहिजे." असा पुनः पुनः एकच निश्चित सिद्धान्त सागत असतो. ग्रंथतात्पर्य काढण्याचें चौथें व पांचवें अशीं साधनें 'अपूर्वता' आणि 'फल' हीं होत. 'अपूर्वता' म्हणजे नवेपणा. कोणताही ग्रंथकार आपणास कांहीं नवे सागणें असल्याखेरीज प्रायः नवीन ग्रंथ लिहिण्यास प्रवृत्त होत नाहीं; निदान छापखाने नव्हते, तेव्हां तरी होत नसे. म्हणून एखाद्या ग्रंथाचें तात्पर्य ठरविण्यापूर्वीं त्या ग्रंथांत अपूर्वाई, वैशिष्ट्य,

किंवा नवेपणा काय आहे, हें पाहावें लागतें. तसेंच, त्या लेखाचें अगर ग्रंथाचें कांहीं फल, अर्थात् त्या लेखामुळें अगर ग्रंथामुळें कांहीं परिणाम घडून आला असल्यास तो कोणता, इकडेही लक्ष पुरविलें पाहिजे. कारण, हें फल मिळावें किंवा व्हावें, या हेतूनेंच ग्रंथ लिहिला असल्यामुळें घडलेल्या परिणामावरून ग्रंथकर्त्यांचा आशय अधिक व्यक्त होत असतो. सहावें व सातवें अशीं साधनें 'अर्थवाद' व 'उपपत्ति' हीं होत. 'अर्थवाद' हा मीमांसकांचा पारिभाषिक शब्द आहे. आपणांस मुख्यतः कोणत्या गोष्टीचें विधान करावयाचें, अथवा कोणता मुद्दा सिद्ध करावयाचा हें ठरलेलें असतांही उपपादनाच्या ओघांत दाखल्यासाठीं, तुलना करून एकवाक्यता करण्यास, अगर साम्य व भेद दाखविण्यास, प्रतिपक्षांतील दोष सांगून स्वपक्षाचें मंडन करण्यास, अलंकारार्थ, अतिशयोक्तीनें, किंवा युक्तिवादाला पोषक म्हणून त्या पक्षाचा पूर्व इतिहास या नात्यानें, अथवा दुसऱ्या कांहीं कारणासाठीं आणि कधीं कधीं कांहीं विशिष्ट कारणावांचूनही, ग्रंथकार दुसऱ्या पुष्कळ गोष्टींचें प्रसंगानुसार वर्णन करीत असतो. अशा वेळीं ग्रंथकार जीं वर्णनें करीत असतो, तीं सर्वस्वीं मुद्द्याला सोडून नसलीं, तरी नुसतीं गौरवार्थ, स्पष्टीकरणार्थ, किंवा भरतीसाठीं केलेलीं असल्या-मुळें तीं अक्षरशः नेहमींच खरीं असतील, असा नेम नाहीं.[1] किंबहुना ग्रंथकार असल्या विधानासंबंधानें, तीं अक्षरशः खरीं

---

१ अर्थवादांतील वर्णन वस्तुस्थितीला धरून असेल, तर त्यास 'अनुवाद', विरुद्ध असेल, तर त्यास 'गुणवाद' आणि पूर्वीं वस्तुस्थितीला धरून पण सध्यां वस्तुस्थितीला सोडून असेल, तर त्याला 'भूतार्थवाद', अशीं तीन निरनिराळीं नावें आहेत. 'अर्थवाद' हा सामान्य शब्द असून त्यांतील मजकुराचे सत्यासत्यतेप्रमाणें त्याचे हे तीन पोटभेद होतात.

आहेत किंवा नाहींत, हें पाहाण्याची विशेष सावधगिरीही घेत नसतो म्हटलें तरी चालेल. म्हणून तीं विधानें प्रमाणभूत, म्हणजे त्यांतील निरनिराळ्या विषयांसंबंधानें ग्रंथकाराचा सिद्धान्तपक्ष दाखविणारीं न मानितां तीं नुसतीं प्रशंसापर म्हणजे पोकळ, आगंतुक अगर स्तुत्यर्थ समजून मीमांसक त्यांस 'अर्थवाद' असें नांव देतात; आणि हीं अर्थवादात्मक विधानें सोडून देऊन मग ग्रंथाचें तात्पर्य ठरवीत असतात. इतकें झालें, तरी अखेर उपपत्ति ही पाहिलीच पाहिजे. एखादी विशिष्ट गोष्ट सिद्ध करून दाखविण्यासाठी बाधक प्रमाणें खोडून काढून साधक प्रमाणाची तर्कशास्त्रानुसार शिस्तवार जी मांडणी करितात, तिला 'उपपत्ति' किंवा 'उपपादन' असें म्हणतात. उपक्रमोपसंहाररूप दोन टोकें प्रथम कायम झाल्यावर मधली वाट अर्थवादोपपत्तींच्या आंखणीनें निश्चित करितां येते. कोणते विषय अप्रस्तुत किंवा आनुषंगिक आहेत, हें अर्थवादावरून समजत असल्यामुळें, एकदां अर्थवादाचा निर्णय झाला, म्हणजे ग्रंथतात्पर्याचा निश्चय करूं पाहणारा मनुष्य सर्व आडवाटा सोडून देतो; आणि आडवाट सोडून रस्त्याला लागल्यानंतर उपपत्तीची सरणी समुद्राच्या लाटेप्रमाणें प्रारंभापासून पुढें क्रमाक्रमानें वाचकांस किंवा ग्रंथपरीक्षकांस ढकलीत ढकलीत शेवटच्या तात्पर्यापर्यंत सरळ नेऊन सोडते. आमच्या प्राचीन मीमांसकांनीं ठरवून टाकलेले ग्रंथतात्पर्यनिर्णयाचे हे नियम सर्व देशांतील विद्वानांस सारखेच संमत असल्यामुळें त्यांच्या उपयुक्ततेबद्दल अगर आवश्यकतेबद्दल येथें जास्त विवेचन करण्याची जरूर नाहीं.

बा. गं. टिळक. गीतारहस्य.

---

## पाठ १६ वा.



## महाबळेश्वरीं गेल्यापासून पारलौकिक हित.

महाबळेश्वरीं गेल्यापासून पारलौकिक हित काय होतें, हें भाविक हिंदु लोकांना सांगणें नको. कृष्णादि पंचगंगांचें स्नान व महाबळेश्वराचें दर्शन, यांचें माहात्म्य पुराणांत फार मोठें लिहिलें आहे. परंतु जे वेदान्ती आहेत, व जे, मी कोण, कोठून आलों, मला काय करणें आहे, व मी जाणार कोठें, याचा विचार करतात, आणि सदोदित उपनिषदादि महाग्रंथांचें मनन करीत असतात, त्यांना " सर्व ईश्वर आहे, तद्व्यतिरिक्त सर्व मिथ्या आहे," हें तत्त्व समजण्यास महाबळेश्वरामारखीं नैसर्गिक चमत्कारविशिष्ट स्थानें पाहिलीं पाहिजेत. या ठिकाणीं गिरिकंदर, पाषाण, मेघ, नद्या व वृक्षकाननादि अमानुष चमत्कार पाहून मन संस्कृत होत जातें, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव आणि सच्चिदानंदस्वरूप जो भगवान् परमात्मा तो मनांत येत जातो, व क्रमेंकरून मनुष्य ईश्वरपरायण होतो. मनुष्याचें मन स्वभावतः संसारांत इतकें निमग्न असतें कीं, त्यास ईश्वराचा विसर पडत जातो. या कारणास्तव आपल्या धर्मांत वानप्रस्थ व चतुर्थाश्रम घेऊन पर्वत, अरण्यें, गुहा व पुण्यनद्या यांनीं विशिष्ट अशा स्थळीं तप करण्यास सांगितलें आहे. ज्यांच्या हातून तें होत नाहीं, त्यांना महाबळेश्वर, भीमाशंकर, ओंकार, पंचमढी आदिकरून ईश्वरमहिमा मनांत बिंबविणारीं जीं स्थानें आहेत, तेथें नियमित काळीं यात्रेस जाण्याची योजना केली आहे.

मनुष्यकृत चमत्कार कितीही पाहिले, तथापि त्यांजपासून मन कधींही मोठें होत नाहीं. यास उदाहरण हेंच कीं, मुंबईस राहून

मोठमोठ्या टोलेजंग इमारती पाहिल्या, व जन्मही मुंबईस घालविला, तथापि ईश्वराचा महिमा यावा तितका कधीं मनांत येतो काय ? मुंबईच्या मोठमोठ्या इमारती पहिल्यापहिल्यानेंमात्र डोळ्यांत भरतात; पण एकदां वळणांत पडल्या, म्हणजे त्यांचें महत्त्व लक्षांत येईनासें होतें. तसा प्रकार ईश्वरी चमत्कारांचा नव्हे. महाबळेश्वराचे चमत्कार नित्य पहात गेलें तथापि तृप्ति कधीं झाली आहे काय ? प्रथमदर्शनीं जो ईश्वरी महत्त्वाचा मनावर भास होतो व ऊर दडपत असतो, तीच स्थिति लोक प्रतिवर्षीं पाहण्यास जातात, तरी कायम असते; व एक वेळ महाबळेश्वर पाहिलें, म्हणजे पुनः दृष्टीस पडावें, म्हणून मनाची किती उत्कंठा असते, हें महाबळेश्वर पहाणारासच विचारलें पाहिजे. जे केवळ धर्मशून्य, व कधीं स्नानसंध्या व ईश्वराचें स्मरणदेखील करीत नाहींत, व दुसरे करीत असल्यास त्यास हंसतात, त्यांच्या अंतःकरणातही विरक्ति उत्पन्न होऊन महाबळेश्वरी जाऊन ईश्वर-चिंतन करावें, अशी बुद्धि उत्पन्न होते. यास प्रमाण आर्यकवींमध्यें अर्थगौरवाविषयीं प्रसिद्ध जो भारवी त्याचें वचन आहे. भगवान् वेदव्यास यांची अनुज्ञा घेऊन अर्जुन हिमालयावर तपश्चर्येकरितां गेला, त्या समयीं बरोबर यक्ष होता, त्यानें त्या पर्वतावरील सर्व रमणीय, उपभोग्य व विहारयोग्य स्थानें त्याला दाखविलीं. नंतर अर्जुन हें वाक्य बोलला:—

**वीतजन्मजरसः परं शुचि ।**
**ब्रह्मणः पदमुपैतुमिच्छताम् ।**
**आगमादिव तमोपहारितः ।**
**संभवन्ति मतयो भवाच्छिदः ॥**

याचा भावार्थः—“जन्म आणि जरा यांहून अतीत जें परब्रह्म, त्याच्या श्रेष्ठ व पवित्र पदाप्रत जाण्यास जे इच्छितात, त्यांच्या बुद्धि, अज्ञानतिमिरनाशक जी श्रुति तिच्या अध्ययनें व मननेंकरून जसा संसाराचा उच्छेद करणाऱ्या आणि ईश्वरपर होतात, तद्वत् हे पर्वतावरील चमत्कार पाहून होतात.” ह्या श्लोकावर मल्लिनाथानें अशी टीका केली आहे की,–‘न केवला इयं भोगभूमिः, किं तु मुक्तिक्षेत्रमपीति तात्पर्यार्थः।’ म्हणजे, ‘हें स्थान केवळ उपभोगार्ह नव्हे तर मुक्ति देणारें क्षेत्रही आहे.’ हें हिमालयाचें वर्णन झालें. पण सह्याद्रि हिमालयाचाच भाऊ आहे. जर हीं स्थळें साक्षात् वेदोपम आहेत, व त्यांच्या दर्शनापासून मनें संसारातीत होऊन ईश्वरपरायण होतात, तर यापरता परमार्थ राहिला कोणता? ईश्वरज्ञान कशा रीतीनें होतें याविषयीं पुढील श्लोक सर्वांच्या ऐकण्यांत असेलचः—

**तीर्थे तीर्थे जायते साधुवृन्दम्।**
**वृन्दे वृन्दे तत्त्वचिन्तानुवादः।**
**वादे वादे जायते तत्त्वबोधः।**
**बोधे बोधे सच्चिदानन्दभासः॥**

आम्हांस वाटतें की, येथें जी साधुवृंदें सांगितलीं आहेत, तीं उपनिषद्भागांतील अगस्त्य, लोपामुद्रा, भृगु, वरुण इत्यादि होत. जो तत्त्वचिंतानुवाद सांगितला आहे, तो आत्मानात्म, जीवेश व उत्पत्तिस्थितिलय, यांविषयीं विचार होय, व जो तत्त्वबोध सांगितला आहे, तो, “सदेव सौम्य इदमग्र आसीत्॥” “एकमेवाद्वितीयम्।” “सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म।” “ब्रह्मविदाप्नोति परम्।” इत्यादि महावाक्यें होत. व जीं तीर्थें सांगितलीं आहेत, तीं महाबळेश्वरासारखीं स्थानें होत. इतर ठिकाणीं असे परिणाम घडावयाचे नाहींत.

आतां शेवटीं एवढी मोठी शंका राहिली आहे कीं, कदाचित् कोणी, येथें लिहिलें आहे तें ऐकून, महाबळेश्वरास जाईल, आणि म्हणेल कीं, "आम्हीं प्रतापगड पाहिला, महाबळेश्वरही पाहिलें, परंतु आमच्या मनांत येथें सांगितल्याप्रमाणें स्वदेशाभिमान व धर्मश्रद्धा यांचा लेशही आला नाहीं." तर यास एवढेंच उत्तर आहे कीं, आपण विचारशून्य मन व भावशून्य हृदय समागमें घेऊन केवळ चर्मचक्षूनें पहाल, तर महाबळेश्वरीं जन्मांधळयापेक्षांदेखील तुम्हांस कमी दिसणार आहे. यास दृष्टान्त मावळे लोकांचाच आहे. ज्यांच्या पूर्वजांनीं आपला पूर्ण कैवारी जो शिवाजी राजा त्याच्या पुण्याईनें रायगडास राज्य स्थापन केलें, तोरण्यास विजयतोरणें लाविलीं, सिंहगडास सिंहासारखे पराक्रम केले, प्रतापगडास यवनां-वर प्रताप गाजविले व सज्जनगडास परम सज्जन जे रामदास, त्यांच्या अनुग्रहेंकरून धर्मस्थापना केली, तेच मावळे हल्लीं मोळ्या वाहात या किल्ल्यांच्या खालून रात्रंदिवस जातयेत असतात. परतु ते पूर्वींचे मोळकेचे मोळकेच आहेत. पाषाणांनीं बांधलेले किल्ले-देखील भंगून कालगतीनें पडत चालले अहोत, परंतु मावळयांच्या हृदयांस काडीमात्र द्रव येत नाही. यास्तव जो कोणी विचारदृष्टीनें महाबळेश्वर पाहील, त्याच्या सुशिक्षित, संस्कृत, व सूक्ष्मदर्शी मना-वर फार हितावह परिणाम होतील; व असे परिणाम त्यानें करून घ्यावे, हाच या विषयाचा उद्देश होय.

य. आ. उदास. धौममहाबळेश्वरवर्णन.

---

## पाठ १७ वा.



## सुखाची थोडीशी मीमांसा.

दोन वर्षांच्या अंतीं राजपुत्रास चांगली भाषा आल्यावर व तिऱ्हाइतांशीं वागतांना कोणता सावधपणा ठेवावा, हें समजूं लागल्यां-वर तो इम्लाकाबरोबर चोंहोंकडे जाऊन मंडळींत उठूं बसूं लागला. मनांतला उद्देश कीं, मनुष्याच्या सर्व स्थितींत अत्युत्तम स्थिति कोणती, ती निवडून काढावयाची. प्रथमतः कांहीं वेळ त्यास वाटलें कीं, निवड करण्याचे श्रम व्यर्थ आहेत; कारण, त्यास सर्वही स्थिति सारख्याच सुखकारक दिसल्या. जेथें जेथें तो जाई, तेथें तेथें आनंदवृत्ति व कृपाळूपणा त्याला दिसे; व जिकडे तिकडे लोक आनंदानें गाताहेत, व कोणी स्वस्थपणें विनोद करताहेत, असें पाहून त्यास असें वाटूं लागलें कीं, हें सर्व जग समृद्धीनें पूर्ण भरलें आहे. सर्वांस त्यांच्या गरजेप्रमाणें व योग्यतेप्रमाणें सर्व वस्तु प्राप्त होतात, कोणत्या गोष्टीची ददात नाहीं, सर्व लोक हातानें सढळ व मनानें कनवाळू आहेत. असें पाहून तो आपल्या मनांत म्हणाला:—“ असल्या जगांत कोणी तरी दुःखी असेल बरें ? कोणी असणार नाहीं.”

ही त्याची आनंददायक भ्रांति इम्लाकानें दूर करण्याकरितां यत्न केला नाहीं. त्यानें मनांत आणिलें कीं, यास जगाचा अनुभव नसल्यामुळें यास हा सर्व प्रपंच इतका गोड भासतो आहे; तर यास त्याचा कडूपणा आपण होऊन इतक्यांतच कसा कळवावा ? तो त्यास आपोआप कळेल. आणि त्याचप्रमाणें झालें. तें असें कीं, एक दिवस राजपुत्र कांहीं वेळ उगाच स्तब्ध बसून इम्लाकास म्हणाला, “ माझे सर्व सोबती तर सर्वदा एकसारखे खुशाल

सुखानुभव घेतातसे दिसतात, आणि मला एकटयास स्वस्थ वाटत नाहीं, व चैन पडत नाहीं; याचें कारण काय असेल तें असो ! ज्या ज्या सुखांचें मी मोठ्या उत्कंठेनें संपादन करितों, तीं सर्व प्राप्त झाली न झालीं कीं, मला विरस वाटून त्यांचा त्रास येतो. मंडळी ख्यालीखुशाली करितात, त्यांत मी जातों खरा; पण खरें विचाराल, तर तेथें मला वास्तविक सुखानुभव होतो म्हणून मी तेथें जातों, असें तादृश नाहीं; तर आपला आपणास विसर पडावा म्हणून मुख्यत्वेंकरून जातों; व इतक्या मोठ्यानें हंसतों, खेळतों, त्यांतला वास्तविक हेतु हाच आहे की, माझ्या मनांतला उदासपणा दुसऱ्यांच्या लक्षांत न यावा."

**इम्लाक**—दुसऱ्यांच्या मनांचा व्यापार समजण्यास रस्ता म्हटला, म्हणजे आपल्या मनांतला व्यापार पाहून त्यावरून अनुमान करावे, हाच होय. यास्तव जर आपली संतोषवृत्ति केवळ बनाऊ आहे, असें तुम्हांस ठाऊक आहे, तर त्यावरून इतरांची संतोषवृत्तिही कदाचित् खरी नसेल, असा संशय घेण्यास चिंता नाहीं. सर्व लोक बहुतकरून एकमेकांचा हेवा करितात. वास्तविक सुख प्राप्त होणें नाहीं, अशी मनुष्याची खातरी व्हावयास फार दिवस लागतात. प्रत्येकास असें वाटत असतें कीं, मजवांचून सर्व दुसरे लोक सुखी आहेत; आणि अशा समजुतीनें स्वतः आपणास सुख प्राप्त होण्याची आशा त्याच्या ठायीं बहुत दिवस असते. कालच रात्रीं आपण ज्या मंडळीत गेलों होतों, तेथें सर्व लोक अशा रंगांत दिसत होते व असा विनोद चालला होता कीं, तसला आनंद या मृत्युलोकापेक्षां विशेष पुण्यवान जो लोक असेल, तेथल्या भाग्यवान लोकांस साजण्यासारखा होता. त्या प्रकारचा आनंद, चिंता व शोक यांनीं व्याप्त अशा या मृत्युलोकीं आढळेल, असें कोणास वाटणार नाहीं. परंतु

मी आपणांस खरें सांगतों कीं, ज्यास एकान्तवासाचें भय वाटत नव्हतें, असा एकदेखील त्या मंडळीत नव्हता. एकटें बसलें तर चैन पडत नाहीं, नानाप्रकारचे दुःखदायक विचार मनांत येतात, तर ते टाळावे, याच बुद्धीनें सर्व मंडळी तेथें जमली होती. वास्तविक सुखी म्हटला म्हणजे एकदेखील नव्हता.

**राजपुत्र**—तुम्ही म्हणतां हें मला सर्व लागू आहे; तर यावरून तें माझ्या सर्व सोबत्यांस कदाचित् लागू असेल, नाहीं कोणीं म्हणावें? आतां एकंदर मनुष्यजातीस जी साधारण दुःखें असतील, तीं असोत; तथापि मनुष्याच्या कांहीं अवस्था इतर अवस्थापेक्षां चांगल्या आहेत, सर्वच सारख्या नाहींत. तेव्हां सर्वांत कमी दुःखाची जी असेल, ती शोधून काढून तिचाच स्वीकार करावा, हें शहाणपणाचें काम आहे, असें मला वाटतें.

**इम्लाक**—सुख व दुःख यांचीं कारणें पाहूं गेलें असतां, तीं अनेक प्रकारचीं व अनिश्चित आहेत, व कधीं ज्या कारणानें सुख उत्पन्न होतें, तेंच कारण दुःखासही उत्पन्न करतें. तसेंच, ज्यांचें धोरण पूर्वीं कांहींच असत नाहीं, अशा मध्येंच कांहीं गोष्टी घडून त्यांपासून केव्हां केव्हां कांहीं भलताच परिणाम उत्पन्न होतो. याप्रमाणें असा पराकाष्ठेचा गोंधळ आहे कीं, जर कोणी मनुष्य म्हणेल कीं, अमुक स्थिति सर्वांत चांगली, असें सिद्ध करून तिचा स्वीकार करावयाचा, तर मरेपर्यंत जरी त्यानें शोध केला व विचार केला, तरी निर्णय म्हणून व्हावयाचा नाहीं. त्या शोधांतच त्याचा अंत होईल.

**राजपुत्र**—असें तुम्ही म्हणतां खरें; परंतु ज्या ज्ञाते पुरुषांचें भाषण ऐकून ते आपणांस इतके थोर वाटतात, व त्यांच्या बुद्धीचा प्रौढपणा पाहून आपणांस इतका चमत्कार वाटतो, त्या पुरुषांनीं

आपणांस अत्यंत सुखावह वाटली त्या स्थितिचा आश्रय केला आहे, हें कसें ?

**इम्लाक**—विचारपूर्वक अमुक एक स्थिति पसंत करून तींत वागणारे फारच थोडे. मनुष्यें ज्या ज्या स्थितींत आपणांस आढळतात, ती स्थिति ज्या कारणांनीं त्यांस प्राप्त झाली आहे, त्या कारणांची घटना होऊं नये म्हणूनसुद्धां त्यांनीं यत्न केला आहे. आणि याच कारणामुळें तुम्ही जर पाहूं जाल, तर आपल्यापेक्षां आपल्या शेजाऱ्याची स्थिति चांगली, असें ज्यास वाटत नाहीं, असा एकसुद्धां मनुष्य तुम्हांला सांपडणार नाहीं.

**राजपुत्र**—तुम्ही म्हणतां याप्रमाणें इतर मनुष्यांची अवस्था असली, तरी मी राजकुळांत उत्पन्न झाल्यामुळें जी अवस्था उत्तम वाटेल, ती साध्य करून घेण्याचें सामर्थ्य मला ईश्वरानें दिलें आहे, व जगांतल्या सर्व प्रकारच्या अवस्था पाहण्याची मला सोय आहे. तर मी आतां सावकाशपणें चांगला विचार करून सर्वांत चांगली स्थिति कोणती, तें ठरवून तिचा आश्रय करणार. सुख हा पदार्थ या जगांत कोठें तरी असेलच असेल, यांत संशय नाहीं.

कृष्णशास्त्री चिपळूणकर रासेलस.

---

## पाठ १८ वा.



## आध्यात्मिक उन्नति काय करीत नाहीं ?

कोणत्याही लोकांची किंवा मंडळीची आधिभौतिक उन्नति पुष्कळ अंशीं पुढारीपणा पावलेल्या शेलक्या मंडळीच्या आध्यात्मिक उन्नतीवर अवलंबून असते, ही गोष्ट निर्विवाद आहे. कोणीही

सत्त्व घेऊं पहात असतां, सत्त्व भगीरथ प्रयत्नांनीं ठेवणें, हें अगदीं वरिष्ठ प्रतीच्या आध्यात्मिक उन्नतीचें एक मोठें लक्षण होय. अंतर्यामी देवतेपासून टपका येणारें कृत्य प्राणान्तीं सत्त्व न जाऊं देणाऱ्या पुरुषाच्या हातून होणें नाहीं. अंतर्यामी देवतेचा टपका आला कीं, सत्त्व गेलें म्हणा, किंवा सत्त्व गेलें म्हणजे अंतर्यामी देवतेचा टपका आला म्हणा,—पाहिजे त्या रीतीनें शब्दरचना केली, तरी क्षिती नाहीं. पण अंतर्यामी देवता म्हणून कोणी पदार्थ आहे, व ही देवता केवळ परार्थ झटणाऱ्या देवाचें प्रतिबिंब होय, इतकें तत्त्व मनावर पूर्णपणें प्रतिबिंबल्याशिवाय पुरुषाच्या हातून मोठीं सत्कार्यें निष्पन्न होण्याचा संभव नाहीं, असें या जगामधील नांवाजलेल्या लोकांतील प्रत्येक उदाहरणीय पुरुषाच्या चरित्रावरून म्हणणें भाग पडतें. प्राणान्तींही अंतर्यामी देवतेचा टपका न घेणाऱ्या उदाहरणीय पुरुषांच्या हातीं जोंपर्यंत सूत्र असतें, तोंपर्यंत लोकांस किंवा मंडळास आबादानी असते. असल्या पुरुषांच्या मंडळीमध्ये स्वार्थास यत्किंचित्‌ही वाव नसतो. त्यामुळें जसा निर्भीडपणा तसा निःस्पृहपणा यांच्यामध्यें सतत वागत असतो; व जसा नाचरेपणा तसा तोंडपुज्येपणा यांच्यामध्यें मुळींच वास करीत नाहीं. जर कोणत्याही प्रकारचा स्वार्थ असेल, तर भीड धरणें, किंवा पुढें पुढें नाचणें व तोंडपुज्येपणा करणें इष्ट होतें. पण जर कोणत्याही प्रकारचा स्वार्थ नाहीं, इतकी आध्यात्मिक उन्नति झाली आहे, तर काय समजून भीड धरावी व काय समजून पुढें पुढें नाचावें किंवा तोंडपुज्येपणा करावा ? असले आध्यात्मिक उन्नतीचे लोकोत्तर पुरुष जेव्हां धुरीणता पावतात, तेव्हां लौकिक पुरुषांस आपापला स्वार्थ साधणें अशक्य होतें. लोकोत्तरपणा जाऊन धुरीण पुरुषांमध्यें स्वार्थाचा गंध मारूं लागला,

म्हणजे सर्वत्र स्वार्थपरता माजते, व लवकरच उतरती कळा लागून दरोबस्त मंडळ हळुहळु अखेरीस परतंत्र होतें किंवा बुडतेंही.

प्राचीन यवनांच्या व रूमी लोकांच्या उत्कर्षाचा पाया आध्यात्मिक उन्नतीचा दैवी अंश वरचढ झालेल्या पुरुषांनीच घातला. अरब व मोंगल यांच्यासारख्या लोकांनीं पृथ्वी दणाणून टाकिली, त्याचें गूढ बीज काय? तर अबू बेकर व ओमर यांच्यासारखे अरबांमध्यें, व चिंगिसखानासारखे मोंगलांमध्यें स्मरणीय व उदाहरणीय व संमाननीय महापुरुष, आपले देह लोकोत्तर गुणांसहित आपल्या स्वतःच्या कल्याणावर व सुखावर लाथ मारून, अरबांच्या व मोंगलांच्या कल्याणार्थ व सुखार्थ चंदनाप्रमाणें झिजवितें झाले, हेंच होय. सारांश, त्या त्या लोकांच्या व मंडळाच्या उत्कर्षाचे जे प्राणप्रतिष्ठापक झाले, त्यांच्यामध्यें परार्थपणा नांवाचें जें अगदी वरिष्ठ प्रतीच्या आध्यात्मिक उन्नतीचें मुख्य लक्षण, तें पूर्णपणें वसत होतें.

आतां असल्या प्रकारच्या अति वरिष्ठ प्रतीच्या आध्यात्मिक उन्नतीचा मूर्तिपूजेच्या निषेधाशीं किंवा विधानाशी संबंध आहे कीं नाहीं, व असल्यास तो किती आहे, याचा थोडक्यांत विचार करूं या.

अलीकडचें शिक्षण मिळालेल्या कित्येक लोकांचें असें म्हणणें दिसतें कीं, मूर्तिपूजेनें वरिष्ठ प्रतीचे गुण आंगी येत नाहीत; व तेणेंकरून आध्यात्मिक उन्नतीस बाध येतो. आतां हें खरें आहे कीं, अबू बेकर व ओमर हे दोघेही अविंध होते. अर्थात् ते मूर्तिभंजक होते, मूर्तिपूजक नव्हते. पण प्राचीन यवनांमधील व रूमी लोकांमधील नांवाजलेले उदाहरणीय पुरुष कोण होते? चिंगीसखान खुद्द कोण होता? आम्हां मराठ्यांच्या पातशाहीची शालिवाहनाच्या १६ व्या शतकांत प्राणप्रतिष्ठा करणारा शिवाजी कोण होता? एकनाथाचीही आध्यात्मिक उन्नति अगदीं वरिष्ठ प्रतीची असून लोकोत्तर

व उदाहरणीय नव्हे काय? जर अशीं ठळक उदाहरणें मूर्तिपूजकांमध्यें सांपडत आहेत, तर मूर्तिपूजकांच्या निषेधकांचे व निंदकांचे युक्तिबाण एकीकडे व निशाण भलतीकडे अशी वास्तविक स्थिति झाली नाहीं काय ? असें दिसतें कीं, देवाचे घरीं सर्व धर्म सारखे आहेत. सर्व धर्म सख्खीं भावंडें असून, त्या सर्वांचा जनक एकटा देव होय. सर्व धर्म देवाचे घरीं सारखे आहेत. म्हणून प्रत्येक धर्मांत उदाहरणीय व आशंसनीय गुणांचें माहेर, असे अनेक पुरुष जन्मून गेले. या सर्व गोष्टी इतिहासावरून निर्विवाद होत असतां, मूर्तिपूजा अज्ञानाचा मार्ग म्हणणें, हा एक प्रकारचा मनाचा असमंजसपणा व दृष्टीचा कोतेपणा नव्हे काय? मूर्तिपूजक असो किंवा मूर्तिभंजक असो, ज्याचा देवावर पूर्ण भरंवसा असतो, व जो अंतर्यामी देवतेस सर्वदा प्रमाण धरून चालतो, त्याच्यामध्यें आध्यात्मिक उन्नतीचा अंश लोकोत्तर असतो, हें उघड आहे. पण मूर्तिपूजकांच्या अंगीं आध्यात्मिक उन्नति मुळींच नसते किंवा कमी असते, व मूर्तिभंजकांच्या किंवा मूर्तिपूजेचा निषेध करणाऱ्यांच्या अंगी ती विशेष वरचढ असते, असा सार्वत्रिक नियम करणें असल्यास या आमच्या एकनाथाचें चरित्र पुष्कळ बाधक होतें, असें म्हणणें भाग पडतें. सारांश, अतिवरिष्ठ आध्यात्मिक उन्नतीचा मूर्तिपूजेच्या विधानाशीं किंवा निषेधाशीं बिलकूल संबंध दिसत नाहीं.

रा. रा. भागवत एकनाथाचें चरित्र.

---

## पाठ १९ वा.



### केरो शहर.

केरो मुक्कामीं आम्ही प्रातःकालीं पोहोंचलों. स्टेशनवरून शहराचा जो भाग नजरेस पडला, त्यावरून शहराचें वैभव व त्याची शोभा यांविषयीं आमचा बराच अनुकूल अभिप्राय झाला. परंतु त्या स्थानीं गाड्याघोडीं बिलकूल दिसलीं नाहीत, ह्यामुळे मोठें आश्चर्य वाटलें. कदाचित् तो केवळ अरुणोदयाचाच समय होता, व सूर्यकिरणांनीं नगरवासी जनांस उद्बुद्ध करण्याचा व्यापार सुरू केला नव्हता; याकारितां, व प्रायः शीतार्ततेमुळें व्यवसायी जनांनीं आपलीं सुखसदनें टाकून प्रवासी जनांच्या सुखसाधनांची फारशी अपेक्षा न केल्यामुळें, आम्हांस प्राचीनकाली लोकविश्रुत अशा देशाच्या राजधानीचे ठिकाणीं वाहनांचा अभाव अनुभवास आला असावा. कांहीं कालपर्यंत वाट पाहिल्यावर एक घोड्याची गाडी मिळाली. तींत जेवढ्या मंडळींचा समावेश होण्यासारखा होता, तेवढ्यांनीं तिचा उपयोग करून बाकीच्या मंडळींनीं पादक्रमण करण्याचा निश्चय केला. बरोबरचें सामानसुमान ठेवण्यासाठी एक खेचराचा गाडा ठरविला व त्याच्यामागून आम्ही चाललों. ज्या पथिकाश्रमांत (हॉटेल) आमचा उतरण्याचा संकेत होता. तो बराच निकटवर्ती असल्यानें व प्रातःकालचा समय रमणीय, अनिल मंदगति व शिशिर असल्यानें, श्रमांचा भास तर झालाच नाहीं, परंतु झालेल्या प्रवासक्रमाचा पूर्ण अपनोद झाला. आश्रमांतील व्यवस्था आमच्या सोईची होती. प्रातर्विधि लवकर उरकून पुराणप्रसिद्ध मनोरे पाहाण्याला जाण्याची आम्हीं तयारी केली. ज्या वीथिकांमधून आम्ही गेलों त्यांची रचना,

मनोहरत्व, सौंदर्य व निर्मलता हीं वर्णनीय होतीं. गृहांची आकृति चतुष्कोण असून तीं भव्य दिसत होतीं; व त्यांचे शिरोभाग सपाट होते. कांहींकांहींच्या वातायनबहिर्भागीं अलिंदभूमिका काढिल्या होत्या. घरें परस्परांशीं चिकटलेलीं असून प्रायः उद्यानपरिवेष्टित होतीं. बाजारचीं दुकानेंही नीटनेटकीं असून सुधारलेल्या शहरांतल्या दुकानांसारखी त्यांची ठेवण होती. जनसमूह फार विरळ भासला व कित्येक रथ्या सूर्योदय होऊन बराच वेळ झाला असतांही निर्जन होत्या. शहराच्या बाहेरील मैदानांत एक बाजार पाहिला. तो पाहून आपल्या इकडील खेडेगांवांत कोठें कोठें आठवड्यांतून एक दिवस बाजार भरतो, त्याची आठवण झाली. त्या स्थळीं सर्व खाद्य व पेय सामग्री, कापडचोपड, घोड्यांसाठीं गवत, तांबडे व पांढरे ऊंस वगैरे जिनसा नजरेस पडल्या. अरब जातीचे स्त्रीपुरुष बरेच दिसत होते. त्याचा बांधा सुदृढ, आकृति धिप्पाड व शरीर कृष्णवर्ण असून एकवस्त्रानें अवगुंठित असतें. स्त्रियांस स्तनांसाठीं कंचुकविशेष दृष्टीस पडला नाहीं. यांपैकीं ज्या कांही उच्च वर्णाच्या स्त्रिया होत्या, त्यांचीं वदनें नेत्राच्या अधोभागीं सूक्ष्मवस्त्रावृत होतीं. हें वस्त्र एका कानापासून दुसऱ्या कानापर्यंत पोहोंचण्याइतकें रुंद व उरावर पडे इतकें लांब असतें. नासिकेवर हस्तिदंती किंवा श्वेतकाष्ठमय असा एक कंगोरेदार नाकाच्या लांबीचा वाटोळा तुकडा असतो. हा मधून पोकळ असतो व त्यामधून केशसीमंतावरून आलेलें असें एक सूत्र वदनावगुंठक वस्त्राशी संयुक्त असतें. कांहीं स्त्रिया खेचरांवर बसून चाललेल्या दृष्टीस पडल्या. त्यांच्या पायांत मोजे व बूट होते. ह्या प्रदेशीं खेचरांचा उपयोग फार करितात. युरोपिअन स्त्रिया व गृहस्थही ह्या वाहनांचा स्वारीसाठीं उपयोग करितात. कांहीं

खेचरांचीं नांवेंही मोठीं गंमतीचीं व चमत्कारिक ठेवितात. कोणी ग्ल्याडस्टन, कोणी नॉर्थब्रुक, कोणी जॉन ब्राईट, कोणी डिझराएली इत्यादि. असें असल्याकारणानें "आपली ग्ल्याडस्टनवर स्वारी करण्याची इच्छा आहे, कां डिझरायलीपर?" अशा प्रकारच्या हास्योत्पादक प्रश्नानें अपरिचित जनांस मोठें नवल वाटतें. कांही वेळ मार्गक्रमण केल्यावर नाईल नदीच्या पुलावरून आम्ही चाललों. ह्या ठिकाणीं नदीचें पात्र सुमारें अर्धा-पाऊण मैल रुंद होतें. पाणी धूसर वर्णाचें असून शांत दिसत होतें. नदीच्या तीरीं कांहीं मंदिरें होतीं. त्यांचें मूळ सौंदर्य व त्याला नदीच्या पात्राच्या शोभेचें कोंदण! मग काय विचारतां! फारच बहारीचा देखावा दृष्टीस पडला! नदी केवळ ह्याप्रमाणें नेत्रानंददायिनीच नव्हती, तर आपल्या उरावर नानादेशगामी व नानादेशागत नौकासमूहास आश्रय देत होती, व तीरस्थ प्रदेशांच्या उदरभरणाची चिंताच, जणूं काय, वाहिल्यानें तिनें धूसरवर्णत्व स्वीकारिलें होतें. पुढें गेलों, तों इस्माएल खेदिवाचा जंगी वाडा दृष्टीस पडला. ही इमारत मोठी भव्य असून सभोंवती मोठी मोठीं पटांगणें होतीं. याच्यापुढील रस्ता थेट मनोऱ्याच्या पायथ्यापर्यंत दुतर्फा वृक्षावेलींनें मर्यादित आहे. दोन्ही बाजूस शस्यक्षेत्रें दृष्टीस पडतात, व त्यांत कांही स्थळीं नाईलनदीचे पाट काढिलेले आहेत. कांहीं ठिकाणीं पाणी शेतांना लावण्याकरितां अगदी साध्या जलाकर्षक यंत्रांची योजना केली होती.

वाटेनें जे कांहीं पशुपक्षी दृग्गोचर झाले, त्यांपैकीं गाई व म्हशी आपल्या देशांतील गाईम्हशींसारख्याच दिसल्या; मात्र गाईचीं शिंगें फारच आंखूड होतीं. कावळेही आपल्या इकडच्यासारखेच होते. परंतु जास्त मजबूत व पीनवपु वाटले. बहुत करून विधात्यानें

तेथील मनुष्यांच्या धिप्पाड आकृतींशीं संवाद राखण्याकरितां काकपक्ष्यांसही पीवरत्व दिलें असावें, असा तर्क झाला. ह्या पक्ष्यांचे कंठ रक्तकपिश वर्णाचे होते.

रा. भ. पावगी. विलायतचा प्रवास.

---

## पाठ २० वा.



### ज्ञान.

#### भाग १ ला.

रंगानें काळे, दिसण्यांत कुरूप, स्वभावानें दुष्ट, नीतीस अपरिचित व बुद्धीनें मंद, असे निग्रो जातीचे लोक सर्वांच्या पाहण्यांत आलेच असतील. या निग्रोंहूनही विशेष रानटी जातीचे लोक कित्येक अप्रसिद्ध बेटांत आहेत, असें पुनः पुन्हा पृथ्वीपर्यटन करणाऱ्या शोधक प्रवाशांच्या लेखांवरून समजतें. उत्तर अमेरिकेंतील तांबडे इंडियन, सैबेरिया देशांतील खुजे व निःशक्त सैबेरियन, अरबस्तानांतील फिरस्ते धनगर, हिंदुस्थानांतील गोंड वगैरे मूळचे रहिवाशी, रशियाच्या अंमलांत आलेल्या मध्य आशियांतील मोगलांच्या निरनिराळ्या जाती, रशियाच्या दक्षिणेचे कोसॅक्स वगैरे दुसऱ्या प्रतीचे लोक, निग्रोंपेक्षां पुष्कळ सुधारलेले आहेत हें खरें; पण यांच्यांत व निग्रोंत जितकें अंतर आहे, त्याहून फारच अधिक अंतर यांच्यांत व सुधारलेल्या अलीकडील युरोपिअन लोकांत आहे. तेजःपुंज शरिरें, मनोहर आकृति, सौम्य स्वभाव, स्थिर नीति व कुशाग्र बुद्धि ज्यांच्यापैकीं पुष्कळांच्या ठायीं वसत आहे, असे अर्वाचीन युरोपिअन, एशियाटिक, किंवा अमेरिकन लोक कोणीकडे आणि आफ्रिकेच्या किनाऱ्यावर उन्हांत तळपणारे किंवा

उत्तरभूशिराच्या आसपास बर्फाच्या झोंपड्यांत रेन्डियरच्या मांसावर व कांतड्यावर आयुष्य कंठणारे लोक कोणीकडे! या लोकांत व अलीकडील सुधारलेल्या लोकांत जमीनअस्मानाचें अंतर आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. यांत हें अंतर कशानें पडलें, व तें कमी कशानें होत जाईल, हें या निबंधांत थोडक्यांत दाखविण्याचा इरादा आहे.

मनुष्यांमध्यें ज्ञानाचा जसजसा प्रसार होत जातो, तसतशी त्याची रानटी स्थिति सुटत जाऊन त्यांस उन्नतावस्था प्राप्त होते. जीं राष्ट्रें सध्यां आपणांस सुधारलेलीं असें म्हणवून घेत आहेत, तीं एकदां निग्रो लोकांच्या किंवा त्यांहूनही रानटी लोकांच्या स्थितींत असावींत, असें अनेक प्रमाणांवरून सिद्ध करतां येण्याजोगें आहे व पुष्कळांनीं तें केलेंही आहे. ज्ञानाचा प्रसार होऊन रानटी स्थिति सुटत चालल्यानें व उन्नतावस्था येऊं लागल्यानें, मनुष्यमात्राच्या सुखाची वृद्धि होत जाते किंवा नाहीं, हा प्रश्न क्षणभर वादग्रस्त आहे, असें जरी मानिलें, तरी त्यावरून ज्ञानाचा प्रसार करण्याविषयीं परिश्रम करूं नये असें होत नाही. ज्ञानवृद्धि करण्यापासून मनुष्यमात्रास कोणत्याही प्रकारचा फायदा न होता, तर ती करण्याकडे त्याची प्रवृत्ति कधींच झाली नसती. ती एकसारखी होत आहे, व दिवसें दिवस क्षीण न होतां अधिकच वाढत जात आहे. यावरून तसें करण्यांत मनुष्यमात्रास कांहीं फायदा होत आहे, हें स्पष्ट दिसतें. जड वस्तूप्रमाणें सुखदुःखांची मापानें मोजणी करतां येती, तर सर्व स्थितींत सुखदुःख सारखें आहे, असें प्रतिपादणाऱ्यांचीं तोंडें तेव्हांच बंद करतां येतीं; तीं करतां येत नाहींत, म्हणून त्यांना निरुत्तर करणें जरी कठीण झालें आहे, तरी एवढें खरें आहे कीं, ज्यांस आम्ही सुधारलेलीं राष्ट्रें

म्हणतो, त्यांपैकीं कोणासही निग्रो लोकांच्या स्थितींत पुनः जाण्याची इच्छा नाहीं; इतकेंच नाहीं, तर प्रस्तुत जी सुधारणा त्यांस प्राप्त झाली आहे, तिची वृद्धि करण्याची उत्कंठा त्यांना लागली आहे, व ही उत्कंठा दूर करण्यास त्यांना ज्ञानाशिवाय दुसरें साधन दिसत नाहीं.

सुखाची प्राप्ति आणि दुःखाचा परिहार, यांत समग्र जीवकोटि सर्वकाळ चूर झालेली दिसते. नश्वर ऐहिक वस्तूंचा कंटाळा करणारा योगीदेखील सुखाच्या पाठीमागें लागलेला असतो. साधारण प्रापंचिकांत आणि त्याच्यांत भेद इतकाच कीं, प्रापंचिकाप्रमाणें ऐहिक सुखांनीं त्याचें समाधान होत नाहीं. त्याची महत्त्वाकांक्षा प्रापंचिकापेक्षां बलवत्तर असल्यामुळें तो ऐहिक सुखाहून भिन्न अशा अविनाशी सुखाच्या प्राप्तीसाठीं आत्मसंयमन करीत असतो. कोटी मनुष्यांपैकीं नव्याण्णव लक्ष नव्याण्णव हजार नऊशें नव्याण्णव मनुष्यांना ऐहिक सुखाचा पाठलाग सोडून योग्यांच्या अविनाशी सुखामागें लागवत नाहीं. यामुळें हा प्रपंच वाढत चालला आहे. तथापि अशा स्थितींतही एक गोष्ट निरंतर लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, जरी योगी आणि प्रापंचिक यांचीं सुखें भिन्न जातींचीं आहेत, तरी तीं संपादण्याचें दोघांचें साधन एकच आहे. तें साधन ज्ञान होय. प्रस्तुत निबंधांत ज्ञानप्रसारामुळें प्रापंचिकाच्या सुखाची वृद्धि कशी होत चालली आहे, हें विशेष स्पष्ट केलें पाहिजे.

मनुष्यास जो सुखानुभव होतो, तो सारा त्याच्या मनाच्या द्वारें होतो; म्हणून सारीं सुखें मानसिक सुखें आहेत असें तत्त्वदृष्ट्या म्हटलें पाहिजे. तथापि निबंधाच्या सोईसाठीं त्यांचे दोनतीन स्थूल भाग करण्यास कांहीं हरकत नाहीं. साधारणपणें विचार करितां असें दिसून येईल कीं, प्रत्येक मनुष्य शारीरिक, सामाजिक, किंवा

शुद्ध मानसिक या सुखाच्या तीन वर्गांपैकीं एकाच्या, दोहोंच्या, किंवा साऱ्यांच्या पाठीमागें लागलेला असतो. या तीनही प्रकारच्या सुखांची आजपर्यंत त्याला जी जोड झाली आहे, ती त्याच्या ज्ञानामुळें झाली आहे; व पुढें तींत भर पडणें किंवा न पडणें हेंही त्याच्या ज्ञानावरच अवलंबून आहे, हें स्वल्प विचारान्ती ध्यानांत येणार आहे.

रानटी लोक शिकारीवर उपजीविका करितात. थंडीवाऱ्यापासून शरीरांचें रक्षण करण्यास उपजीविकेसाठीं मारलेल्या जनावरांच्या कातडयांशिवाय त्याच्यापाशीं दुसरें कांहीं नसतें. सूर्याचा प्रखर ताप दुःसह होतो, तेव्हां वृक्षांच्या छायेशिवाय त्यांना दुसरा आश्रय नसतो. पर्वताच्या गुहांशिवाय पर्जन्यधारांपासून आपलें संरक्षण करून घेण्यास त्यांस दुसरें कांहीं सांपडत नाहीं. एखादे वेळीं भूक लागली असून सावज सांपडलें नाहीं की, उपाशीं मरण्याची पाळी. रानटी लोकांच्या असल्या कष्टमय स्थितीहून आमची स्थिति किती निराळी झाली आहे! सुधारलेल्या देशांत मांसाहार करण्याची रूढि आहे, ही गोष्ट निराळी; पण उपजीविकेसाठीं प्राणिहत्या अशी करावयाची नाहीं, असा जरी सर्व सुधारलेल्या राष्ट्रांनीं निश्चय केला, तरी संकटावांचून उपजीविका चालविण्यापुरतें धान्य उत्पन्न करण्याची कळा आम्हांस अवगत झाली आहे. इतकेंही करून धान्याची थोडी तूट आल्यास त्याच्या भरतीस घालण्यासारखीं शेंकडों प्रकारचीं फळें, मुळें व कांदे आहेत. मनुष्याच्या चरितार्थास उपयोगीं पडत असलेल्या वनस्पतींच्या नांवांची यादी, आणि त्यांच्या लागवडीविषयीं थोडथोडी माहिती, यांचा एखाद्या पुस्तकांत संग्रह केला, तर तें निदान वेबस्टरच्या कोशाहून मोठें होईल, यांत संशय नाहीं. याचप्रमाणें

शीतोष्णापासून आपला बचाव करण्यासारखीं हजारों साधनें सुधारलेल्या मनुष्याच्या हस्तगत झालीं आहेत. व्याधीला उतार पाडणाऱ्या वैद्यशास्त्राचें पाऊल प्रतिवर्षी एकसारखें पुढें पडत आहे, व औषधींचा संग्रह वाढत आहे. सारांश, रानटी लोकांना ज्या शारीरिक सुखांचा उपभोग कधींही मिळावयाचा नाहीं, तीं सुधारलेल्या समाजांतील कनिष्ठ वर्गांतल्या प्रत्येक व्यक्तीच्या नित्योपभोगांत असतात. उच्च वर्गांतील लोकांस सर्व आवश्यक गोष्टींची अनुकूलता असून जी सुखें रानटी लोकांच्या स्वप्नातसुद्धां कधीं यावयाचीं नाहींत, ती ते प्रतिदिवशी सेवितात. पदार्थांच्या धर्मांचा अभ्यास रात्रंदिवस चालला असल्यामुळें, प्रतिवर्षी नवीन शोध होत आहेत व त्या मानानें सुखाची वृद्धि होत आहे. ज्यानें वाफेची शक्ति मनुष्याच्या कामी लाविता येईल असें शोधून काढिलें, त्यानें त्याच्यावर केवढे उपकार केले ? ज्याला विद्युत्प्रवाहास संदेशवाहक करण्याची युक्ति सुचली त्यानें मनुष्यमात्रास सदैव ऋणी केलें नाहीं काय ? याचप्रमाणें भूगर्भ, रसायन, ज्योतिष, वैद्यक वगैरे शास्त्रांतील प्रत्येक महत्त्वाच्या शोधानें, मनुष्याच्या सुखांत जी भर पाडिली आहे, तिचें यथार्थ परिमाण कोणाच्यानें होणार आहे ? तसेंच पुढें जी पडणार असेल, तिचें बिनचूक अनुमान आज कोण करूं शकेल? इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, युनायटेड स्टेटस् वगैरे प्रमुख देशांत सुखास जी बहुविधता आणि सुगमता आली आहे, ती खरोखरच चकित करण्यासारखी आहे. असें असूनही त्या व इतर देशांतील लोक ती वाढविण्याच्या आणि सुलभ करण्याच्या शोधांत निमग्न झाले आहेत. हा त्यांचा व्यवसाय अव्याहत चालला, तर कांहीं वर्षांनीं सुधारलेल्या देशांतील कोणत्याही व्यक्तीस शरिराचें संरक्षण उत्तम रीतीनें होण्यास अवश्य

लागणाऱ्या सर्व वस्तु स्वल्प आयासानें मिळूं लागतील. इतकेंच नाहीं, तर ऐषआरामाच्याही अनेक वस्तु अत्यंत सुसाध्य होतील, असा बळकट संभव आहे.

---

## पाठ २१ वा.



### ज्ञान.

भाग २ रा.

येथपर्यंत मनुष्याच्या शारीरिक सुखाचा विचार झाला. याहीपेक्षां विशेष महत्त्वाचा विचार त्याच्या सामाजिक स्थितीचा होय. रानटी स्थितींत मनुष्यांचा एकमेकांशीं जो व्यवहार चालतो, त्यांत आणि सुधारलेल्या स्थितीतील त्यांच्या व्यवहारांत जमीनअस्मानाचें अंतर असतें. रानटी स्थितींत मनुष्य आपल्या सुखाचीमात्र पर्वा करितो. आपलें सुख साधण्यासाठीं कोणास कितीही पीडा करावी लागली, तरी ती करण्यास तो तयार असतो. दोन प्रहरच्या सुमारास भूक लागली, व अमक्यापाशीं कांहीं मांस आहे, असें दिसून आलें किंवा ठाऊक असलें, तर तो तें त्याच्यापासून हिसकावून घेण्यास मागेंपुढें पहावयाचा नाहीं. अशा स्थितींत "बळी तो कान पिळी" हा न्याय सर्वत्र जारीनें अंमलांत असतो. कलत्र, पुत्र, कन्या इत्यादि संबंध त्या स्थितींत ठाऊक नसतात. एखादे वेळीं कांहीं सांथ येऊन पारधींच्या जनावरांचा फडशा झाला, तर एकमेकांस आपलें भक्ष्य करण्यास त्यांना वाईट वाटत नाहीं. कांहीं रानटी लोक अशा स्थितींत म्हातारे पुरुष आणि बायका, यांचा पाठलाग करून त्यांस पकडतात, आणि जनावरांप्रमाणें फाडून खातात ! अशा स्थितींत लढाईस उभें राहणें, जखमा करणें, जीव

घेणें, याची कोणासही भीति वाटत नाहीं. तथापि कालांतरानें असल्या शोचनीय स्थितींतूनही मनुष्यें बाहेर पडतात, व प्रथम त्यांना कुटुंबाची कल्पना येऊं लागते. एकदां कुटुंब बनलें कीं, त्यांत राजा, प्रजा, हुकूम, ताबेदारी, आई, बाप, मुलगा, मालकी, वारस, इत्यादि संबंधांचा उद्भव होऊन त्यांचें ज्ञान होऊं लागतें. पुढें कुटुंबांचा विस्तार होतां होतां जात उत्पन्न होते. कुटुंबव्यवस्थेच्या नियमांपैकीं कांहीं नियम टाकून देऊन व कांहींत थोडा-बहुत फेरफार करून ते जातीला लावण्यांत येतात. जातीचें पुढें खेडें होतें; व खेड्यांतून शहर निपजतें. ग्रीक लोकांच्या विद्वत्तेचा, नीतिविचारांचा व राज्यपद्धतींचा रोमन लोकांच्या द्वारें अलीकडील युरोपिअन राष्ट्रांच्या आचारांवर व विचारांवर जरी पुष्कळ परिणाम झाला आहे, तरी या लोकांची राज्य ही कल्पना शहराच्या बाहेर कधीं फारशी गेली नाहीं, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. ॲथी-निअन्स, स्पार्टन्स, थीबन्स, या प्रसिद्ध ग्रीक लोकांपैकीं प्रत्येकास अथेन्स, स्पार्टा, थीब्स या शहरांबाहेर आपलें कांहीं नाहीं, असें नेहमीं वाटत असे. तथापि कालगतीनें ही कल्पनाही लयास जाऊन रोमन लोकांच्या वेळीं राष्ट्राची कल्पना उत्पन्न होऊन दृढ झाली. अलीकडे अनेक राष्ट्रें अन्योन्यांच्या कल्याण-पाशानें सदैव एकत्र बद्ध करण्याच्या कल्पना निघूं लागल्या आहेत. व एका जर्मन इतिहासकारानें असें भाकीत करून ठेविलें आहे कीं, कालांतरानें प्रत्येक खंड एकेक राष्ट्र बनणार आहे, व या सर्व खण्डराष्ट्रांत अज्ञातपूर्व अशी मैत्री, परोपकारबुद्धि, संपत्ति, ज्ञान आणि नीति यांचा प्रसार होणार आहे. रानटी स्थितींत ज्या 'स्व'ची एवढी प्रतिष्ठा वाटत असते, त्याची मातब्बरी हळूहळू कमी होऊन त्यावरील प्रेमाचा कांहीं भाग प्रथम कुटुंबां-

तील आप्तांस व पुढें जातिबांधवांस, ग्रामबांधवांस, देशबांधवांस व अखेरीस सर्व मनुष्यजातीस अर्पावा असें वाटूं लागतें. कांहीं सानुकंप तत्त्ववेत्त्यांच्या प्रेमविषयांत समग्र मनुष्यजातीचाचसा काय, पण साऱ्या जीवसृष्टीचा सुद्धां समावेश होतो ! कुटुंब, जात, खेडें, शहर व राष्ट्र, यांच्या प्रथमावस्थेंत समाजाच्या अवयवांच्या अन्योन्यसंबंधांत पराकाष्ठेचें काठिण्य असतें. गृहपति, जात्यग्रणी, ग्रामाधिकारी, नगरनायक व राष्ट्राधिपति हे आपआपल्या ताब्यांतील प्रजेवर अतिशय सक्तीचा अंमल करितात. अखण्ड स्वातंत्र्याचा अनुभव त्यांनामात्र मिळत असतो. पारतंत्र्याचें सारें दुःख आज्ञांकितांच्या कपाळीं येतें. तथापि रानटी स्थितीतील सतत संगरावस्थेपेक्षां ही अवस्था शेंकडों पट बरी. कुटुंबांतील प्रधान पुरुषानें इतरांवर, व राजानें प्रजेवर कितीही जुलूम केला, तरी एकंदरीनें समाजावयवांस अशा स्थितींत रानटी स्थितीपेक्षां अधिक सुखोपभोग होतो. या स्थितींत कांहीं काळ लोटल्यावर या अनियंत्रित एकाधिकाराच्या कडकपणास कांहीं उतार पडूं लागतो. कुटुंबांत बायकोस व वयांत आलेल्या मुलांस, आणि राज्यांत मोठमोठ्या घराण्यांस कांहीं हक्क मिळूं लागतात, व हळुहळू घरांतील कर्त्या पुरुषाच्या आणि राष्ट्रांतील राजाच्या अप्रतिहत सत्तेस त्यांच्या वजनाचा आळा पडूं लागतो. कुटुंबसंरक्षणाचा भार कर्त्या पुरुषाच्या डोकीवर पडत असल्यामुळें राजसत्तेप्रमाणें त्याची सत्ता अगदीं संपुष्टांत येऊ शकत नाहीं व ती येणेंही इष्ट नाहीं. कारण साधें कुटुंब आणि राजकुटुंब यांत एक जबरदस्त भेद आहे; तो हा कीं, साध्या कुटुंबांतील प्रजा अल्पवयस्क आणि अज्ञान असते; राजकुटुंबाची तशी गोष्ट नाहीं. राजाला वयांत आलेल्या समजूतदार लोकांवर अम्मल करावयाचा असतो; त्यामुळें त्याच्याकडून त्याच्या अधिकाराचा फारच दुरुपयोग झाला,

तर त्याबद्दल त्याला प्रायश्चित्त भोगावें लागतें. बहुतेक देशांतील राजांनीं आपल्या अधिकाराचा दुरुपयोग केल्यामुळें, कांहीं देशांत राजाचे अधिकार अतिशय मर्यादित केले आहेत, व कांहीं देशांनीं तर एकसत्तात्मक राज्यपद्धति मुळींच टाकून देऊन तिच्याऐवजीं बहुसत्तात्मक किंवा लोकसत्तात्मक राज्यपद्धति स्थापिली आहे. सारांश, समाज सुव्यवस्थित चालण्यास पुरे इतकें पारतंत्र्य ठेवून बाकी होईल तितकें स्वातंत्र्य त्यांतील प्रत्येक व्यक्तीस अनुभवूं द्यावयाचें असा मानवी सुधारणेचा स्पष्ट कल आहे, व या कलामुळे कुटुंबांत व राज्यांत प्रेम आणि सौजन्य यांची वृद्धि होत आहे. सध्यां सुशिक्षित आईबापें मुलांवर जी प्रीति करितात, सध्यां समाजावयवांत अन्योन्यांविषयीं जी कळकळ दृष्टीस पडते, सुधारलेल्या राष्ट्रांतील प्रजेस सध्यां ज्या राजकीय हक्कांचा उपभोग घेतां येत आहे, ती प्रीति, ती कळकळ व ते हक्क अस्तित्वांत येण्यास मनुष्याच्या ज्ञानवृद्धीहून दुसरें कांहीं कारण आहे असें कोणी म्हणूं शकेल काय? एकदां जवळच्या आप्तांस किंवा शेजाऱ्यांस ठार मारणें, किंवा फाडून खाणें मनुष्यांस अवघड वाटत नसे! आतां पोटच्या पोरासमुद्धां तीव्र शब्दांचा प्रहार करवत नाहीं! पूर्वीं अपराध्यास ज्याचा तो मन मानेल तो दंड करीत असे व त्याच्यापासून होणाऱ्या बऱ्यावाईट परिणामांचें फळ भोगण्यास तयार असे. आतां क्षुल्लक अपराधाबद्दलदेखील कोणी कोणास स्वतः दंडीत नाहीं. तंटा तोडून घेण्यासाठीं सरकारनें नेमिलेल्या तिऱ्हाईत न्यायाधिशाकडे जाण्याची चाल सर्वत्र पडत चालली आहे. परद्रव्याचा अपहार करण्याची बुद्धि, अविश्वास, दीर्घद्वेष, क्रौर्य, निष्कारण निंदा, मात्सर्य, कलहरति वगैरे समाजविघातक दुर्गुणांचा लोप झपाट्यानें होत चालल्यामुळें प्रत्येकास शांतीचा

आणि सुखाचा अधिकाधिक उपभोग मिळूं लागला आहे. हा सारा प्रताप ज्ञानाचा नव्हे तर कशाचा?

---

## पाठ २२ वा.



### ज्ञान.

#### भाग ३ रा.

आतांपर्यंत ज्ञानापासून होणाऱ्या शारीरिक व सामाजिक सुखांचें दिग्दर्शन केलें. या दोहोंपेक्षांही श्रेष्ठतर असा सुखाचा आणखी एक वर्ग राहिला आहे; तो कोणता म्हणाल, तर मानसिक सुखाचा. या सुखापुढें वरील सुखें अगदी तुच्छ आहेत. इतकें खरें आहे कीं, या सुखाची गोडी मनुष्यास सहसा लागत नाहीं. पण जर त्याच्या सुदैवानें त्याला ती एकदां लागली, तर त्याच्यासारखा त्रिभुवनांत सुखी प्राणी मिळावयाचा नाहीं. पृथ्वीवर ज्ञानाशिवाय अशी दुसरी कोणतीही वस्तु नाहीं, कीं जिचा कंटाळा न येतां किंवा जिच्यापासून शरिरास किंवा मनास कोणताही व्याधि न जडतां, जिच्या योगानें वृत्ति आमरण आनंदमय राहूं शकेल. जे पुरुष ज्ञानसंपादनांत निमग्न झालेले असतात, त्यांसच या अमोलिक सुखाचा निरंतर लाभ होतो. अलेक्झांडर, सीझर, नेपोलियन, तैमूरलंग झांझिझखान, इत्यादि जगत्प्रसिद्ध शूरांना ज्या सुखाचा अनुभव कधीं झाला नाहीं, तुर्कस्थान, इराण, चीन, हिंदुस्तान इत्यादि विस्तृत देशांच्या बादशहांस अमर्याद सत्तेपासून किंवा अगणित द्रव्यापासून जें सुख कधींही प्राप्त झालें नाहीं, रमणीय उद्यानें व विशाल मंदिरें यांत जें सांपडावयाचें नाहीं, जें सुवासांत किंवा सुग्रासांत नाहीं, जें दानानें दुणावतें वार्द्धक्यानें ज्याची वृद्धि होते, अतिसेवनानें ज्याचा वीट न

येतां अधिक क्षुत्क्षोभास जें कारण होतें, तें सुख विद्वानांसमात्र प्राप्त होतें. लक्ष्मी आणि सरस्वती यांचा नित्य कलह आहे. लक्ष्मीच्या आराधकांची संख्या अतिशय मोठी. सरस्वतीचा भक्तसमूह अत्यंत मर्यादित. सरस्वतीहून लक्ष्मी प्रसन्न करून घेणें विशेष सुलभ. सरस्वतीच्या प्रसादापेक्षां लक्ष्मीच्या प्रसादाचें बाह्य स्वरूप अतिशय मोहक. सामान्यतः [illegible] लक्ष्मीपूजकांस जगांत विशेष मान. असें असतां, एकंदरीनें लक्ष्मीपेक्षां सरस्वती जगाची विशेष उपकर्त्री झाली आहे, असें सुविचारान्तीं कोणासही दिसून येईल. विश्वाच्या विशाल स्वरूपाच्या विचारांत जो गढून गेला, व ज्याला ही पृथ्वी एखाद्या क्षुल्लक वा[illegible] दिसूं लागली, त्याला तीवरील कांहीं मुंग्यांस दुसऱ्यापेक्षां दोन दाणे अधिक सांपडले, किंवा कांहींस मुळीच न सांपडल्यामुळें रिकामें फिरावें लागलें, म्हणून खेद होणार आहे काय? इराणची बादशाही पादाक्रांत करून डरायसाच्या सिंहासनावर पाय ठेवतांना वीरशिरोमणि अलेक्झान्डरास जो आनंद झाला असेल, त्यापेक्षां अखिलपरमाण्वंतर्गत गुरुत्वाकर्षणधर्म शोधून काढतांना न्यूटनास कमी आनंद झाला असेल, असें आम्हास वाटत नाहीं. सीझर, फ्रेडरिक धि ग्रेट, नेपोलियन वगैरे अतुलप्रतापी नरसिंहांनीं जे विजयध्वज लाविले, त्यांहून साक्रेतीस, गौतमबुद्ध, शंकराचार्य, खिस्त, वगैरे नरपुंगवांचे विजयध्वज विशेष स्पृहणीय, विशेष कल्याणकारक व विशेष चिरस्थायी आहेत, असें आमचें मत आहे. शूर किंवा धनाढ्य पुरुष स्वतःचें, किंवा फारच झालें, तर आपल्या देशाचें कल्याण चिंतितो; ज्ञानी पुरुषाला समग्र वसुंधरा स्वकीय कुटुंबवत् वाटत असून त्याच्या ज्ञानाचा फायदा सर्व मनुष्यतेस होतो. ज्योतिष्यांनीं, पदार्थवेत्त्यांनीं, राजशास्त्रकर्त्यांनीं व तार्किकांनीं

केलेल्या शोधांचा प्रसार पृथ्वीच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंका-पर्यंत होऊन त्यांपासून होणाऱ्या फायद्यांचे भागीदार थोड्या कालांत सर्व राष्ट्रें होतात; व अशा रीतीनें आपल्या हातून जगाचें कल्याण होत आहे, असें मानण्याचा अधिकार ज्यांना प्राप्त झाला असेल, त्यांच्या मनांस होणाऱ्या समाधानाची खरी थोरवी, आणि त्याचें खरें स्वरूप कोण सांगूं शकेल? द्रव्य, भूमि, इत्यादिकांच्या प्राप्तीसाठीं अहर्निश अश्रांत परिश्रम करणाऱ्याच्या मनास जसें स्वास्थ्य असत नाहीं, त्याप्रमाणें एखादा बिकट शास्त्रीय प्रश्न सोडविण्यांत व्यग्र झालेल्याच्या मनासही स्वास्थ्य असत नाहीं. पण पहिल्याच्या आणि दुसऱ्याच्या अस्वास्थ्यांत विलक्षण अंतर असतें. पहिल्याच्या अस्वास्थ्यांत कधीं भीति, कधीं मत्सर, कधीं दुर्लौकिक, या दुष्ट मनोविकारांचें मिश्रण असतें. विद्वानांचें अस्वास्थ्य या विकृतींपासून अत्यंत निर्लेप असतें. ऐहिक वस्तूंस अविनाशी मानून त्यांवर अमर्याद प्रेम ठेवणाऱ्या अज्ञान प्रापंचिकांस त्यांचा वियोग झाला असतां अनान्वित दुःख होतें; विद्वानास अशा वस्तूंचा संयोग आणि वियोग अपायकारक होत नाहीं. कारण, त्यांच्या क्षणभंगुरत्वाविषयीं त्याची खात्री झाली असल्यामुळें, तो त्यांच्याविषयीं उदासीन असतो. गुराखी गुरें हाकतात, पंतोजी मुलास धाकांत ठेवतात, व जुलमी राजे प्रजेस आज्ञेंत ठेवितात. पण चाबकानें, काठीनें किंवा तरवारीनें अंमल चालविण्यांत मनुष्यास फारसें भूषण आहे, असें नाहीं. ज्यानें आपल्या बुद्धिसामर्थ्यानें व साधुत्वानें जगास वश केलें, तो खरा शास्ता; व त्याचा अंमल खरोखर भूषणावह होय. तसेंच, अंमल करणाऱ्यास जें समाधान होतें व जें मोठेपण वाटतें, तें ज्या तऱ्हेच्या प्रकृतींवर अंमल करावयाचा असेल, त्याच्या योग्यतेप्रमाणें कमी अधिक होतें. दुर्बुद्ध जनावरांवर, अज्ञान मुलांवर, भिऱ्या प्रजेवर अंमल

करणारांची थोरवी काय, व त्यांना समाधान कसलें होणार ? कॉंट, मिल्ल, शंकराचार्य, यांसारख्या पंडितांनीं राज्यविषयक, नीतिविषयक व धर्मविषयक वादांत मिळविलेला जय, आणि व्यवहारज्ञ, शास्त्रज्ञ व धर्मज्ञ यांच्या मनांवर बसविलेला अंमल, यांसमात्र जय आणि अंमल हीं नांवें यथार्थ आहेत. पण या सर्व पराक्रमांहून ज्ञानाचा आणखी एक पराक्रम आहे. त्यापुढें बाकीचे सारे पराक्रम निस्तेज दिसूं लागतात. ज्ञानाच्या योगानें मनुष्यांस मृत्यूचें भय नाहींसें होतें. अज्ञान मनुष्यास प्रत्येक बाह्य वस्तु अविनाशी वाटत असून तिजवर त्याचें उत्कट प्रेम जडलेलें असतें. यामुळें तिचा आणि त्याचा वियोग झाला, तर त्याला पराकाष्ठेचें दुःख होतें. कोणत्याही वस्तूच्या वियोगापासून होणारें दुःख त्या वस्तूवर असलेल्या प्रेमाच्या मानानें होतें. धनलोभ्यास पैसा बुडाला असतां, भार्यारतास भार्येचा वियोग झाला असतां, पुत्रवत्सलास पुत्रास मृत्यु आला असतां अत्यंत दुःख होतें. पण ज्याला या सर्व वस्तु विनाशी आहेत, असें ज्ञान झालें आहे, त्याला त्यांच्या वियोगापासून इतका खेद होत नाहीं. ज्याला आरंभ व वृद्धि आहे, त्याचा केव्हां तरी ऱ्हास झालाच पाहिजे, हें तत्त्व ज्याच्या मनांत पूर्णपणें खिळलें असेल, त्याला आप्तांच्या मरणाचेंचसें काय, पण स्वतःच्या मरणाचेंसुद्धां भय वाटेनासें होईल. फुटणारें केव्हां तरी फुटणार, जळणारें जळणार, मोडणारें मोडणार, मरणारें मरणार. मृत्तिकेचा घट फुटला म्हणून ज्याप्रमाणें शोक करीत बसणें नीट नाहीं, त्याप्रमाणें पंचभूतांपासून निर्माण झालेला देह फिरून पंचतत्त्वांस मिळाला, म्हणून शोक करण्यांत अर्थ नाहीं. ज्याप्रमाणें तेल सरलें कीं, दिवा मालवलाच पाहिजे, त्याप्रमाणें ज्या कारणांच्या संयोगानें जीवित्वास आरंभ होऊन त्याचें वर्धन होत असतें, त्यांचा

वियोग झाला कीं, देहावसान झालेंच पाहिजे. ज्याच्यी अंतःकरणांत कार्यकारणांचा अन्योन्यसंबंध नीट बिंबून गेला, त्याला मृत्यूची भीति फारशी वाटावयाची नाहीं. हा संबंध समजण्यास ज्ञानाशिवाय दुसरें साधन नाहीं.

याशिवाय ज्ञानाचें आणखी एक असाधारण सामर्थ्य आहे; तें हें कीं, त्याच्या योगानें मनुष्यास एक प्रकारचें अमरत्व प्राप्त होतें. व्यासवाल्मीकि, मनुयाज्ञवल्क्य, बुद्धशंकराचार्य, ख्रिस्तसाक्रेटीस, हे ज्ञानवान् पुरुष होऊन गेल्यास अनेक वर्षें लोटलीं; पण त्यांच्या नावांचा विसर जगास अजून पडला नाहीं, व पुढेंही पडेल असें वाटत नाहीं. कीर्तिरूपानें हे निरंतर राहणार. जुने ग्रीक लोक गेले; पण होमर, डिमॉस्थेनीस, आणि ॲरिस्टॉटल हे अद्यापि आहेत. जुने रोमन लोक गेले; पण व्हर्जिल, सिसरो आणि जस्टीनिअन हे अद्यापि आहेत. पृथ्वीतलावर मनुष्याची उत्पत्ति झाली, त्याच वेळीं ज्ञाननदी उगमस्थानी अतिसूक्ष्मरूपानें आविर्भूत झाली. तेव्हांपासून आतांपर्यंत तिचें पात्र ठिकठिकाणचे प्रवाह त्यांत येऊन मिळाल्यामुळें वाढत चाललें आहे व त्यांत प्रत्येकाच्या विशिष्ट वर्णाची कांति मधून मधून स्पष्टपणें दृग्गोचर होत असल्यामुळें त्याला अत्यंत स्पृहणीय वैचित्र्य व रमणीयत्व आलें आहे. कालांतरानें या ज्ञाननदीस महानदत्व प्राप्त होऊन ती अनंतसहस्रमुखांनीं सुखोदधीस जाऊन मिळेल, अशी विचारशील मनास भावना होते.

गो. ग. आगरकर. केसरीचे निवडक निबंध.

---

# पाठ २३ वा.



## विरोधाभास.

नानांच्या वर्तनावरून सारासार विचार करून पाहतांना जसे ते आम्हांस दिसले, तसेच सर्वांस दिसले पाहिजेत, अशी अपेक्षा करणें भ्रममूलक होणार आहे. गोकुळांतून निघून श्रीकृष्ण मथुरेला गेले, त्या वेळी त्या मूर्तीच्या प्रभावानें निरनिराळ्या प्रेक्षकांच्या मनांत जशा भिन्न वृत्ति उद्भवल्या,—म्हणजे, कोणास ती मूर्ति कृतांतासारखी, कोणास दयानिधीसारखी, कोणास रंगेल आणि कोणास उग्र वाटली—तद्वतच नानांच्या संबंधानें पूर्वग्रहांमुळें निरनिराळे मनोविकार जागृत झाल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. बर्क, ग्लॅडस्टन इत्यादिकांच्या पुण्यचरित्रांचें अवलोकन करितांना सकृद्दर्शनीं असें वाटतें कीं, ज्या बर्कनें 'अमेरिकन लोकांस स्वातंत्र्य द्या', असें सहस्रशः कंठरवानें सांगितलें, त्यानेंच फ्रेंच लोक जुलमाच्या बादशाही पद्धतीशीं तनमनधन घालून लढत असतां त्यांच्याविरुद्ध आकाशपाताळ एक करून टाकावे, हें विसंगत आहे; अथवा, ज्या ग्लॅडस्टन साहेबांनीं आयरिश लोकांविरुद्ध दहावीस वर्षांपूर्वीं खटपट केली होती, त्यांनीच १८८९ सालीं 'आयरिश लोकांस स्थानिक स्वातंत्र्य द्या', असें मोठ्या आग्रही निकरानें सांगावें, हेंही विसदृशच होय; व या दोन्ही प्रसंगीं आपल्या वयोवार्द्धक्यानें हे दोन्ही महात्मे चकले, असें वरवर वाचणारा गृहस्थ म्हणून जातो. पण तींच चरित्रें त्यानें तात्त्विक बुद्धीनें वाचल्यावर दोघांहीं पुण्यश्लोकांचा खरोखर मनोभाव काय होता, हें सूक्ष्म रीतीनें पाहिल्यास त्यास कळून येईल कीं, राज्य चालविण्याचे अगर

राजनीतीचे जे अभंग सिद्धान्त आहेत, त्यांस धरूनच दोन्ही प्रसंगीं पूर्वोक्त महापुरुषांचें वर्तन झालेलें आहे. ह्याचप्रमाणें शांत व आग्रह-शून्य बुद्धीनें नानांच्या चरित्राचें पर्यालोचन केलें असतां असें आढळून येईल कीं, जे नाना पानिपतच्या लढाईत शेवटपर्यंत भाऊ-साहेबांबरोबर समरांगणांत उभे होते, ज्यांनीं स्वतःच्या शिरावर जबाबदारी घेऊन थोरल्या माधवरावांस त्यांच्या डोळ्यांदेखत कर्जमुक्त केलें, ज्यांनीं नारायणरावसाहेबांस 'सत्यमपि अप्रियम्' असा उपदेश करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं, ज्यांनीं खून झालेल्या पेशव्यांच्या दहाव्या दिवशींच, माधवरावांस कैद करणाऱ्या व नारायणरावांचा खून करणाऱ्या राघोबास अगर त्याच्या वंशजांस नमस्कार करावयाचा नाहीं, असा संकेत करून नानासाहेबांचा वंश स्थापण्यासाठीं कारस्थानें केलीं, व गोहत्या, ब्रह्महत्या, वगैरे करणाऱ्या महापातकी परंतु शिरजोर व रणशूर राघोबाशीं, मराठी राज्य चिरंतन कायम व्हावें एतदर्थ द्वेष संपादन केला, शिंदे, होळकर, सखारामबापू, मोरोबा-दादा, इत्यादि प्रचंड धेंडें भीतीनें अगर स्वार्थसाधनपर बुद्धीनें भेद-रून जाऊन राघोबाच्या पक्षास मिळालीं अगर मिळण्याच्या बेतांत असतां, ज्या एकट्या नानांनीं राघोबाचा व त्याचे पाठीराखे यांचा यथायोग्य समाचार घेऊन त्यांस हार खावयास लाविलें, व होळकर, शिंदे यांस द्रव्याच्या आशेनें, स्वामिभक्तीच्या मोहानें व अधिकारा-च्या लालुचीनें वश करून घेऊन त्यांस हिंदुस्थान सर करावयास पाठविलें, ज्यांनीं सवाईमाधवरावांचें लग्न मोठ्या थाटानें करून सर्व हिंदुस्थानास पेशव्यांचें ऐश्वर्य दाखविलें, व पेशव्यांची अप्रतिहत सत्ता प्रगट केली, ज्यांनीं हैदर, टिपू, निझाम यांची अनेक वेळा बुद्धिबळानें अगर तरवारीच्या जोरानें खोडकी मोडून त्यांच्याकडून करभार वसूल करून घेतला आणि पेशव्यांचें स्वामित्व कबूल करविलें, ज्यांच्या

बुद्धिकौशल्यानें महादजी शिंद्यासारख्या डोईजड झालेल्या व मराठे-शाहीच्या कोटाचा भेद करून स्वतःचेंच राज्य स्थापण्याचा वाममार्ग अनुसरणाऱ्या फौजबंद सरदाराचें कांहीं एक चालूं दिलें नाहीं, व शेवटीं ज्यांचा पक्ष महादजीस स्वीकारावा लागला, ज्यांच्या वसुलाच्या, न्यायाच्या, बंदोबस्ताच्या पद्धतीपुढें कदाचित् हल्लींच्या पद्धतिही फिक्या पडतात कीं काय, अशी भीति उत्पन्न होण्यास सबळ कारणें आहेत, त्याच नानांनीं दौलतरावासारख्या पोरसवदा शिंद्याच्या शब्दासरशीं पुण्यांतून पाय काढावा, किंवा ज्यांनीं राघोबाचा पिच्छा पुरविण्यासाठीं अश्रांत श्रम केले, त्यांनींच राघोबाच्या पुत्रास ( बाजीरावास ) गादीवर बसविण्यासाठीं भगीरथ श्रम करावे, हा प्रकार खरोखरीच चमत्कारिक होय, असें सकृद्दर्शनी वाटतें. परंतु मराठी राज्य हाच कोणी आपला स्वामी, असा ज्यांनीं लहान-पणापासून कित्ता वळविला, त्यांनीं स्वतःच्या कल्याणाकडे, द्रव्या-कडे, इभ्रतीकडे न पाहतां केवळ स्वदेशस्वातंत्र्यासाठीं आपले शब्दही परत घेतले; तथापि नानांचें वर्तन सुसंगतच आहे. तेथें लावालावीचा, भ्याडपणाचा अगर स्वार्थलाभाचा प्रश्न मुळींच येत नाहीं. आपल्या मराठ्यांच्या राज्यांत फूट पडूं नये, आणि मराठे-शाहीच्या अभेद्य प्राकारास छिद्रें पाडणारी यादवीही माजूं नये, राज्यसाधनाचें काम चालू रहावें, आणि आपली प्रजा सुरक्षित व संतुष्ट अशी रहावी, हीं नानांच्या राजनीतीचीं मूलतत्त्वें होतीं; व हीं कायम ठेवण्यासाठीं त्यांस केव्हां केव्हां स्वार्थत्याग, स्वप्रतिज्ञाभंग, नीच लोकांशींही संगति, इत्यादि गोष्टी कराव्या लागल्या. सारांश, शिवाजी महाराजांनीं अगर त्यांच्या वडिलांनीं ज्या वृक्षाचें रोप लाविलें, संताजी, धनाजी व बाजीराव यांनीं ज्यास कुंपणें घातलीं, नानासाहेब पेशव्यांनीं पाणी घालून ज्याचें संगोपन केलें, पानिपतची

वीज कडाडून झाड जळून जाण्याच्या बेतांत आलें असतां माधवरावांच्या श्रमांनीं ज्यास पुनः पालवी फुटली, परंतु गृहकलहाचा दुर्धर रोग जडल्यामुळें जो वृक्ष वठून जाण्याच्या मार्गास लागला होता, तो आमचा सौभाग्यरूपी स्वातंत्र्यवृक्ष नानांच्या छत्राखालीं फलद्रूप होण्याच्या रंगांत येत होता. महादजी गेले नसते, माधवराव यांनीं आत्मघात केला नसता, रावबाजी शहाणे निघाले असते, तर आम्ही स्वराज्यवृक्षाच्या शीतळ छायेखालीं आजतागाईत राहिलों असतों; परंतु सर्वच 'स्वप्नो नु माया नु परिभ्रमो नु' असा प्रकार होऊन, आम्ही पराधीनतेच्या फेऱ्यांत सांपडलों आहों. असो. मुख्य ध्यानांत ठेवण्याची गोष्ट ही आहे की, नानाचें सर्व आयुष्य पूर्वोक्त तत्त्वांचें अनुसरण करण्यांत गेलें, व त्यांच्या हयातीत तो वृक्ष जोमांत राहिला, ही गोष्ट वाचकांचे मनांत ठसली, म्हणजे आम्ही कृतकार्य झालों, असें समजूं.

चिं. गं. भानू. नाना आणि महादजी.

---

## पाठ २४ वा.



## हिंदुधर्माचीं पंचमहातत्त्वें.

### भाग १ ला.

ईश्वराची व्यापकता हें हिंदुधर्माचें पहिलें तत्त्व आहे. कोणा अडाणी हिंदूसही ईश्वर कोठें आहे, असें विचारलें असतां, तो जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं, सर्वांच्या अंतर्यामीं भरून उरला आहे, असें तो उत्तर देईल. ईश्वराचा अंश जेथें नाहीं, असें कांहींच नाहीं. या तत्त्वाच्या अंगीकारानें जेथें श्रद्धा बसेल, जेथें उपकारीत्व दिसेल, जेथें ईश्वराच्या गुणांचा बोध होण्यास, स्मरण

होण्यास कारण असेल, तेथें हिंदूंमध्यें पूज्यभाव उत्पन्न होतो. अश्वत्थ-वटादि महान् वृक्ष छायादानानें आपलें उपकारीत्व व्यक्त करितात. गंगायमुनादि नद्या जलदानानें तें प्रकट करितात; तृणधान्यादिदानानें पृथ्वी तें स्पष्ट करिते. साधुसंत वरिष्ठ ज्ञानानें, सदुपदेशानें, परोपकारानें व इतर श्रेष्ठ गुणांनीं आपणांमधील विशिष्ट ईश्वरी अंश अनुभवास आणून देतात. श्रद्धा किंवा भाव यांमुळें मूर्तींमध्येंही ईश्वरी अंश दिसूं लागतो. केवळ नामस्मरणानेंही मनास ईश्वराची प्रतीति होते. याप्रमाणें ईश्वराच्या व्यापकतेचें तत्त्व सर्व हिंदूंच्या मनांवर परिणाम करीत आहे, व ईश्वरासंबंधानें जी पूज्यता पूर्णत्वानें उत्पन्न व्हावी असें वाटतें, तिचा अनेक मार्गांनीं आम्हांमध्यें प्रादुर्भाव होतो. आमचें वास्तव्य ईश्वरांतच आहे, असें आम्हांस [1] भासतें. ईश्वराची व्यापकता ख्रिस्ती तत्त्ववेत्त्यांस मान्य असून त्यांनीं तिचा धर्मतत्त्वांत संग्रह केलेला नाहीं, हें आश्चर्य आहे.

ईश्वर आणि मनुष्य, परमात्मा आणि आत्मा, यांमध्यें राजा आणि प्रजा यांच्यासारखा मूळ संबंध आहे, हें हिंदुधर्माचें दुसरें तत्त्व होय. या तत्त्वान्वयें ईश्वराकडून जें जें आपणांस ज्ञान प्राप्त होतें, त्याचा अंशमात्र तरी ईश्वराप्रीत्यर्थ आपण अर्पण केला पाहिजे. [2] ईश्वरापुढें आपणांस नम्र करून घेण्याची व त्याचे उपकार प्रत्यक्ष-

---

१ त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् । वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥ वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च । नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोस्तु ते सर्वत एव सर्व । अनंत-वीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥

—भगवद्गीता, अध्याय ११; श्लोक. ३८-४०.

२ पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतमश्नामि

पणें मानण्याची ही योजना आहे. ईश्वरास कोणतीही गोष्ट कमी आहे, ती पुरविण्याचा यांत उद्देश नाहीं. परंतु या योजनेचा भक्ति, त्याग आणि परोपकार यांशीं पुढें संबंध जडतो. व त्यापासून अनेक उत्कृष्ट मार्मिक रूढि उत्पन्न होतात.

फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत राजा आणि प्रजा यांचा संबंध अतिशय निकट समजला गेला आहे. देशास राजा नाहीं, यासारखें दुसरें कोणतें अरिष्ट नाहीं, असें पूर्वींपासून प्रजेस वाटत आहे. राजा म्हटला, म्हणजे प्रजाजनांचा मायबाप, बंधुसोयरा होय. हाच संबंध भक्तिभावामुळें ईश्वराशींही लागू झाला. त्यामुळें साधुसंतांनीं ईश्वराची प्रार्थना करीत असतां भक्तिरसानें सद्गदित होऊन, 'देवराया' 'बापा पांडुरंगा' 'विठाई माउली' इत्यादि प्रकारांनीं ईश्वरास आळविलें आहे. मातापुत्रांचा जो संबंध, तो ईश्वराशीं दुसऱ्या कोणत्याही धर्मांत जोडलेला नाहीं. पितापुत्रांच्या संबंधापेक्षां मातापुत्रांचा संबंध अधिक निकट आहे. त्यामुळें मनुष्याची अनाथता, व ईश्वराची वत्सलता उत्कृष्टपणें व्यक्त होते. जों जों मन भक्तिमार्गास लागतें, तों तों ईश्वरावरील भरंवसा वाढत जातो; त्याकडे आपला ओढा अधिक होतो; मग 'त्वमेव माता च पिता त्वमेव त्वमेव बंधुः स्वजनस्त्वमेव' अशी अंतःकरणाची ईश्वरपरायणवृत्ति [1]होते.

संसारांत अन्नपानादि कांहीं नित्यकर्मे खेरीज करून बाकी मनुष्यांचीं सर्व कृत्यें मातापिता, कन्यापुत्र, इष्टमित्र यांस आपण

प्रयतात्मनः॥ यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्। यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥ —भगवद्गीता, अध्याय ९; श्लो. २६-२७.

१ अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते। तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥ —भगवद्गीता, अध्याय ९; श्लोक. २२.

प्रिय व्हावें, म्हणून योजिलेलीं असतात. ज्ञानार्जनाचे व द्रव्यार्जनाचे प्रयास, व ऐहिक दुःख, कष्ट, चिंता, विपत्ति, हीं सर्व सोसण्यास मनुष्य जो तयार होतो, तो मुख्यत्वें कुटुंबाच्या व बांधवांच्या हिताकरितां होय. भक्तिभावानें ईश्वर हा परमश्रेष्ठ बंधु झाल्यावर त्यास प्रिय व्हावें म्हणून—त्याचा संतोष व्हावा म्हणून—कोणतें कृत्य करण्यास, कोणतें दुःख सोसण्यास, मनुष्य तयार होणार नाहीं ? ईश्वरास प्रिय होण्याचा मार्ग म्हटला, म्हणजे त्याच्या गुणांचें अनुकरण करणें, त्याच्या आज्ञा पाळणें, त्यानें दिलेल्या उत्कृष्ट प्रेरणांस म्हणजे मनोदेवतेस अनुसरणें हा होय. ईश्वराचा संतोष होण्यास काय करावें ? हेंच कीं, सृष्टीमध्यें ईश्वरी अंशानें प्रेरित अशा जेवढ्या व्यक्ति आहेत, ज्यांस सुखसंतोष होण्याची शक्यता आपणांस दिसत आहे, त्या सर्व व्यक्तींस आपल्या आचरणानें संतोष द्यावा; आपलें शरीर, आपलें बल, आपली बुद्धि व आपली संपत्ति हीं सर्व आपणांभोंवतीं सर्वत्र संतोष दिसावा याकरितां खर्च केलीं, म्हणजे अर्थात् ईश्वराचा संतोष झाला. अशा प्रकारें आपलें जीवितच संतोषमय होतें. या कार्याकरितां जो स्वसुखत्याग अथवा द्रव्यत्याग, त्यासच कित्येक वेळा धर्म ही संज्ञा लावण्यांत येते. या गोष्टीचीं व्यवहारांत प्रत्यक्ष उदाहरणें अनेक आहेत. दीन-दुबळ्यांस साहाय्य करणें, परोपकारार्थ तळीं, धर्मशाळा वगैरे बांधणें, ईश्वराच्या ध्यानस्मरणपूजनोत्सवाकरितां मंदिरें बांधणें, ईश्वराचें मोठें कुटुंब म्हणजे भूतमात्र त्याविषयीं अनुकंपा बाळगणें, या सर्व कृत्यांकडे यथाशक्ति व्यय करणें, किंबहुना सर्वस्व अर्पण करणें, व एकंदरीनें जगाच्या संतोषांतच ईश्वराचा संतोष मानणें, हाच धर्म, अथवा श्रेष्ठतम धर्म, असें अनेक महात्म्यांनीं मानिलें आहे. हिंदुधर्मांत भक्तिमार्ग व तदनुसार धर्माचार आणि त्याग—

माहात्म्य हीं कशीं परंपरेनें उत्पन्न होत गेलीं, तें या दुसऱ्या धर्म-तत्त्वावरून ध्यानांत येतें.

---

## पाठ २५ वा.



### हिंदुधर्माचीं पंचमहातत्त्वें.

#### भाग २ रा.

हिंदुधर्माचें तिसरें मूलतत्त्व अनृणत्वें हें आहे. कोणाचेंही ऋणी राहूं नये. सर्व प्रकारच्या ऋणांची प्रथम फेड झाली पाहिजे. जो मनुष्य समाजांत राहतो, त्याचा अनेकांशीं संबंध येतो व त्या-कडून अनेक प्रकारें त्यास फायदा होत असतो. हा फायदा प्रत्यक्ष असेल, किंवा परोक्ष असेल, परंतु ज्याकडून तो मिळाला, त्याचें आपण अनृणी झालें पाहिजे. मातापितरांनीं जन्म देऊन व ममतेनें संवर्धन करून आपणांवर उपकार केलेले असतात; बंधुवर्गानें प्रेम दाखवून, उपदेश करून, प्रसंगीं साहाय्य देऊन उपकार केलेले असतात; त्याप्रमाणेंच ज्ञान देऊन व विनय शिकवून गुरु आपणांवर उपकार करितात. परोपकारी पुरुषांचे व वस्तुतः सर्व लोकांचे आपण प्रत्यक्ष किंवा परोक्ष रीतीनें ऋणी होतों, व याच न्यायानें पूर्वजांचे उपकार स्मरणें आपणांस भाग पडतें. किंबहुना भूतमात्राचे आपण

---

१ ऋणैश्चतुर्भिः संयुक्ता जायंते मानवा भुवि। पितृदेवर्षिमनुजैर्देयं तेभ्यश्च धर्मतः॥ यज्ञैस्तु देवान् प्रीणाति स्वाध्यायतपसा मुनीन्। पुत्रैः श्राद्धैः पितृश्चापि आनृशंस्येन मानवान्॥ —महाभारत, अध्याय १२०.

पूर्वीच्या धर्मकारांनीं हीं ऋणें तीन, किंवा चार सांगितलीं आहेत. परंतु तीं तेवढीं प्रमुख आहेत, असा भावार्थ समजला पाहिजे. वास्तविक पाहतां तीं अनेक आहेत.

ऋणी आहोंत; व ऋण जेवढें असेल तेवढ्याची तरी आपणांकडून फेड झाली पाहिजे, व ती ग्राह्य रीतीनें झाली पाहिजे. या अनृणत्वाच्या तत्त्वानें अनेक धर्माचार उत्पन्न होतात. ईश्वराचे अनृणी होण्यास सर्व आयुष्यच त्यास अर्पण केलें पाहिजे, हें दुसऱ्या तत्त्वानेंच सिद्ध होतें; परंतु दुसरीं मनुष्याचीं कर्तव्यें जीं त्या तत्त्वानें स्पष्टपणें निश्चित होत नाहींत, तीं या तिसऱ्या तत्त्वाखालीं येतात.

मातापितरांचे उपकार फेडण्यास त्यांस ग्राह्य असा मार्ग म्हटला, म्हणजे त्यांची आज्ञा पाळणें, त्यांस बहुमान देणें, त्यांचें वृद्धापकाळीं पालनपोषण करणें, इत्यादि, हा होय. कन्यापुत्रांच्या संबंधानें पालनपोषण, शिक्षण, विवाह व सुखानें त्यांचें आयुष्य जाईल अशी तजवीज करणें, हीं अनृणी होण्याचीं साधनें आहेत. दंपत्यांनीं परस्परांचें अनृणी होण्याकरितां अव्यभिचारानें व परस्परहितांत सुखसर्वस्व मानून राहिलें पाहिजे. याप्रमाणें गुरु, बांधव, समाज, पूर्वज यांसंबंधानें आपलीं कर्तव्यें उत्पन्न होतात; व तीं योग्य रीतीनें बजाविल्याखेरीज धर्मसाधन होत नाहीं. स्नानसंध्या, श्राद्धपक्ष, होमहवन, अहिंसा इत्यादि जीं जुनीं धर्मकृत्यें अद्यापि प्रचारांत राहिलीं आहेत, त्यांचें बीज या अनृणत्वाच्या तत्त्वामध्यें सांपडतें. केवळ ईश्वरपरायण कां होऊं नये, प्रपंचांत कां शिरावें, ऐहिक कर्ममार्ग कसा उत्पन्न होतो, या सर्व प्रश्नांचें उत्तर या एका तत्त्वावरून देतां येतें. सर्वांचा अनृणी झाल्यावर मग संन्यासाश्रम व शुद्ध आत्मपरायणता किंवा ईश्वरपरायणता हीं इष्ट व श्रेष्ठ मानिलीं आहेत.

हिंदुधर्माचें चवथें मूलतत्त्व हें कीं, जें अक्षय्य, अविनाशी किंवा शाश्वत तें ग्राह्य, व जें क्षयवृद्धि पावणारें, नश्वर किंवा अशाश्वत तें त्याज्य. या तत्त्वावर हिंदुधर्मकारांनीं नीतीचा पाया रचिला आहे.

कोणतें सुख ग्राह्य व कोणतें त्याज्य, हा विचार करतांना या तत्त्वाचा उपयोग होतो. असत्य, अतिलोभ, व्यभिचार, मद्यप्राशन, इत्यादि दुर्वर्तनें या तत्त्वानें दोषी ठरतात. केवळ प्रापंचिक सुखांत निमग्न होऊन परमार्थास विसरणें हें युक्त नव्हे, असें यात्र तत्त्वावरून दिसतें. हिंदुलोकांत जी विशेष समाधानवृत्ति दिसते, तिचें मूळ या तत्त्वांत आहे. व ती बारीकसारीक कामांत व तशीच मोठ्या राष्ट्रीय कामांत सारखीच दिसून येते. कपडालत्ता करावयाचा तेव्हां त्याच्या बाह्य स्वरूपाकडे विशेषसें लक्ष द्यावयाचें नाहीं, तर त्याचा टिकाऊपणा पाहावयाचा; भांडीकुंडीं तांब्याचीं पाहिजेत, कांचेचीं नकोत; द्रव्याचा ठेवा सोनेंचांदीच्या रूपानें पाहिजे, कागदी नोटांच्या रूपानें नको; मालमत्ता स्थावर असावी, जंगम नको; नित्याची भाजीभाकर बरी, क्षणिक राजसत्ता नको. याप्रमाणें ही जी हिंदूंची समाधानवृत्ति आहे, तीमुळें डामडौल, भपका, खाण्यापिण्याची चैन, यथेष्ट सुखोपभोगांची हौस, द्रव्यसंपादनार्थ अतिरिक्त उद्योग करण्याची इच्छा, किंवा राज्यांत प्रबळ होण्याची, लोकांवर सत्ता चालविण्याची व त्या द्वारें प्रतिष्ठा मिळविण्याची महत्त्वाकांक्षा, या सर्व गोष्टी त्यांस फारशा महत्त्वाच्या वाटत नाहींत. या गोष्टींविषयीं वयाच्या किंवा प्रकृतीच्या मानानें जरी आम्हांस एका वेळीं ईर्षा उत्पन्न झाली, तरी ती फार दिवस टिकत नाहीं; आमचा आवेश क्रमानें गळत जातो. 'हीं सर्व घेऊन काय करतां? आज आहेत व उद्यां नाहींत, कां व्यर्थ आयास करावे?' असा वैराग्यरूपी विचार क्रमानें आमच्या अंतःकरणांत उत्पन्न होतो, व आमचा उद्योग शिथिल पडत जातो. "अशाश्वतसंग्रह कोण करी?" हें कवीचें वचन आमच्या समाधानी स्वभावास व या चवथ्या धर्मतत्त्वास अनुलक्षून आहे, व तें खरें आहे.

हिंदुधर्माचें पांचवें तत्त्व हें कीं, ईश्वरानें ज्या स्थितींत आपणांस उत्पन्न केलें, त्याच स्थितींत आपल्या आयुष्याचें पूर्ण चीज करून दाखवावें. 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः' या वचनानें या तत्त्वाचा बोध होतो.

असो. हिंदुधर्मानें सर्व मनुष्यांशीं सौजन्य व सर्व भूतांशीं अनुकंपा सांगितली; परंतु सर्व भूतांची किंवा सर्व मनुष्यांची सारखी योग्यता सांगितली नाहीं; कारण, तीं यथार्थ नाहीं. गुणकर्मांनीं मनुष्यांत भेद राहणार, व या भेदामुळें त्यांच्या मनोवृत्तींस निरनिराळें वळण लागणार, ही खरी स्थिति जाणून धर्मानें वर्णभेदाची स्थापना केली. या वर्णभेदानें ईश्वराशी सर्वांचा संबंध सारखाच राहिला; परंतु समाजाचें योग्य वर्गीकरण होऊन त्यास स्थैर्य आलें, प्रत्येक वर्गाचीं सामान्य कर्तव्यें निश्चित झाली. यामुळें समाजांत अंतःस्थ कारणांनीं क्रांति, घोर कृत्यें व रक्तपात होण्याचें भय राहिलें नाहीं. गुणांचा पूर्ण-प्रकाश पडण्यास, स्वकर्मांत पूर्णता मिळविण्यास व सामाजिक आणि पारमार्थिक कृत्यांनीं उपकारक होण्यास वर्णभेद मुळींच आड येत नाहीं. अलीकडील पांचसातशें वर्षांतील साधुसंत, हिंदु राज्यकर्ते, व्यावहारिक कार्यांत गुंतलेले पुरुष वगैरे, या सर्वांचें आचरण पाहिल्यास, किंबहुना हल्लींची हरएक जातीची स्थिति सूक्ष्म दृष्टीनें अवलोकिल्यास या गोष्टीचा प्रत्यय येईल. मूर्ख व दुराग्रही लोक सर्वत्र असावयाचेच, त्यांचीं कृत्येंमात्र अशा विवेचनांत मनांत आणितां कामा नये.

याप्रमाणें हल्लींचें हिंदुधर्माचें स्वरूप या पंचतत्त्वांवर अवलंबून आहे. यांत स्वर्ग, नरक, पुनर्जन्म, कर्मदशा वगैरेंचा अंतर्भाव केलेला नाहीं. कारण, जीं तत्त्वें कर्तव्यनियामक असतात, तींच मूळ समजलीं पाहिजेत; इतर आनुषंगिक होत. एकदां कर्तव्य नियमित

झाल्यावर,. म्हणजे पाप कोणतें व पुण्य कोणतें, हें ठरविल्यावर, पापी व पुण्यवान् पुरुषास शिक्षा आणि प्राप्ति कोणती असावी, ती कशी प्राप्त होते, इत्यादि प्रश्न उत्पन्न होतात. परंतु ते गौण होत, असें विचाराअंतीं दिसून येईल. हिंदुधर्माचीं हीं सांप्रतचीं पंच-महातत्त्वें सर्व धर्मांच्या उच्च स्थितींत त्यांस लागू पडण्यासारखीं आहेत. पारमार्थिक कर्ममार्गाचें हें अत्युत्कृष्ट स्वरूप आहे. या तत्त्वांच्या साहाय्यानें कालपरत्वें हिंदुधर्माचें संशोधन होत गेल्यास त्यास सर्व हिंदुजन संमति देतील; व हा प्रयत्न सर्व विद्वान् सुज्ञ पुरुषांनीं आरंभिला पाहिजे. पाश्चात्त्य सुधारणेसारखी सुधारणा आमच्या समाजांत करण्याचे दिवस गेले.

म. शि. गोळे. हिंदुधर्म आणि सुधारणा.

---

## पाठ २६ वा.



### धर्माचें स्वरूप.

ज्याच्या योगानें मनुष्यांमधील पशुवृत्तींचा लय होऊन सद्-वृत्तींचा उदय होतो, विकाराचा संकोच होऊन विचाराचा विकास होतो, आसुरी संपत्तीचा नायनाट होऊन दैवी संपत्तीचें साम्राज्य होतें, तोच धर्म. जो मनुष्याचें पतन होऊं न देतां त्याचा उद्धार करतो, अवनतीच्या मार्गावरून त्यास काढून उन्नतीच्या मार्गाला लावतो, तोच धर्म. स्वैर गतीनें धावणारीं इंद्रियें ज्याच्या साहाय्यानें स्वाधीन ठेवितां येतात, मोक्षसंपत्तीवर दरवडा घालणारे सहा वाटमाऱ्ये ज्याच्या बळावर मनुष्यास चीत करतां येतात, तोच धर्म. ज्याची संगति केली असतां दुःख, चिंता व क्लेश दाही दिशांना पळून जातात, व शांतीचें बिऱ्हाड कायमचें येऊन बसतें,

तोच धर्म. 'आत्मवत् सर्वभूतानि' हें सत्तत्त्व जो मनावर बिंबवतो, खरें मनुष्यत्व म्हणजे काय, याची जो ओळख करून देतो, मनुष्यानें मनुष्याशीं कसें वागावें हें जो सांगतो, मनुष्यजन्माचें सार्थक कसें होईल, हें जो उघड करून दाखवितो, दुरभिमान जो मोडतो, सदभिमान जो जागृत करितो, जो 'स्व'चें आकुंचन न करतां विकास करितो, शैथिल्य घालवून जो मनुष्याला कर्तव्यदक्ष बनवितो, तोच धर्म. ज्याच्या साहचर्यानें जगन्नायकाचें स्वरूप कळतें, भक्तिसुखाचा आस्वाद मिळतो, ज्ञानामृताची गोडी लागते. 'संसाराची चूक' सांपडते, तोच धर्म. मनुष्यप्राणी आला कोठून, जायचा कोठें, जग हें काय आहे, त्याची उत्पत्ति, स्थिति व लय हीं होतात कशीं, वगैरे प्रश्नांचीं उत्तरें जो समर्पक देतो, त्यालाच धर्म म्हणावें. बरें कोणतें, वाईट कोणतें, सत् कोणतें, असत् कोणतें, शाश्वत कोणतें, अशाश्वत कोणतें, सार कोणतें, असार कोणतें, याची निवड ज्याच्या अभ्यासानें त्वरित करितां येते, त्याचें नांव धर्म.

कृ. गो. किनरे. ज्ञानप्रकाश.

---

# पाठ २७ वा.



## 'राष्ट्र' ही संस्था प्रिय कां?

### भाग १ ला.

आपल्या आत्म्याचें जें सात्त्विक स्वरूप आहे, त्याचें सर्वांगांनीं विकसन व्हावें, त्याचें सर्वांत उन्नत, शुद्ध व पवित्र स्वरूप आपणांस पाहावयास मिळावें,—थोडक्यांत 'आत्मप्राप्ति' व्हावी, हें आपलें ध्येय होय, असें कोणीही समंजस मनुष्य कबूल करील. पण हें ध्येय एखाद्या ताऱ्यासारखें आकाशांत राहून चालावयाचें नाहीं, तें

ह्या कर्मभूमीवरील व्यवहारांत उतरलेंच पाहिजे. हृदयांत नुसतें गुप्त किंवा सुप्त असलेलें ध्येय खरोखर ध्येयच नव्हे. ज्याचा आपल्या वर्तनावर कांहींच परिणाम होत नाहीं, त्या ध्येयाची आपण वाणीनें कितीही वाखाणणी केली, तरी तें 'आपलें ध्येय' नव्हे, असें समजावें. मनांत एखाद्या पुरुषार्थाची कल्पना आली, किंवा लोकांनीं केलेला स्वार्थत्याग किंवा दाखविलेलें धैर्य पाहून त्याची आपण पुष्कळ वाहवा केली, म्हणजे ती पुरुषार्थकल्पना किंवा वीर्यप्रशंसा आपणांला पुण्यप्रद किंवा भूषणावह होईल, असें नव्हे. मनांत लाख रुपयांची कल्पना आल्याबरोबर ते जसे आपले होत नाहींत, तशांतलाच हा प्रकार आहे. नीतिमत्ता ही 'बुद्धी'वर किंवा हेतूंवर अवलंबून आहे, बाह्यकर्मावर किंवा तत्फलावर नाहीं, हें सर्व खरें. पण पोटांतली बुद्धि सदैव पोटांत राहून उपयोगाची नाहीं, तिला कांहीं तरी व्यक्तस्वरूप प्राप्त झालेंच पाहिजे. पोटांत प्रेम पुष्कळ आहे, पण वर्तनांत जर तें कधींच उतरलें नाहीं, तर तें आहे, असें कोणत्या आधारावर म्हणावयाचें? आम्रबीजांत आम्रवृक्ष किंवा आम्रफळ गुप्त आहे, पण गुप्त आहे तोंपर्यंत तें बीज हें बीजच समजलें जातें, त्याला वृक्षाचा किंवा फलाचा मान मिळत नाहीं. परोपकार करण्याच्या बुद्धीला वेळेस गरिबीमुळें किंवा दुसऱ्या अडचणींमुळें अवसर मिळत नाहीं, म्हणून त्या बुद्धीची महती आपण कमी समजणार नाहीं; पण एखाद्याची परोपकारबुद्धि पैशाच्या वाटे किंवा गोड शब्दांच्या किंवा दृष्टीच्याही वाटे जन्मांत कधींही बाहेर पडली नाहीं, तर तिचे गोडवे कोण गाईल? आणि तिचें अस्तित्व तरी कोण कबूल करील? तीव्र दुःख झाल्यावर डोळ्यांच्या वाटे अश्रु आल्याशिवाय जसे राहात नाहींत, त्याप्रमाणें हृदयांत प्रेमनिर्झर वाहत असला, तर योग्य संधि प्राप्त झाल्यावर कारंज्याप्रमाणें तो केव्हां

तरी बाहेर पडलाच पाहिजे. अवसर येऊनदेखील हृदयामध्यें दयेच्या ओलाव्याचा स्पर्शदेखील झालेला कधीं दिसला नाहीं, तर तेथें झराच नाहीं म्हणून समजावें. नीति हा बुद्धीचा गुण, कर्माचा नव्हे; केवळ कर्म हें नीतीचें नव्हे व अनीतीचें नव्हे, हें बरोबर आहे. पण बुद्धि झाली, तरी तिनें नेहमींच पडदानशीन म्हणून हृदयांत लपून राहून चालावयाचें नाहीं. 'बुद्धि' 'बुद्धि' म्हणून आपण म्हणतों, पण 'अमुक कर्म करण्याची बुद्धि' हाच आपला अर्थ असतोना ? कोणतेंही कर्म करावयाचें नाहीं, अशी कल्पना करा, आणि मग बुद्धीला कांहीं अर्थ राहातो का पहा. 'कर्म' म्हणजे इंद्रियद्वारां जें होतें, तेवढेंच घ्यावयाचें नाहीं, गणित सोडविणें, देशहिताचें चिंतन करणें, समाधि लावून बसणें, हीं सर्व कर्मेंच आहेत. मनुष्य म्हटला म्हणजे त्याच्या हातून कांही ना कांहीं तरी क्षणोक्षणीं कर्म घडत असतेंच; तो कधींही 'अकर्मकृत्' राहूं शकत नाहीं. त्याप्रमाणेंच बुद्धि म्हटली, म्हणजे कांहीं तरी मानसिक अथवा शारीरिक कर्म करण्याची इच्छा तेथें असलीच पाहिजे; कर्मनिरपेक्ष नैतिक 'बुद्धि' असणें शक्यच नाहीं. कर्मफलावर आसक्ति नसेल, पण कांहीं तरी कर्म करावें, त्याला विवक्षित फल यावें, अशी इच्छा जर तिच्या गर्भांत नसेल, तर त्या बुद्धीला सात्त्विक किंवा असात्त्विक कोण कशावरून ठरवील ?

---

## पाठ २८ वा.



## 'राष्ट्र' ही संस्था प्रिय कां !

### भाग २ रा.

व्यक्तीप्रमाणें समाजाच्या बाबतींतही हें तत्त्व लागू पडतें. समाज नीतिमान् केव्हां म्हणावयाचा ? तर त्या समाजांतील राजकीय, सामाजिक, आर्थिक, धार्मिक व व्यावहारिक संस्थांमध्यें, चालीरीतींमध्यें वगैरे न्याय, सुविचारपरिपोषकता, परस्परांस साहाय्य करण्याची बुद्धि इत्यादि गुण बऱ्याच अंशांनीं दृग्गोचर होतील तेव्हां. राज्यकारभारांत बेबंदशाही, समाजांत विवाहादि बंधनें मुळींच नाहींत, दारू बोकाळली आहे, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाही, मालमत्तेचा किंवा जीविताचाही भरंवसा नाहीं, अशा प्रकारच्या समाजाला किंवा राष्ट्राला नीतिमान् कोण म्हणेल ?

आपलें शरीर हें जसें आत्म्याच्या कामनांना, आकांक्षांना वगैरे व्यक्त स्वरूप देतें, त्याप्रमाणेंच सामाजिक संस्था, चालीरीति, वगैरे सामाजिक आत्म्याला व्यक्त स्वरूप देत असतात. राजकीय दृष्ट्या 'राष्ट्र' ही संस्था उदाहरणादाखल घेऊन अशा ज्या अनेक संस्था समाजांत रूढ आहेत, त्याच्या द्वारें नैतिक आत्मा कसा व्यक्त होत असतो, हें आपण पाहूं या. या रूढ संस्था कांहीं दिवसांनीं जीर्ण कशा होतात, कालांतरानें त्यांतील आत्मा जीर्ण वस्त्राप्रमाणें जीर्ण देह टाकून कसा जातो, व नवीन देह धारण करण्याचा कसा प्रयत्न करीत असतो, इत्यादि प्रश्न ओघाओघानेंच येतील, पण त्यांचा विस्तारानें ऊहापोह करण्याचें हें स्थल नव्हे.

'राष्ट्र' ही राजकीय संस्था कशाला पाहिजे ? अमक्या अमक्या लोकांनीच कायदे करावे, तमक्यांनीं ते बजावावे, न्याय अमक्यांनींच

द्यावा, चोरी करूं नये, खून करूं नये, असे नियम कशाला पाहिजेत? वाटेल त्यानें वाटेल तें करावें, वाटेल तें घ्यावें, प्यावें, चोरावें, लुटावें, स्वेच्छेनें चालावें, अशी स्थिति असती, तर आपणांस 'स्वातंत्र्य' अधिक मिळालें नसतें काय? आणि स्वेच्छाचार अधिक करण्यास सांपडला नसता काय? कोणतीही राज्यपद्धति ध्या, ती स्वेच्छाचाराला आळा घालणारच. तरी पण ही असा आळा घालणारी राज्यपद्धति मनुष्यमात्राला पाहिजे असते; स्वेच्छाचार करूं देणारी 'अराजकता' त्याला पतकरत नाहीं. असें कां? याचें उत्तर एवढेंच कीं, स्वेच्छाचारानें आत्म्याचें समाधान होत नाहीं, हा मनुष्याला अनुभव आलेला आहे. मनुष्याचा आत्मा केवळ वासनामय नाहीं, त्याला सुखाप्रमाणें सौजन्यही पाहिजे असतें, व ललितकलांची त्याला आवड असते. प्रत्येक मनुष्य मनःपूत वागूं लागला, तर सर्वांगांनीं उन्नति व्हावयाची नाहीं, हें मनुष्याला अनुभवानें कळून चुकलें आहे. आत्म्याच्या सर्वांगांचें कशाला, इंद्रियसुखें शोधणाऱ्या अंगाचेंदेखील बेबंदशाहींत समाधान व्हावयाचें नाहीं. कोणी कोणाला शास्ता राहिला नाहीं, कोणाला कांहीं धरबंद किंवा विधिनिषेध राहिला नाहीं, मनाला मानेल तें करावें हा नियम ठरला, मग व्यापार कोठला, बंगलेहवेल्या कोठल्या, शेतकी कोठली, कलाकौशल्य कोठलें, बाजार, बगीचे, नाटकें, तमाशे—जें जें म्हणून सुखदायक असें दाटतें, तें तें त्या स्थितींत कोठून मिळणार? अठरा इंची तोफांनीं एखादें शहर उध्वस्त केलें, तर चार वर्षांमध्यें पुन्हा पूर्वींसारखें, किंबहुना त्याहून अधिक सुंदर असें शहर उठवून देतां येईल. पण, 'मनःपूतं समाचरेत्' या मंत्राचा सर्व जण एकदां जप करूं लागले, म्हणजे मग कोणतेंही शहर चार तासांच्या आंतच भयानक होईल, रक्ताच्या

पुरानें वाहूं लागेल, मुडद्यांनीं रस्ते अडतील. आणि चार तास तोफांचा मारा झाल्यामुळें तें जितकें भयानक झालें असतें, त्याहून अधिक भयानक स्वरूप त्याला प्राप्त होईल, व त्या शहरांत फिरकण्याची सोय राहणार नाहीं !

अशा अवस्थेंत राहाण्यापेक्षां स्वेच्छाचारप्रवृत्तीचें कांहीं नियमन करण्यास मनुष्य तयार होणें साहजिक आहे. आतां, कोणत्या प्रवृत्तीचें किती व कोणी नियमन करावयाचें, हा प्रश्न राहातोच. पण नियमनाची आवश्यकता तर सिद्ध झालीच ! सर्व लोक एकत्र जमले, व आजपासून आम्ही आपल्या स्वेच्छाचाराच्या हक्काचा कांहीं अंश राजाच्या आधीन करतों, व तेवढ्या बाबतींत त्याचे नियम मान्य करतों, असा एखाद्या राजाशी किंवा दुसऱ्या कोणाशीं त्या लोकांनीं करार केला, व त्यामुळें नियमबद्ध राज्यपद्धति सुरू झाली, असा लेखकाचा भावार्थ नाहीं. असा करारनामा करून कोणतेंही राज्य जन्मास आलेलें नसावें. एखादा तेजस्वी पुरुष सजातीयांवर आपलें वजन पाडून त्या जातीमध्यें प्रमुखस्थान –म्हणजे राज्यपद–मिळवितो, हा राजजन्माचा सामान्य मार्ग आहे. हा राजा इतर जातींना पादाक्रांत करून आपलें राज्य वाढवितो, व याच पद्धतीला अनेक शाखा उपशाखा फुटल्या, व हें विस्तृत प्रमाणावर घडलें म्हणजे 'राष्ट्र' होतें. राष्ट्राचा जन्म कसा, हा प्रश्न निराळा व तें हवें असें कां वाटावें, हा प्रश्न निराळा. या प्रश्नांचा अर्थात् निकट संबंध आहे; कारण, ज्या पद्धतीनें तें जन्मास येतें, तीवर त्याचें लोकप्रियत्व अवलंबून असतें; व दुसरें असें कीं, तें नसलें तर बरें, असें लोकांना वाटूं लागलें, तर त्याचा नाश करण्यास लोक प्रवृत्त होण्याचा संभव असतो; आणि या प्रवृत्तीच्या पोटांत दुसऱ्या राज्यपद्धतीचा गर्भ असतो.

बंधनस्वरूप 'राज्यपद्धति' स्वातंत्र्यप्रिय मनुष्यप्राण्यांना हवीशी कां वाटते, याचें हें वर्णन झालें. आतां राज्यपद्धतींत फरक कां होतात, हें पाहूं. रानटी किंवा अर्धवट रानटी अवस्थेंत एखादा बलाढ्य मनुष्य महत्त्वाकांक्षेनें प्रेरित होऊन एखादे वेळेस राज्य-शकटाचीं चक्रें भलत्याच रस्त्यावर नेतो, किंवा कासरा आणि चाबूक लुच्चेगिरीनें किंवा बळजबरीनें आपल्या हातांत घेतो. असल्या प्रकारांत स्वार्थ भरलेला असतो, लोकांच्या नीतिविकसनाचा कांहीं प्रश्न नसतो. असल्या प्रकारांचा विचार करण्यापेक्षां इंग्लंडसारख्या सुसंस्कृत देशांत राज्यपद्धतींत कसे फरक होतात, हें पाहाणें अधिक बोधप्रद आहे. एखादें राज्य सुराज्य असलें, म्हणजे अर्थात् त्यांतील लोकांचें ज्ञान, कलाकौशल्य वगैरे वाढतें. ज्ञान 'वाढतें' म्हणजे दोन अर्थांनीं: (१) अधिक लोकांत त्याचा प्रसार होतो, व (२) सृष्टीचें, इतिहासाचें वगैरे गूढ अधिक स्पष्टपणें किंवा मार्मिकतेनें कळूं लागतें. अशा रीतीनें ज्ञानाचा विस्तार व विकास झाल्यावर पूर्वीं ज्या लोकांना खाण्यापिण्यापेक्षां अधिक कांही कळत नव्हतें, त्यांपैकीं कांहीं जणांना राज्य म्हणजे काय, तें कशाकरितां हवें, तें कोण चालवितो, तो तें कसें चालवितो, आपणांला ही पद्धति बरी वाटते का, आपली आत्मोन्नति ह्या पद्धतीच्या योगानें सर्वांगांनीं होईल का, असे प्रश्न सुचूं लागतात. इंग्लंडमध्यें १८३२ सालीं पार्लमेंटनें जें रिफॉर्म बिल पास केलें, त्याच्या पूर्वीं कांहीं वर्षें उच्च दर्जाच्या मजुरांना, कारकुनांना वगैरे असेंच वाटत होतें. त्यांच्या आत्म्यांचीं जीं अंगें इतके दिवस सुप्त होतीं, तीं जागृत झाल्यावर त्यांच्या आकांक्षा वाढल्या व तेथील राज्यकर्त्यांनीं त्यांचें समाधानही केलें. असें समाधान वेळोवेळीं करीत गेलें, म्हणजे राष्ट्रांतील लोकांना तें राज्य प्रिय होतें; इतकें कीं, त्याकरितां ते प्राण सोड-

ण्यासही तयार होतात. आमच्या राज्याचीं बंधनें आम्हांला कां हवींत, तर त्यांमुळेंच आमची आत्मोन्नति शक्य होते, त्यांशिवाय आमचा खरा अंतरात्मा संतोष पावत नाही, असें ते मग म्हणूं लागतात !

इंग्लंडचेंच उदाहरण घेतलें, तर सध्यांच्या महायुद्धांत (ता. ४ ऑगस्ट १९१४ पासून ता. २८ जून १९१९ पर्यंत युरोपांत जें युद्ध चालू होतें तें.) मोठे मोठे लॉर्ड लोक, तसेंच मोलमजुरी करणारे लोक, फार काय, बायकासुद्धां इंग्लंडच्या यशाकरितां पाहिजे ती मदत करण्यास तयार झाल्या आहेत हें कां? तर त्यांना असें वाटत आहे कीं, आपली राज्यपद्धति जी आहे, तीच धर्माला, सौजन्याला, कलाकौशल्याला वगैरे पोषक अशी आहे; अशी उत्तम राज्यपद्धति जगांत अपमानास्पद होऊं दिली, तर आपल्या राष्ट्राचें बल, व परंपरेनें आपल्या आत्मिक उन्नतीचा वेग थांबेल, निदान त्यांत अडथळे येतील; तेव्हां आपल्या व आपल्या सर्व राष्ट्राच्या आत्मोन्नतीची चाड असेल, तर आपण देहप्रेम धारण करणाऱ्या आपल्या एकांगी आत्म्याचा वेळ पडल्यास यज्ञ करण्यासही तयार असलें पाहिजे. असो. राष्ट्राचीं बंधनें हींच नीतीच्या विकासाला कारणीभूत होतात, व नीतिविकासाला कारणीभूत होतात, म्हणूनच तीं बंधनें गोड वाटतात, हें सांगावयाचें होतें. राज्य-पद्धतींत जे फरक होतात, तेसुद्धां आत्मिक उन्नतीला अधिक पोषक किंवा साहाय्यक होतील. असें ते फरक करणाऱ्यांना वाटत असतें, म्हणूनच ते करण्यांत येतात. 'राष्ट्र' ही संस्था आत्म-विकासाचें साधन म्हणून प्रिय आहे. आत्मविकासाला जितकें तें पोषक, तितकें तें चांगलें. कमलिनीला जसें कमलविकसनाकरितां सरोवर प्रिय असतें, त्याचप्रमाणेंच आत्मविकसनाकरितां उत्तम राज्य-

पद्धति आपणांस प्रिय असते. कमलिनीला सरोवराचें पाणी कोंडतें किंवा बुडवतें, हें म्हणणें जसें वेडगळपणाचें आहे, त्याप्रमाणेंच राष्ट्राचें नियमन आम्हांस त्रासदायक आहे, म्हणून तें आम्हांस नको, हें म्हणणें वेडगळपणाचें आहे. आतां जीर्णवस्त्र झालें, म्हणजे तें जसें आपण बदलतों, त्याप्रमाणें राज्यपद्धति जीर्ण झाली, म्हणजे तींत कमी-अधिक बदल केलाच पाहिजे. कां कीं, ती पद्धति हें ध्येय नव्हे, तर त्या पद्धतीच्या योगानें जो आत्मविकास होतो, तें ध्येय आहे.

वामन मल्हार जोशी. नीतिशास्त्रप्रवेश.

---

## पाठ २९ वा.



### अप्रिय पण पथ्य.

आपल्या या देशाचा व इंग्लंडचा, आपल्या देशांतील प्राचीन संस्थांचा व इंग्लंडांतील अर्वाचीन संस्थांचा, आपल्या प्राचीन विद्यांचा व युरोपिअन अर्वाचीन विद्यांचा, आपल्या लोकांनीं मानलेल्या युगऱ्हासरूपी अधोगतीचा व पश्चिमेकडील सृष्टिज्ञानाद्यैश्वर्यवृद्धिरूप उन्नतीचा, इकडील पुरातन अनुल्लंघनीय धर्मसेतूचा व धर्मस्वातंत्र्य, बुद्धिस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, व्यवहारस्वातंत्र्य, राजकीयस्वातंत्र्य इत्यादि स्वातंत्र्यरूपी प्रबल प्रवाहांचा, अनेकविषयक अज्ञानाचा व अनेक अत्यंत शोधक, विद्याव्यासंगी, दीर्घव्यवसायी, सत्यैकनिर्णयपरायण, ऊहापोहाविषयीं समर्थ व स्वतंत्र अशा पंडितांनीं प्रणीत अर्वाचीन विशद ज्ञानाचा, अनेक आघातांनीं विदीर्ण व म्लान झालेल्या लोकस्थितीचा, व अधिकाधिक उन्नत स्थानास पोंचणाऱ्या लोकस्थितीचा जो

हा अति अपूर्व विलक्षण संयोग दैवगतीनें घडून आला आहे, त्यापासून आपल्या लोकांच्या मानासिक वृत्तींवर व तत्प्रयुक्त बाह्य व्यवहारांवर कांहींच परिणाम घडूं नये, व आपले लोक इंग्लिश लोकांचा अम्मल या देशांत होण्यापूर्वीं जसे होते, तशाचे तसेच, हा पूर्वोक्त अचाट संगम घडून आल्यानंतरही राहावे, व त्यांच्या मतीत किंवा वृत्तींत कांहीं फेरबदल होऊं नये, ही गोष्ट अगदीं असंभवनीय होय. आपल्यापेक्षां शरीरबलानें, मानासिक बलानें, उत्साहवृत्तीनें, शोधकबुद्धीनें, उद्योगप्रियतेनें, स्वातंत्र्यप्रियतेनें, सत्यप्रियतेनें, न्यायपरतेनें जे श्रेष्ठ आहेत, तसेंच, जे आपल्यापेक्षां गुणाढ्य, धनाढ्य व ज्ञानानें व अधिकारानें वरिष्ठ, त्यांच्या समागमानें कांहीं अंशीं त्यांचें अनुकरण करून अंशतः तरी त्यांची योग्यता आपल्या अंगीं आणण्याची इच्छा उत्पन्न होणें व तद्नुरूप यत्न होणें, हेंही अगदीं स्वाभाविक आहे. असें होऊं लागलें, म्हणजे ज्यांच्या मनांवर या अशा संयुक्त स्थितीचा मुळींच संस्कार झाला नाहीं, जे आपल्या लोकांची दीनावस्था युगऱ्हासमूलक, अतएव दुर्वार्य आहे, या कल्पनेस दृढ धरून राहातात, त्यांच्यामध्यें व ज्यांच्या मनांवर पूर्वोक्त संस्कार झाला आहे व ज्यांस ही युगऱ्हासाची कल्पना अगदीं निर्मूळ अशी वाटूं लागली आहे, त्यांच्यामध्यें, आतां आपल्या लोकांनीं समजावें काय, करावें काय, व वागावें कसें, याविषयीं मतभेद उत्पन्न व्हावा, हेंही आश्चर्यकारक नाहीं. व पूर्वोक्त मानासिक संस्कार पावलेल्या लोकांमध्येंही समजुतींविषयीं, कर्तव्याकर्तव्याविषयीं, व तत्संबंधी साधनांविषयीं, अल्पस्वल्प मतभेद उत्पन्न व्हावा, हेंही अस्वाभाविक आहे, असें नाहीं. परंतु असा मतिभेद किंवा मतभेद असला, तरी एकमेकांनीं एकमेकांवर बुद्धिपुरःसर राष्ट्राचें अकल्याण करण्याचा

आरोप घालून विरोध वाढवावा, वैरभाव उत्पन्न करावा, हें-मात्र सखेदाश्चर्यकारक असून आपल्या लोकांच्या ऐक्यास अत्यंत अपायकारक होय. म्हणून ही विरोधाची स्थिति ऐक्यवृद्धीस एक मोठी हरकत होय.

परंतु याहीपेक्षां ऐक्यवृद्धीस मोठी हरकत, आपल्या देशांत खऱ्या स्वदेशाभिमानाचा फुटावा तसा अंकुर अद्याप फुटला नाहीं, ही होय. खऱ्या स्वदेशाभिमानाचा असें म्हणण्याचें कारण हें कीं, एक प्रकारचा स्वदेशाभिमान पूर्वीपासून आपल्यांत आहे, व अलीकडे त्यास कांहीं अंशीं दृढताही आली आहे. तो हा कीं, जें कांहीं आपलें पूर्वीपासून चालत आलेलें आहे, तें सर्व चांगलें. आपल्या चाली चांगल्या, आपल्या रीति चांगल्या, आपले रिवाज चांगले, आपलें ज्ञान पूर्ण, आपल्या समजुती खऱ्या. यांविषयीं आपण अभिमान बाळगावा व यांचें झटून रक्षण करावें. यांत कांही फेरबदल होऊं देऊं नये. परकीय देशांतील लोकांपासून आपल्यास कांहीं शिकावयाचें नाहीं. कदाचित् कांहीं असलेंच, तर देशाच्या संपत्तीची वृद्धि करण्याचीं जीं साधनें त्यांसंबंधाचें ज्ञान करून घेतलें म्हणजे बस्स आहे. बाकी आपल्यास आपली उन्नति होण्यासाठीं शरीरबल, बुद्धिबल, राज्यकार्यकर्तृत्व, धैर्य, शौर्य, जें जें पाहिजे तें तें आपल्या अंगीं आहेच. त्याविषयीं आपल्यास दुसऱ्यापासून कांहीं शिकावयाचें नाहीं, कांहीं करावयाचें नाहीं, कांहीं मिळवावयाचें नाहीं, अशा प्रकारचा अभिमान आहे. परंतु माझ्या अल्प समजुतीनें हा केवळ वृथाभिमान किंवा मिथ्याभिमान होय.

जो हा आपला देश प्राचीनकाळीं विद्या, कला, धर्म, नीति, वीर्य, शौर्य, इत्यादि गुणांनीं अग्रगण्य देशांत गणला जात होता, त्या देशांतील ऋषींचे व वीर पुरुषांचे आम्ही वंशज आहों. यद्यपि प्रस्तुत

काळीं आमचा देश महत्त्वाच्या गोष्टींत मागें पडला आहे, यद्यपि आमच्या पूर्वजांच्या आंगचे सत्यनिष्ठता, उद्योगशीलता, ज्ञानैकपरता, धैर्य, गांभीर्य, शौर्य, इत्यादिक गुण आम्हांमध्यें नष्टप्राय झाले आहेत, तरी पुनः आम्ही झटून उद्योग करून ज्या साधनांनीं व उपायांनीं पश्चिमेकडील लोक पुढें सरसावले आहेत, तीं त्यांच्या साह्यानें व उदाहरणानें संपादन करून, आपसांतील क्षुल्लक विरोध एकीकडे ठेवून, या महत्कार्याविषयी एकविचारानें उद्योग करूं. निश्चयानें सदुद्योग करणाराचा साह्यकारी परमेश्वर आहे, म्हणून त्याजवर भरंवसा ठेवून पुढें पाऊल टाकण्याचा यत्न करूं ज्या विख्यात, स्वातंत्र्यप्रिय व उन्नतदशेस पावलेल्या पराक्रमी लोकांचा ईश्वरी सूत्रानें आपल्यास समागम झाला आहे, त्यांच्या सहवासानें त्यांची विद्या व गुण संपादून त्यांच्या बरोबरीच्या पायरीस येऊं व आपला हीनपणाप्रत पावलेला देश पुनः अग्रगण्य देशांच्या बरोबरीस आणूं. प्रस्तुत आमची जरी परकीय लोक हेळणा करीत आहेत, तरी तीस आम्ही तूर्त पात्र आहों. यामुळें विनयानें व शांततेनें ती सहन करून दृढ निश्चयानें कर्तव्य गोष्टींवर. लक्ष देऊन दिवसानुदिवस पाऊल पुढें टाकूं. त्यांत कितीही संकटें आलीं, कितीही आशाभंग झाला, तरी धीर न सोडतां हातीं धरलेलें कार्य शेवटास जाईपर्यंत कधींही सोडणार नाहीं. हा जो स्वदेशास पुनः उत्तम स्थितीप्रत नेण्याविषयीं अभिमान, हा खरा स्वदेशाभिमान होय. हा जेथपर्यंत आपल्या हृदयांत उत्पन्न झाला नाहीं, तेथपर्यंत आपल्यांतील बारीकसारीक द्वेष, मत्सर, अल्पदृष्टि, केवळ स्वार्थपरता, एकमेकांचीं बारीकसारीक क्षुल्लकें ऐकण्याविषयीं, शोधून काढण्याविषयीं, व घांशीत बसण्याविषयीं क्षुद्रबुद्धि व अनुदारवृत्ति, हे दुर्गुण आम्हांमध्यें राहून आमच्या ऐक्यवृद्धीच्या आड अवश्य येतील, यांत संशय नाहीं.

यास्तव खऱ्या स्वदेशाभिमानाचा अभाव, हीही आपल्यांतील ऐक्यास एक मोठी हरकत होय.

या पूर्वोक्त हरकतींशिवाय आणखीही एक लहानशी हरकत मला वाटते, ती उचितादराचा त्याग ही होय. जेथपर्यंत आपल्या लोकांत वयोवृद्धत्वानें, विद्यावृद्धत्वानें, सत्त्ववृद्धत्वानें, गुणाढ्यतेनें, अधिकारीत्वानें जे मान्य व वंद्य व विश्वसनीय व अनुकरणीय व सेव्य, त्यांचा योग्य सत्कार होत नाहीं, त्यांजविषयीं यथायोग्य पूज्यबुद्धि व विनय मतीत उत्पन्न झाला नाहीं, वर्तनांत स्पष्ट दिसला नाहीं, तेथपर्यंत ऐक्यवृद्धीची मुळींच आशा नाहीं.

वा. आ. मोडक. मोडक यांचीं व्याख्यानें.

---

## पाठ ३० वा.



## सुधारकाचें साध्य.

### भाग १ ला.

पर्वत, नद्या, सरोवरें, झाडें, पाणी, रानें, समुद्रकिनारे, हवा, खाणी, फुलें व जनावरें ज्यांत स्पष्टपणें दाखविलीं आहेत, असा एक, व ज्यांत पारधी व पारधीचीं हत्यारें, शेतकरी व शेतकीचीं अवजारें, बाजार व त्यांतील कोट्यवधि कृत्रिम जिन्नस, न्यायसभा व तींत येणारे शेंकडों लोक, राजसभा व तींत बसणारे उठणारे सचिव, मंत्री वगैरे प्रमुख पुरुष, भव्य मंदिरें व उत्तुंग देवालयें, बागा व शेतें, झोंपड्या व गोठे, अनेक पदवींचे व अनेक धंदे करणारे पुरुष व स्त्रिया आणि त्यांचीं अर्भकें हीं ज्यांत व्यवस्थित रीतीनें काढिलीं आहेत असा एक, मिळून प्रत्येक खंडांतील ठळक देशांचे दोन दोन चित्रपट तयार करवून ते पुढें ठेवले, आणि त्यां-

कडे निःपक्षपातबुद्धीनें कांहीं वेळ पाहात बसलें, तर विचारी पुरुषांच्या मनांवर काय परिणाम होतील बरें ? प्रथम सृष्टपदार्थांच्या चित्रपटांचें अवलोकन केलें, तर त्यांवरून असें दिसून येईल कीं, विस्तृतता, बहुविधता, मनोरमता, अद्भुतता, उपयुक्तता व विपुलता यांपैकीं कोणत्याही गुणांत या भरतखंडाचा त्रिकोणाकृति पट ग्रीस, इटली, ऐलँड, युनायटेड स्टेट्स्, आस्ट्रेलिया यांपैकीं पाहिजे त्या रमणीय देशाच्या चित्रपटाशीं तुलना करण्याच्या हेतूनें मांडिला, तर असें म्हणावें लागेल की, आमच्या वांट्यास सर्वोत्तम न म्हटला, तरी उत्तमांपैकीं एक देश आला आहे. सह्य, विंध्य व कैलास यांसारख्या प्रचंड पर्वतांनी ज्याची तटबंदी झाली आहे, सिंधु, भागीरथी, नर्मदा, तापी, कृष्णा इत्यादि नदांनी व नद्यांनीं ज्यांतील क्षेत्रें सिंवण्याचें व उतारूंची व व्यापाराची गलबतें व आगबोटी वाहण्याचें काम पत्करलें आहे, हिंदीमहासागरानें ज्याला रशना होऊन शेंकडों बंदरें करून दिलीं आहेत, गुजराथ, माळवा, बंगाल, वऱ्हाड, खानदेश इत्यादि सुपीक प्रांतांनीं ज्यास हवें इतकें अन्नवस्त्र पुरविण्याची जबाबदारी घेतली आहे, ज्याच्या उदरांत कोठें ना कोठें तरी हवा तो खनिज पदार्थ पाहिजे तितका सांपडण्यास पंचाईत पडत नाहीं, ज्याच्या रानांत पृथ्वीवरील सर्व प्रकारच्या वनस्पति वाढत आहेत, व सर्व प्रकारचे पशुपक्षी संचार करीत आहेत, ज्यांत कोठें उष्ण कटिबंधांतली, कोठें शीत कटिबंधांतली व कोठें समशीतोष्ण कटिबंधांतली हवा खेळत आहे, सारांश, ज्यांतील कित्येक अत्यंत रमणीय प्रदेशांस 'अमरभूमि', 'नंदनवन', 'इंद्रभुवन', 'जगदुद्यान' अशा संज्ञा प्राप्त झाल्या आहेत, असा हा आमचा हिंदुस्थान देश आधिभौतिक संपत्तींत कोणत्याही देशास हार जाईल, किंवा यांतील सृष्टपदार्थांचा चित्र-

पट दुसऱ्या कोणत्याही देशाच्या चित्रपटापेक्षां कमी मनोरम ठरेल, असें वाटत नाहीं.

याप्रमाणें सृष्ट पदार्थांच्या चित्रपटांचें अवलोकन करून पूर्ण समाधान पावल्यावर दुसऱ्या पटाकडे वळल्याबरोबर चित्तवृत्तींत केवढा बदल होतो पहा ! या दुसऱ्या ऐतिहासिक चित्रपटांच्या केवळ लांबीचाच विचार केला, तर कदाचित् आमच्या पटाची लांबी सर्वांत अधिक भरण्याचा संभव आहे. वैदिक कालापासून आजतारखेपर्यंत आम्हांस जितकीं शतकें मोजतां येणार आहेत, तितकीं बहुश: दुसऱ्या कोणत्याही देशास मोजतां येणार नाहींत. या विस्तीर्ण कालावधींत अनेक राष्ट्रांची उत्पत्ति, अभिवृद्धि व लय होऊन तीं प्रस्तुत नामशेषमात्र राहिलीं आहेत; कांहींचा मुळींच मागमूस नाहींसा झाला आहे; व कांहींचा ऱ्हास झाला तरी त्यांनी संपादिलेल्या विद्यांचीं व कलांचीं रूपांतरें कोठें कोठें अद्यापि दृष्टीस पडत असल्यामुळें तीं त्यांच्या गतवैभवाची साक्ष देत आहेत. ज्याप्रमाणें कांही वनस्पति व कीटक परिणतावस्था प्राप्त झाली असतां आपलें तेज नूतनोत्पन्न अंकुरांत ठेवून आपण पंचत्वाप्रत पावतात, त्याचप्रमाणें अमेरिकेंतील व आशियांतील आणि विशेषत: युरोपांतील पुष्कळ राष्ट्रांची स्थिति झाली. ग्रीक विद्या आणि कला रोमन लोकांच्या हातीं पडून ग्रीस देशाचा अंत झाला. रोमन लोकांच्या सुधारणा अर्वाचीन युरोपिअन राष्ट्रांकडे येऊन रोमन लोक नष्ट झाले. आशिया व अमेरिका यांतील जुन्या राष्ट्रांचीही कांहीं अंशीं अशीच स्थिति झाली, व त्यांच्या सुधारणेच्या कांहीं खुणा अद्यापि कोठें कोठें दृष्टीस पडतात. चीन व हिंदुस्थान हे दोन देशमात्र खूप जुने असून काळाच्या जबड्यांतून वांचले आहेत, व कदाचित् आणखीही अनेक शतकें वांचण्याचा संभव

आहे. पण अशा प्रकारच्या केवळ वांचण्यांत विशेष पुरुषार्थ आहे कीं काय, हा मोठा विचारणीय प्रश्न आहे. अशा प्रकारचें केवळ वांचणें म्हणजे बऱ्याच अंशीं योगनिद्रेंत प्राण धरून राहिलेल्या योग्याच्या जगण्यासारखें होय. हिंदुस्थानच्या अस्तित्वाशीं तोलून पाहतां, जुन्या ग्रीक व रोमन लोकांचें अस्तित्व कांहींच नाहीं, असें म्हणतां येईल. पण तेवढ्या स्वल्प काळांत त्यांनीं केवढाले पराक्रम केले व केवढी अमर कीर्ति संपादिली ! भाषापरिज्ञानप्रवीणांनीं अलीकडे असा सिद्धान्त केला आहे कीं, हिंदु लोक, ग्रीक लोक, रोमन लोक व जर्मन शाखेपासून निघालेले अर्वाचीन युरोपांतील इंग्लिश, डच वगैरे लोक एकाच पूर्वजांपासून झालेले असावे. या सर्वांस ते आर्यकुलोद्भव राष्ट्रें म्हणतात. हें खरें असेल, तर काय सिद्ध होतें, कीं, एकाच झाडाचें बीं चार प्रकारच्या जमिनींत पडून त्यापासून चार प्रकारच्या वृक्षांचा उद्भव व्हावा, व प्रत्येकाला निराळ्या तऱ्हेची वाढ लागून त्याचा शेवटही निराळ्या तऱ्हेचा व्हावा, त्याप्रमाणें एकाच आर्यकुलापासून उत्पन्न झालेले आम्ही सर्व खरे, पण स्थानांतराप्रमाणें आम्हां सर्वांचा इतिहास निराळ्या प्रकारचा झाला ! आर्य लोकांची युरोपांत जी शाखा गेली, तीपासून ग्रीस देशांत एक उत्तम राष्ट्र उद्भवलें. त्याचीच एक मुळी इटाली देशांत जाऊन तीपासून जो नवीन अंकुर उत्पन्न झाला, त्यानें मातृवृक्षास नाहींसें करून आपला विस्तार बराच दूरवर नेला. पुढें त्यालाही वार्द्धक्यावस्था येऊन, त्याचा ऱ्हास होण्याच्या सुमारास बरींच नवीन रोपें अस्तित्वांत आलीं. तीं हीं अर्वाचीन युरोपांतील राष्ट्रें होत.

इकडे हिंदुस्थानांत आर्य लोकांची जी शाखा आली, तिचा निराळ्याच तऱ्हेचा इतिहास झाला. तिकडे जुन्या वृक्षानें नव्या अंकुरांत आपले गुण ठेवून आपण नाहींसें व्हावें, पुन्हा त्या नवीन

अंकुरानें तसेंच करावें, व प्रत्येक नवीन राष्ट्रोद्भव पहिल्यापेक्षां बहुतेक गुणांत वरिष्ठ व्हावा, असा प्रकार झाला. इकडे अशा प्रकारची राष्ट्रोद्भवपरंपरा अस्तित्वांत आली नाहीं. मूळ आर्यशाखा येथें येऊन तिच्यापासून जें झाड येथें लागलें, तेंच आजमितीपर्यंत अस्तित्वांत आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ग्रीक, रोमन, सिथियन, तार्तर, मोगल, अफगाण वगैरे लोकांच्या ज्या वावटळी त्यावर आल्या, त्यांमुळें त्याला बराच त्रास झाला. कधीं त्याच्या कांहीं फांद्या मोडून पडल्या; कधीं तें मुळा-पासून उपटून पडत आहे कीं काय, असें वाटलें. पण कर्मधर्मसंयोगानें युरोपांतील ग्रीक व रोमन शाखांवर आणि इकडील इराणी शाखेवर जो प्रसंग गुदरला, तो या भारतीय आर्यशाखेवर गुदरला नाहीं! यामुळें हें जरठ झाड कसें तरी अजून उभें आहे! पण त्यांत कांहीं त्राण उरलेलें नाहीं! तें आंतून अगदीं शुष्क होत आलें आहे व त्याचें खोड व फांद्या डळमळूं लागल्या आहेत. याला आतां असेंच उभें ठेवण्यास व यापासून नवीन शाखांचा उद्भव होऊन यास फिरून नवीनावस्था आणण्यास एकच उपाय आहे. तो कोणता म्हणाल, तर त्याची खूप खच्ची करून त्यास अर्वाचीन कल्पनाचें भरपूर पाणी द्यावयाचें! असें केलें तरच त्याचें पूर्वस्वरूप पूर्ण नष्ट न होतां, त्यापासून नूतनशाखावृत वृक्ष अस्तित्वांत येईल; पण तसें न केलें तर त्यावर प्रस्तुतकाली चोहोंकडून जे तीव्र आघात होत आहेत, त्यांखाली तें अगदीं जेर होऊन अखेरीस जमिनीवर उलथून पडेल.

---

*

# पाठ ३१ वा.



## सुधारकाचें साध्य.

### भाग २ रा.

हिंदुस्थानचा पूर्व इतिहास व सांप्रतस्थिति **सुधारकाच्या** वाचकांच्या लक्षांत थोडक्यांत यावी, यासाठीं वर ( मागील पाठांत ) ज्या रूपकाचें साहाय्य घेतलें आहे, त्यापासून लेखकाचा भाव त्यांच्या मनांत उतरला असेल, अशी त्याची आशा आहे. त्याचें स्पष्ट म्हणणें असें आहे कीं, हिंदु लोक रानटी अवस्थेंतून निघाल्या-वर कांहीं शतकेंपर्यंत राज्य, धर्म, नीति वगैरे कांहीं शास्त्रें, वेदान्त, न्याय, गणितादि कांहीं विद्या, व काव्य, गीत, नर्तन, वादनादि कांहीं कला, यांत त्यांचें पाऊल बरेंच पुढें पडल्यावर त्यांच्या सुधारणेची वाढ खुंटली, व तेव्हांपासून इंग्रजी होईपर्यंत ते कसे तरी राष्ट्रत्व संभाळून राहिले ! यामुळें त्यांचा इतिहासपट इतर देशांच्या इतिहासपटांहून फारच कमी मनोवेधक झाला आहे. आमची गृहपद्धति, आमची राज्यपद्धति, आमचीं शास्त्रें, आमच्या कला, आमचे वर्णसंबंध, आमच्या [illegible] चाली, आमच्या वागण्याच्या रीति, सारांश, इंग्रजी होईपर्यंत आमचें सारें व्यक्तिजीवित्व व राष्ट्रजीवित्व ठशांत घालून ओतलेल्या पोलादा-सारखें, किंवा निबिडशृंखलाबद्ध बंदिवानासारखें, अथवा उदकाच्या नित्य आघातानें दगडाप्रमाणें कठिण झालेल्या लांकडा-सारखें किंवा हाडकासारखें शेंकडों वर्षे होऊन राहिलें, असें म्हण-ण्यास हरकत नाहीं.

ही आमची शिलावस्था आम्हांस पाश्चात्त्य शिक्षण मिळूं लागल्यापासून बदलूं लागली आहे. आजमितीस या शिक्षणाच्या

टांकीचे आघात फारच थोड्यांवर घडत आहेत. पण दिवसें दिवस ते अधिकांधिकांवर घडूं लागतील, असा अजमास दिसत आहे. ज्यांना या टांकीपासून बराच संस्कार झाला आहे, ते समुदायापासून अगदीं विभक्त झाल्यासारखे होऊन उभयतांत सांप्रत कालीं एका प्रकारचें वैषम्य उत्पन्न झालें आहे. या वैषम्यास विशेष कारण कोण होत आहेत, हें येथें सांगण्याची गरज नाही. येथें एवढेंच सांगितलें पाहिजे कीं, मूळ प्रकृति म्हणजे भारतीय आर्यत्व न सांडतां, या पाश्चात्त्य नवीन शिक्षणाचा, व त्याबरोबर ज्या नवीन कल्पना येत आहेत, त्यांचा आम्ही योग्य रीतीनें अंगीकार करीत गेलों, तरच आमचा निभाव लागणार आहे. या कल्पना आमच्या राज्यकर्त्यांकडून येत आहेत, म्हणून त्या आम्हीं स्वीकाराव्या, असें आमचें म्हणणें नाहीं. त्यांचें अभिनंदन करून त्यांचा आपण अंगीकार केला पाहिजे, असें जें आम्ही म्हणतों, तें अशासाठीं कीं, त्या शिक्षणांत व त्या कल्पनांत मनुष्यसुधारणेच्या अत्यवश्य तत्त्वांचा समावेश झाला आहे. म्हणून ज्या लोकांस लयास जावयाचें नसेल, त्यांनीं त्यांचें अवलंबन केलेंच पाहिजे. त्याशिवाय गत्यंतर नाहीं. समाजानें कुशल राहून त्यास अधिकाधिक उन्नतावस्था येण्यास जेवढीं बंधनें अपरिहार्य आहेत, तेवढीं कायम ठेवून बाकी सर्व गोष्टींत व्यक्तिमात्रास (पुरुषास व स्त्रीस) जितक्या स्वातंत्र्याचा उपभोग घेतां येईल तितका द्यावयाचा, हें अर्वाचीन पाश्चात्त्य सुधारणेचें मुख्य तत्त्व आहे, व हें ज्यांच्या अंतःकरणांत बिंबलें असेल, त्यांना आमच्या समाजव्यवस्थेंत अनेक दोषस्थलें दिसणार आहेत, हें उघड आहे. हीं दोषस्थलें वारंवार लोकांच्या नजरेस आणावीं, तीं दूर करण्याचे उपाय सुचवावे, आणि युरोपीय सुधारणेंत अनुकरण करण्यासारखें काय आहे, तें

पुनः पुनः दाखवावें, यास्तव हें **सुधारकपत्र** काढलें आहे. कोणत्याही वादग्रस्त प्रश्नाविषयीं जें लोकमत असेल, तें पुढें आणणें हेंच काय तें पत्रकर्त्याचें कर्तव्य असें जे मानीत असतील, ते तसें खुशाल मानोत. लोकमत अमुक टप्प्यापर्यंत येऊन पोंचलें आहे, सबब कोणत्याही व्यक्तीनें किंवा सरकारने त्यापुढें जाऊं नये, असें म्हणणें म्हणजे झाली आहे तेवढी सुधारणा बस्स आहे, पुढें जाण्याची गरज नाहीं, असेंच म्हणण्यासारखें होय. व्यक्तीनें किंवा सरकारनें साधारणपणें लोकमतास धरून वर्तन करणें किंवा कायदे करणें, हें सामान्य गोष्टींत ठीक आहे; पण कांहीं प्रसंगीं लोकांच्या गाढ अज्ञानामुळें किंवा दुराग्रहामुळें, व्यक्तीस लोकांची पर्वा न करितां स्वतंत्रपणें वर्तावें लागतें, व सरकारास लोकमताविरुद्ध कायदे करावे लागतात. बारकाईनें विचार केला तर असें दिसून येईल कीं, प्रजासत्ताक राज्यांतसुद्धां अनेकदां बहुमताविरुद्ध अधिकृत लोकाचें म्हणजे सरकारचें वर्तन होत असतें. तथापि सामान्यतः सरकारचें वर्तन लोकमतास धरून असेल तितकें बरें; पण जे लोक हा सिद्धान्त कबूल करितात, ते लोकमत दिवसें दिवस सुधारत चाललें आहे, असें समजतात. तेव्हां आतां असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, लोकमताची सुधारणा व्हावी तरी कशी ? जो तो अस्तित्वांत असलेल्या लोकमतापुढें जाण्यास भिईल, तर त्यांत बदल व्हावा कसा ? लोकाग्रणींनीं हें काम पत्करलें नाहीं, तर तें कोणीं पत्करावयाचें ? जो तो लोकमताच्या बागुलबुवाला भिऊन दडून बसेल, तर कोणत्याही समाजाला उन्नतावस्था येणार नाहीं, इतकेंच नाहीं, तर त्याची चालू स्थितिसुद्धां कायम न राहतां उलट त्यास उतरती कळा लागून अखेर त्याचा ऱ्हास होईल. म्हणून कोणी तरी अस्तित्वांत असलेल्या लोकमतांतील दोषस्थळें दाखविण्याचें

व समाजांतील बहुतेक लोकांस अप्रिय परंतु पथ्यकारक असे विचार त्यांच्यापुढें आणण्याचें अनभिमत काम करण्यास तयार झालेंच पाहिजे. असें करण्यास लागणारें धैर्य ज्या समाजांतील कांहीं व्यक्तींच्यासुद्धां आंगीं नसेल, त्या समाजांनी वर डोकें काढण्याची आशा कधींही करूं नये.

---

## पाठ ३२ वा.



## सुधारकाचें साध्य.

### भाग ३ रा.

हे विचार बरोबर असतील, तर त्यांवरून हें दिसून येईल कीं, जे कोणी कोणत्याही मिषानें किंवा रूपानें लोकांपुढें लोकाग्रणी म्हणून मिरवूं लागले असतील, त्यांनीं लोकांची मर्जी संपादण्यासाठीं, अथवा त्यांजकडून आपली पाठ थोपटून घेण्यासाठीं, किंवा परोपकाराचें ढोंग करून स्वहित साधण्यासाठी त्यांच्या दोषांचें किंवा दुराग्रहांचें संवरण किंवा मंडण करणें अत्यंत लज्जास्पद होय. असे लोकाग्रणी त्यांस सुमार्ग न दाखवितां केव्हां एखाद्या खड्डयांत नेऊन घालतील, हें सांगवत नाहीं. प्रस्तुत स्थितींत अशा लोकाग्रणीचें वर्तन आमच्या देशास फारच विघातक होणार आहे. ज्यांना समाजाच्या घटनेचीं, अभिवृद्धीचीं व लयाचीं कारणें ठाऊक नाहींत, कदाचित् पितृतर्पणापुढें ज्याचें ज्ञान गेलेलें नाहीं, विषयोपभोगांशिवाय अन्य व्यवसाय ज्यांना अवगत नाहीं, वरिष्ठांची प्रशंसा आणि कनिष्ठांशीं गर्वोक्ति यांहून अन्य प्रकारचें भाषण ज्यांस फारसें माहीत नाहीं, अनेक देशांतील उद्योगी पुरुषांनीं अहर्निश परिश्रम करून पदार्थधर्मांचें केवढें ज्ञान संपादिलें आहे,

विपद्विनाशक व सुखवर्धक किती साधनें शोधून काढिलीं आहेत, व राज्य, धर्म, नीति वगैरे विषयांतील त्यांचे विचार किती प्रगल्भ झाले आहेत, हें ज्यांना ऐकूनसुद्धां ठाऊक नाहीं, अशा गृहस्थांनीं, "आम्ही हिंदु लोक नेहमीं परतंत्रच असलों पाहिजे; कांहीं केलें तरी अधिक राज्याधिकार उपभोगण्याची पात्रता आमच्या अंगीं यावयाची नाहीं; राष्ट्रीय स्वातंत्र्याचा विचार आम्हीं कधीं स्वप्नांतसुद्धा आणूं नये; स्थानिक स्वराज्य, राष्ट्रीय परिषद, कायदेकौन्सिलांतील लोकनियुक्त सभासद, स्वसंतोषानें शिपाईगिरी करण्याची इच्छा धरणें, या व अशा तऱ्हेच्या दुसऱ्या उठाठेवींत आम्ही पडणें हें शुद्ध मूर्खपण होय," असें मोठ्या आढ्यतेनें म्हणावें, हें अत्यंत बाष्कळपणाचें आहे. अशा प्रकारचें प्रतिपादन करणाऱ्या लोकांस लोकाग्रणी न म्हणतां लोकशत्रु म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. तसेंच जेवढीं जुनीं शास्त्रें तेवढीं सारीं ईश्वरप्रणीत, त्यांना हात लावणें हें घोर पातक, अशी ज्यांची समजूत, जगन्नियंत्याच्या तोंडांतून, हातांतून, मांडींतून व पायांतून एकेक वर्ण निघाला, अशी ज्यांची वर्णोत्पत्तीविषयीं कल्पना, पंचामृतानें व धूपदीपानें केलेली पूजामात्र ईश्वरास मान्य, याहून ईशपूजेचा विशेष प्रशस्त मार्ग नाहीं, असे ज्यांचे धर्मविचार, आहे ही सामाजिक स्थिति अत्युत्तम, हींत फिरवाफिरव करण्यास कोठेंही अवकाश नाहीं, सध्यां येथें स्त्रियांचे पुरुषांशीं, मुलांचे आईबापांशीं जे संबंध चालत आहेत, तेच उत्तम आहेत, व अनंत काल तेच चालले पाहिजेत, ज्ञान संपादणें हें पुरुषाचें कर्तव्य, शिशुसंगोपन हें स्त्रियांचें कर्तव्य, पुरुष स्वामी, स्त्री दासी, स्वातंत्र्य पुरुषांकडे, पारतंत्र्य स्त्रियांकडे, विवाहाशिवाय स्त्रीस गति नाहीं, गृहाशिवाय तिला विश्व नाहीं, वैधव्य हें

तिचें महाव्रत व ज्ञानसंपादन हा तिचा मोठा दुर्गुण, अशा प्रकारच्या ज्यांच्या धर्मविषयक व सामाजिक कल्पना, असे लोकाग्रणी काय कामाचे ? अशांच्या उपदेशानें व उदाहरणानें आम्हांस चांगलें वळण कसें लागणार ? व इतर सुधारलेल्या राष्ट्रांस होत असणाऱ्या सुखाचा लाभ आम्हांस कशानें होणार ? निदान **सुधारकास** तरी असले लोकाग्रणी व त्यांचें वर्तन मान्य नाहीं. ज्या तत्त्वांचें अवलंबन केल्यामुळें इतर राष्ट्रें अधिकाधिक सुधारत चाललीं आहेत, त्या तत्त्वांचा स्वीकार करण्यास आम्हीं आनंदानें तयार झालें पाहिजे. तीं तत्त्वें हा **सुधारक** महाराष्ट्रलोकांपुढें वारंवार आणील. असें करण्यांत त्यास, आज ज्याचा जारीनें अंमल चालत आहे, त्या लोकमताविरुद्ध बरेंच जावें लागणार असल्यामुळें, फार त्रास पडणार आहे. पण त्याची तो पर्वा करीत नाहीं; कारण ज्या लोकमताचा पुष्कळांस बाऊ वाटतो, त्याचा सूक्ष्म दृष्टीनें विचार केला असतां असें दिसून येईल कीं, बऱ्याच बाबतींत त्याचा आदर करण्यापेक्षां अनादर करणें हाच श्लाघ्यतर मार्ग होय. कोट्यवधि अक्षरशत्रु व विचारशून्य मनुष्यांनीं आपल्या अडाणी समजुतीप्रमाणें चांगलें म्हटलें किंवा वाईट म्हटलें, अज्ञान व धर्मभोळ्या लोकांच्या आचरट धर्मकल्पनांची व वेडसर सामाजिक विचारांची प्रशंसा करून, त्यापासून निघेल तेवढी माया काढणाऱ्या स्वार्थपरायण उदरंभर हजारों टवाळांनीं शिव्यांचा वर्षाव केला, किंवा छी:थू करण्याचा प्रयत्न केला, शेंकडों अविचारी व हेकड लोकांनीं नाकें मुरडलीं किंवा तिरस्कार केला, सारांश, ज्याना मनुष्याच्या पूर्णावस्थेचें स्वरूप बिलकूल समजलें नाहीं, किंवा ती घडून येण्यास काय केलें पाहिजे, हें ठाऊक नाहीं, अशांच्या पर्वतप्राय झुंडीच्या झुंडी तुटून

पडल्या, तरी जो खरा विचारी आहे, ज्याला लोककल्याणाची खरी कळकळ आहे, सत्य बोलणें व सत्यास धरून चालणें यांतच ज्याचें समाधान आहे, अशानें वरच्यासारख्या क्षुद्र लोकांच्या अवकृपेला, रागाला किंवा उपहास्यतेला यत्किंचित्‌ही न भितां आपल्या मनास योग्य वाटेल तें लिहावें, बोलावें व सांगावें हेंच त्यास उचित होय. त्याच्या अशा वर्तनांतच जगाचें हित आणि त्याच्या जन्माची सार्थकता आहे.

गो. ग. आगरकर. निबंधसंग्रह.

---

## पाठ ३३ वा.



### काव्यलक्षण.

अनेक शब्दार्थसाहित्यानें, स्पष्ट पदार्थांचें आणि मनोविकारांचें-ही काढिलेलें आनंदजनक चित्र, तीं कविता होय, असें कवितेचें मी स्वरूप मानितों. काव्यप्रकाशादि साहित्यग्रंथांत, निर्दोष शब्दार्थां-नीं व गुणालंकारांनीं झालली वाक्यपंक्ति ती कविता, म्हणून व्याख्या केली आहे. आमच्या व्याख्येंत आणि या व्याख्येंत फरक इतकाच कीं, आमची व्याख्या काव्यरीतीनें रचिली आहे, व शास्त्रकारांची साध्या तात्त्विक रीतीनें लिहिलेली आहे. तथापि दोन्ही व्याख्यांपासून एकाच प्रकारच्या कवितेच्या रूपाचा बोध होतो. असो. सिंहव्याघ्रादि पशु, गरुडादि पक्षी, गगनचुंबी वृक्षांची घोर अरण्यें, फलपुष्पांनी लवलेले व फुल्ल झालेले बागबगीचे, समरांगणें, क्रोधी, शमदमशील अशा लोकांच्या मुद्रा, नद्यांचे गंभीर व शांत ओघ, भयानक धबधबे, समुद्रांची शांत आणि क्रोधोद्धत मुद्रा, इत्यादि वस्तूंचीं हुबेहूब काढिलेलीं चित्रें

पाहिलीं असतां आनंद होतो; त्याहून काव्यसृष्टींतील विचित्र शब्दार्थांनीं जाणविलेल्या आकृतींच्या अवलोकनापासून शतपट अधिक आनंद रसिकजनांच्या अनुभवास येतो; ज्या ज्या वृत्तीस अनुसरून कवीनें हुबेहूब वर्णन केलें असेल, तें वर्णन वाचीत असतां अगर ऐकत असतां ती ती वृत्ति जागृत होऊन रसिकजनांचा मनःसमुद्र वर उचलूं लागतो. घनगर्जनेनें मोरास, चंद्रदर्शनानें चकोरास, वत्सदर्शनानें धेनूस प्रमोद होतो, हें जसें स्वभावसिद्ध आहे, तसेंच स्वभावोक्तीपासून खऱ्या रसिकांस आनंद होणें स्वाभाविक आहे. श्लेषादि शब्दचमत्कृतींत खेळून चित्तरंजन करून घेणारे महापंडितही कोठें कोठें आढळतात, व तदितर स्वभावोक्त्यादिकांनीं युक्त रचना करणाऱ्यांस प्राकृत पोकळ कवि असें ते समजतात; परंतु ही त्यांची चूक आहे, असें वाटतें. शब्दांनीं खेळण्यांत जो आनंद ते मानितात, तो कदाचित् सोंगट्यांनी खेळण्यांतही अनुभवास येण्याजोगा आहे; पण ज्या अर्थचमत्कृतीनें चंद्र आणि चंद्रकांतमणि यांच्या संबंधाप्रमाणें रसिकाच्या हृदयाची अवस्था होऊन जाते, त्या आनंदाची बरोबरी शब्दचमत्काराचा क्षुद्रानंद करील काय? चित्रांत ज्याप्रमाणें आनंदाचें बीज केवळ स्वभावदर्शन आहे, त्याचप्रमाणें काव्यसृष्टीतही आनंदाचें बीज स्वभावोक्तिच होय. आपल्या कल्पनेनें सुंदर व सुरेख मानिलेल्या मनुष्यादिकांची आकृति चितारण्याची कला पुष्कळ काळापूर्वीपासून चालत आली आहे; पण हल्लीं निघालेल्या फोटोग्राफांतील स्वभावतुल्य चित्रावलोकनानें जो आनंद होतो, तो इतर चित्राकृतींनीं होत नाहीं; व जेव्हां फोटोग्राफाचें नांवसुद्धां ठाऊक नव्हतें, तेव्हांही हुबेहूब चित्रें काढणाऱ्यांच्या कलेची अधिक मान्यता असून तशी कला संपादन करण्यास श्रम, बुद्धि व काळही पुष्कळ

लागत होता, असें दिसतें. तो आनंद स्वभावोक्तीनेंमात्र फार उत्कर्षाला पावतो. नाटकानें जशी रमणीयता अनुभवास येते, तशी श्राव्यकाव्यानें येत नाही. ह्याचें तरी हेंच तत्त्व आहे कीं, नाटकांत केवळ स्वभावोक्तिच प्रधान असते. यावरून ज्या कवीच्या कवितेंत स्वभावोक्ति उत्तम साधलेली असेल, त्याचेंच काव्य उत्तम मानावें. स्वभावोक्तीत व्यंग्यादि अर्थ येतातच. तेव्हां कवीच्या शक्तीप्रमाणें आणि प्रीतीप्रमाणें तो पाहिजे त्या अर्थास प्रधान करून काव्य लिहील, तरी स्वभावोक्तीमुळें त्यास कांहीं अडचणही नाहीं. तथापि वाच्यार्थांत जरी त्यानें उत्तम रीतीनें स्वभाव वठवून दिला, तरी त्या कवीच्या कवितेस उत्तम गणावयास कांहीं हरकत नाहीं. आणि व्यंग्यार्थप्रधानत्वमात्र ठेवून स्वभाव सोडून दिला, तर तशा काव्यास उत्तम गणूं नये, असें माझ्या मतानें वाटतें.

मुक्तेश्वर, वामनपंडित, रामजोशी, अमृतराय, श्रीधर, एकनाथ, इत्यादि कवींच्या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं स्वभावोक्ति आढळते; तथापि काव्यप्रकाशकर्त्यांनी सांगितलेल्या लक्षणाप्रमाणें प्रस्फुट व्यंग त्यांत मुळींच सांपडावयाचें नाहीं; म्हणून ध्वनिकाव्यासच उत्तम मानणाऱ्यांच्या मतानें महाराष्ट्रकवींतील कोणाचीच कविता उत्तम नाहीं, असा सिद्धान्त झाला. आमच्या मतानें वरील कवींच्या ग्रंथांत ज्या ज्या ठिकाणीं मनोविकारांचें अथवा सृष्टीचें हुबेहूब चमत्कारिक वर्णन साधिलेलें आढळेल, तीं तीं ठिकाणें उत्तम कवितेचीं मानिलीं पाहिजेत; व अतिशयोक्ति, श्लेष, इत्यादिकांनीं जेथें जेथें वाजवीपेक्षां फाजील रंग दिला असेल, तें तें ठिकाण मध्यम काव्याचें आणि अर्थचमत्कृतिशून्य शब्दचमत्कारता ज्या ज्या काव्यांत आढळेल, तें तें काव्य अधम होय. असे विभाग केले असतां काव्याचें लक्षण अधिक व्यापक व महाराष्ट्र-कवितेस सोयस्कर होईल, असें वाटतें.

महाराष्ट्रकवितेस जें लक्षण सोयकर, तें संस्कृतादि भाषांतील काव्यासही तसेंच लागू पडावें. कारण भाषा म्हणजे पात्रासारखी आहे व कविता रसरूप आहे. तेव्हां पात्रांतर झालें, म्हणून रसाच्या स्वरूपांत कांहीं फरक होण्याचा संभवच नाहीं. यास्तव वर केलेलें लक्षण संस्कृत, पारशी, हिंदी, इत्यादि भाषांतील कवितेस लागणार नाहीं, असें नाहीं; तथापि महाराष्ट्र-भाषेच्या पद्धतीप्रमाणें व सांप्रत महाराष्ट्रांत जी बनलेली कविता आहे तिजवरून असें दिसतें कीं, पारशी, हिंदी, संस्कृत इत्यादि भाषांत ज्याप्रमाणें वक्रोक्तीनें अथवा व्यंग्यार्थानें इष्टार्थ दाखविण्याचा अतिसाधारण परिपाठ आहे, तसा मराठी भाषापद्धतीत किंबहुना काव्यांतही नाहीं. यामुळें ध्वनिकाव्य उत्तम म्हणून जी संस्कृतसाहित्यांत मर्यादित लक्षणा केली आहे, ती मराठीस व्यापकत्वेंकरून लागत नाही. उत्तम काव्याचें फल आनंदजनकता, ती, ध्वनिस्वरूप नसतांही, महाराष्ट्रकवितेपासून रसिकांस यथेच्छ प्राप्त होतच आहे; तेव्हां आनंदजनकतेस उत्तम काव्यांत घालण्याकरितां आम्ही वर लिहिल्याप्रमाणें व्यापक लक्षणा केली आहे. ती महाराष्ट्र-भाषा-कवितेस उत्तम प्रकारें लागू होते, हें कोणीही कबूल करील.

बा. म. हंस. हंसांचे निबंध.

---

## पाठ ३४ वा.



## कवि, काव्य आणि काव्यरति.

### भाग १ ला.

अहोरात्र मोठमोठ्या राजकीय प्रकरणांनीं ज्यांचें मन व्यग्र केलें आहे, अवाढव्य व्यापारविस्ताराची व्यवस्था पाहतां पाहतां ज्यांना

जेवणासमुद्धां पुरेशी फुरसत सांपडत नाहीं, शास्त्राभ्यासांत गढून गेल्यामुळें प्रपंचसुखाविषयीं ज्यांना वैराग्य उत्पन्न झालें आहे, अथवा प्रपंचाच्या काळजींत जे अगदीं चूर होऊन गेले आहेत, अशांपैकीं प्रत्येकास केव्हां केव्हां सवडींत सवड करून घटकाभर एखादें नाटक किंवा काव्य हातांत घ्यावें असें कां वाटतें ? आपल्या आयुष्याचीं पूर्ण पन्नास वर्षें ज्यानें इंग्लंडच्या राजकीय घडामोडींत घालविलीं, त्या ग्लाडस्टनला एखादे दिवशीं 'होमर' वाचण्याची इच्छा कां होई ? लढाईच्या सामानाबरोबर सफॉक्लीज वगैरेंचीं नाटकें अलेक्झांडर कां बाळगी ? तास दोन तास कथा-श्रवण करण्यासाठीं शिवाजी आपला जीव वारंवार धोक्यांत कां घाली ? 'उत्तररामचरित्रा'-च्या कर्त्याचें नांव संस्कृतज्ञ अद्यापि प्रेमानें कां स्मरतात ? किर्लोस्करकृत सौभद्राला झुंडीच्या झुंडी कां लोटतात ? 'नाटकें करावीं' असा अभिप्राय कै० विष्णुशास्त्र्यांनीं कां दिला ? पाश्चात्त्य पाठशालांत व इंग्रजांनीं या देशांत स्थापिलेल्या शाळांत प्राचीन व अर्वाचीन कवींचीं काव्यें विद्यार्थ्यांकडून वाचविण्याचा परिपाठ कां पडला आहे ?

वरील प्रश्नांचें समाधान होण्यासारखें उत्तर ज्यांस देतां येईल, त्यांस काव्यरसाचें हृद्गत समजलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

कोणी असें म्हणतात कीं, काव्यांत जी पद्यरचना असते, ती कर्णमनोहर असते, म्हणून काव्यवाचनापासून मनुष्यास आनंद होतो. यावर कित्येकांचा असा आक्षेप आहे कीं, 'अमरा'-सारख्या ग्रंथांत पद्यरचना असतांही, त्यास कोणी काव्य म्हणत नाहीं. तेव्हां पद्यरचनेंत काव्यात्मा नाहीं. कोणी असें म्हणतात कीं, काव्य हें मनुष्यस्वभावाचें आणि सृष्टीचें हुबेहूब चित्र आहे, म्हणून त्याचें वाचन मनुष्यास आल्हाद देतें. यावर कित्येकांचा

असा आक्षेप आहे कीं, वैद्यकादि ग्रंथांत वनस्पत्यादिकांच्या गुणांचीं व धर्मांचीं जीं हुबेहूब वर्णनें आहेत, त्यांस कोणी काव्य म्हणत नाहीं. त्या अर्थीं मनुष्याच्या किंवा सृष्टीच्या यथार्थ वर्णनांत काव्यात्मा आहे, असें म्हणतां येत नाहीं. शिवाय काव्य हें मनुष्याच्या स्वभावाचें यथार्थ वर्णन असेल, तर त्यांत पद्यरचना कधींच उपयोगाची नाहीं. कारण, सुखदुःखादि कोणत्याही मनोविकारांचा कितीही अतिरेक झाला, तरी तत्संबंधी उद्गार वृत्तबद्ध निघत नाहींत; आणि काव्यांत तर गद्यापेक्षां पद्यरचनाच विशेष आढळते. तेव्हां काव्य हें आहे तरी काय ? कवींना इतकें मोठेपण देण्याचें कारण काय ? चांगल्या काव्याच्या वाचनानें आनंद कां होतो ? हे प्रश्न पुनः निरुत्तर राहिल्यासारखे दिसतात.

आमच्या मतें जो कोणी क्षणभर अंतर्दृष्टि करून या प्रश्नांचा शांतपणें विचार करील, त्याला त्यांचें बरोबर उत्तर तेव्हांच देतां येईल. काव्यांत बहुशः पद्यरचना असते; तथापि कांहीं प्रकारच्या गद्यांतही काव्यगुण असतात. तसेंच, ‘काव्य’ हें मनुष्याच्या स्वभावाचें आणि सृष्टीचें यथार्थ वर्णन आहे, वगैरे ‘काव्य’ शब्दाच्या अर्थनिर्णायक प्रत्येक प्रयत्नांत थोडें थोडें सत्य आहे. त्यांत समग्र सत्य नाहीं, म्हणून ते समाधानकारक होत नाहींत. त्यांत कांहीं तरी न्यूनता आहे असें वाटतें; पण ती कोठें आहे, हें समजत नाहीं. काव्यवाचनापासून आनंद होतो, हें निर्विवाद आहे. तो ज्या कारणांनीं होतो, त्यांची मीमांसामात्र संशयाकुल आहे.

काव्याचें खरें स्वरूप लक्षांत येण्यासाठीं मनुष्याच्या मनोधर्मांचा थोडासा विचार करणें जरूर आहे. जागृतावस्थेंत मन चंचल असतां त्यांत जे व्यापार चालतात, त्यांचे ‘संवेदना’, ‘इच्छा’, व ‘ज्ञान’ असे तीन वर्ग करितां येतील. या तीन

अनुभवांस मन ही संज्ञा आहे. यांपैकीं पहिल्याशीं काव्याचा विशेष संबंध आहे. संवेदना दोन प्रकारची आहेः प्रतिकूल व अनुकूल. प्रतिकूल संवेदनेस आपण दुःख म्हणतों, व अनुकूल संवेदनेस सुख म्हणतों. ज्यापासून प्रतिकूल संवेदना उत्पन्न होतात, तें आपणांस आवडत नाहीं. ज्याच्यापासून अनुकूल संवेदना उत्पन्न होतात, तें आपणांस प्रिय होतें. कारण, दुःखाचा कंटाळा आणि सुखाचा अभिलाष, या मनुष्याच्या मनाच्या स्वाभाविक वृत्ति आहेत. इतर सुखद वस्तूंप्रमाणें काव्यापासून आपणांस अनुकूल संवेदना होतात, म्हणून तें आपणांस आवडतें. ज्या लेखरचनेपासून वाचकांस ज्ञान करून देण्याचा हेतु असतो, तींत काव्य नसतें; जी रचना वाचकांच्या अंतःकरणांत अनुकूल संवेदना उत्पन्न करण्याकरितां केलेली असते, ती काव्य होय ! वास्तविक पाहतां कोणतीही लेखरचना केवळ संवेदना उत्पन्न करण्यासाठीं, किंवा केवळ ज्ञान करून देण्यासाठीं केलेली असत नाहीं. ज्ञान करून देण्यासाटीं केलेलीं पुस्तकें मनोरंजक करण्याचा प्रयत्न केलेला असतो; मनोरंजक पुस्तकांत जातां जातां थोडेंसें ज्ञान देण्याचा प्रयत्न असतो. मृदुता किंवा रमणीयता हा काव्याचा प्रधानगुण; काठिण्य किंवा कर्कशता हा शास्त्रीय ग्रंथाचा प्रधान गुण. शास्त्रीय ग्रंथास थोडी मृदुता आणिल्यानें त्याचें अध्ययन कष्टावह होत नाहीं. काव्यांत कोठें काठिण्य येऊं दिलेलें असतें, तेंच वाचकांस आनंदाबरोबर ज्ञानही करून देण्याच्या हेतूनें येऊं दिलेलें असतें.

पुढें जें सांगावयाचें आहे, त्यासंबंधानें गैरसमज होऊं नये, म्हणून येथें इतकें स्पष्ट करणें जरूर आहे कीं, 'काव्य' शब्दांत आम्हीं नाटकादि सर्व सुखोत्पादक लेखांचा समावेश केला आहे. व 'कवि' शब्दांत असले लेख लिहिणाऱ्या नाटककारादि सर्व लोकांचा समा-

वेश केला आहे. मनुष्याच्या विचारांत, प्रत्यक्ष अनुभवांत किंवा लेखांत बाह्यसृष्टि किंवा अंतःसृष्टि, यांशिवाय दुसरा कोणता विषय असूं शकणें शक्य नाहीं. कारण, या दोन सृष्टि सांगितल्या म्हणजे कल्पनीय वस्तूंची परमावधि झाली. या दोन सृष्टींबाहेर आम्ही जाणार कोठें? व विचार कशाचा करणार? मनांतील अनंत व्यापार, यांपैकीं एक किंवा अनेक, हेच आमच्या सुखानुभवाचे विषय असले पाहिजेत. तसेंच, ज्ञान म्हणजे अंतर्बाह्य सृष्टींतील वस्तूंचा यथार्थ निर्णयच आहे. शास्त्रीय ग्रंथांतल्याप्रमाणें काव्यांतही हुबेहूब वर्णन केलें पाहिजे. ज्याप्रमाणें शास्त्रीय ग्रंथाला, त्याप्रमाणेंच काव्यालाही याच गुणानें माहात्म्य, सारता व महार्घता येते. ज्यांत सत्यनिरूपण नाहीं, तो शास्त्रीय ग्रंथ जसा कवडीच्या मोलाचा, त्याचप्रमाणें ज्यांत सत्यनिरूपण नाहीं, असा काव्यग्रंथही कवडीच्या मोलाचा. दोघां-चाही सत्यकथनावर, यथार्थ वर्णनावर, किंवा हुबेहूब चित्र काढण्यावर सारा कटाक्ष आहे. भेद इतकाच आहे कीं, शास्त्रीय ग्रंथांतील विषय आणि त्यासंबंधानें सत्य सांगण्याची पद्धत, याहून निराळीं असतात.

---

## पाठ ३५ वा.



## कवि, काव्य आणि काव्यरति.

### भाग २ रा.

मनुष्यांच्या दुःखाचा परिहार व सुखाची वृद्धि करण्याचें सामर्थ्य ज्ञानाच्या अंगीं आहे, म्हणूनच मनुष्यें त्याच्या पाठीमागें लागलीं आहेत. तसें नसतें, तर त्याचा नाद त्यांना कधींच न लागता. ज्ञान हें मनुष्यांच्या सुखाचें प्रधान साधन आहे. तथापि तें झाल्या-

बरोबर त्यापासून सर्वांस सुख होऊं लागेल असें नाहीं. सुखावह होण्यास त्यास अनुकूलसंवेदनोत्पादक व्हावें लागतें. जोंपर्यंत त्याला हें नूतन स्वरूप आलें नाहीं, तोंपर्यंत तें काव्यविषय होऊं शकत नाहीं; कारण, अनुकूलसंवेदनोत्पादक असणें हा काव्याचा प्रधान गुण आहे. आज ज्या कित्येक गोष्टींचें ज्ञान फक्त तत्त्ववेत्त्यांसच आनंद देत आहे, तें कालांतरानें सर्व जनांस आनंददायक होईल. परंतु तें तसें होऊं लागण्यापूर्वीं बराच अवधि लोटला पाहिजे. तो लोटला कीं, तें सुखोत्पादक होऊन कवींच्या माऱ्यांत सांपडणार ! यावरून काय सिद्ध झालें कीं, आज ज्या गोष्टी शास्त्रीय ग्रंथांत कोंडून राहिल्या आहेत, त्या, व येथून पुढें ज्यांचा शोध शास्त्रवेत्ते करतील, त्या, अवश्य काळ गेला म्हणजे, काव्यविषय होऊं शकतील, आजपर्यंत असेंच होत आहे. आंग्लभौम राजकवि लॉर्ड टेनिसन याचें 'प्रिन्सेस' नामक काव्य (ज्याचें डॉ० कीर्तिकर यांनीं मराठींत भाषांतर करून तें 'इंदिरा' या नांवानें प्रसिद्ध केलें आहे,) हें या नियमाचें उदाहरण आहे. हा नियम खरा असेल, तर ज्ञानप्रसार होऊं लागला, म्हणजे कवित्वशक्तीस मांद्य येतें, असा जो कित्येकांनीं साहसाचा अभिप्राय दिला आहे, तो खोटा ठरतो. इंग्लंडांतील प्रसिद्ध ग्रंथकार डॉ० जॉन्सन यानें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, काव्य करण्याजोगे नामी नामी विषय जगांतील जुने कवि लाटून बसल्यामुळें, अर्वाचीन कवींस मनोरंजक काव्यें लिहिण्यासारखे विषयच राहिले नाहींत! शास्त्रप्रसार काव्यरचनेस घातक आहे, हें विलक्षण मत मेकॉलेनें ठोकून दिलें आहे ! काव्यास अलीकडे जें थोडेंसें मांद्य आल्यासारखें दिसतें, त्याचें कारण अर्वाचीन ज्ञानप्रसार नव्हे, तर अर्वाचीन ज्ञानप्रसारामुळें काव्यवस्तु करण्याजोगे जे नवीन विषय उत्पन्न झाले आहेत, त्यांचा अर्वाचीन कवि काव्य-

रचनेंत उपयोग न करितां, प्राचीन कवींच्या काव्यविषयांवर फिरून फिरून लिहितात, व त्यांच्या भाषेचें अनुकरण करितात, हें आहे. ज्यांनीं असें केलेलें नाहीं, त्यांचीं काव्यें वाचकांस प्रिय झालीं आहेत, व पुढें जे असें करणार नाहींत, त्यांचींही काव्यें वाचकांस प्रिय होतील, याबद्दल आम्हांस मुळींच संशय नाहीं. शिवाय, प्रत्येक शतकांत महातत्त्ववेत्ता निघणें जसें संभवत नाहीं, त्याचप्रमाणें महाकवि निघणें हेंही संभवत नाहीं. जसा इंग्लंडांत आजपर्यंत एकच शेक्सपिअर होऊन गेला, त्याचप्रमाणें बेकनही एकच होऊन गेला! हिंदुस्थानांतही अद्यापपावेतों भास्कराचार्यांस किंवा कालिदासांस प्रतिस्पर्धी भेटला नाहीं! हाताचीं बोटेंच घालून महाकवींची संख्या मोजूं लागलों, तर भरतखंडांत अनामिकेपुढें, व इतर देशांत तर करांगुलीपुढें जातां येणार नाहीं असें वाटतें!

वर जें सांगितलें आहे, त्यावरून शास्त्रीय ग्रंथाप्रमाणें काव्यांतही सत्यकथन असतें, हें वाचकांच्या ध्यानांत येईल अशी आशा आहे. कवि जें सत्य सांगतो, तें शास्त्रीय सत्याप्रमाणें गूढ नसतें. शास्त्रीय सत्यांपैकीं कांहीं सत्यें इतकीं गूढ असतात कीं, तीं समजण्यास तपांच्या अध्ययनाची आवश्यकता असते. तसेंच, शास्त्रांत कधीं कधीं विशेष कारणासाठीं अगदीं क्षुल्लक सत्यें सांगितलीं असतात. या दोन्ही सत्यांचा काव्यांत उपयोग होत नाहीं. 'उष्णता, प्रकाश व विद्युत् हीं गतीचीं निरनिराळीं रूपें होत', हें सत्य काव्यविषय होण्यास आणखी शेंकडों वर्षें लोटलीं पाहिजेत. तसेंच, 'बाभळीला कांटे असतात' 'मासे समुद्रांत रहातात', असलीं सत्येंही काव्याच्या कामाचीं नाहींत! काव्यांत जीं सत्यें गोंवावयाचीं, त्यांची योग्य निवड करण्यास कवीस पराकाष्ठेचे श्रम पडतात. जीं समजण्यास मुळींच श्रम पडत नाहींत, अशीं उपयोगी नाहींत; जीं समज-

ण्यास फार श्रम पडतात, अशींही पण उपयोगी नाहींत. तीं या दोहोंच्या दरम्यान असून अनुकूलसंवेदनोत्पादक असलीं पाहिजेत. यावर कोणी अशी शंका घेईल कीं, काव्यांत वर्णिलेलीं सत्यें नेहमीं अनुकूलसंवेदनोत्पादक असलीं पाहिजेत, हें मत खरें असेल, तर काव्यांत दुःखपर्यवसायी नाटकांचा किंवा अवर्षणादि अरिष्टांच्या वर्णनांचा समावेश कधींच करितां येणार नाहीं. कारण, दुःखपर्यवसायी नाटकें पाहिल्यानें, अरिष्टांचीं वर्णनें वाचल्यानें मनास आनंद न होतां उलट दुःख होतें. कांहीं अंशीं ही शंका बरोबर आहे. पण थोड्या विचाराअंतीं तिचें निरसन होण्यासारखें आहे. दुष्काळांत अन्न न मिळाल्यामुळें होणाऱ्या यातनांचा प्रत्यक्ष अनुभव आणि त्या यातनांच्या वर्णनांचें वाचन किंवा श्रवण, कामीजनांस होणाऱ्या क्लेशांचा प्रत्यक्ष अनुभव आणि त्यांच्या क्लेशांच्या वर्णनाचें वाचन किंवा श्रवण, या आणि याप्रमाणें इतर सर्व गोष्टींपासून होणाऱ्या सुखदुःखांचा प्रत्यक्ष अनुभव आणि त्यांच्या वर्णनांचें वाचन किंवा श्रवण, यांत फार अंतर आहे. प्रत्यक्षानुभवाची तीव्रता वाचनांत किंवा श्रवणांत कधींही येऊं शकणार नाहीं. आणि तसें होऊं लागलें, तर प्रतिकूलसंवेदनोत्पादक काव्यें कोणी हातीं धरणार नाहीं. उतारवयांत नवानवसांनीं झालेलें अपत्य मरण पावलें असतां मातापितरांस जें दुःख होतें, तेंच दुःख जर त्याच्या वर्णनापासून किंवा अभिनयापासून होऊं लागलें, तर तें वर्णन कोण हातांत घेईल ? किंवा तो अभिनय पाहण्यास कोण जाईल ? एखाद्या दुर्गम आणि निर्भय अशा उंच ठिकाणीं बसून खालीं चाललेली लढाई पहाण्यानें मनावर ज्या प्रकारचे विकार होण्याचा संभव आहे, त्या प्रकारचे विकार दुःखपर्यवसायी कथेच्या वाचनापासून होतात. सर्व मनुष्यांच्या मनोवृत्ति एकाच तऱ्हेच्या असल्यामुळें एकास झालेलें दुःख किंवा सुख

त्याच्या बाह्य चिन्हांवरून, वर्णनावरून किंवा अभिनयावरून दुसऱ्यास समजून येतें, हें खरें आहे. पण या समजून येण्यांत आणि प्रत्यक्षानुभवांत फार अंतर आहे. तरवारीसारख्या शस्त्राचें मर्मापर्यंत चरचर कापीत जाणें आणि फक्त अंगाला चाटणें, यांत जो फरक आहे, तो प्रत्यक्ष सुखदुःखांत आणि त्याच्या चित्रांत आहे. कवीची सारी करामत हुबेहूब चित्र काढण्यांत आहे; मूळ उत्पन्न करण्यांत नाहीं. ते मूळ उत्पन्न करूं लागतील, तर त्यांच्या दुःखोत्पादक कृतीकडे कोणी ढुंकूनही पाहणार नाहीं. पण हा सगळा वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या सुखदुःखाविषयीं विचार झाला. दुःखपर्यवसायी काव्य लिहितांना खुद्द कवीच्या मनाची काय स्थिति होते, हा प्रश्न अजून राहिलाच आहे. कोणत्याही प्रकारचें काव्य रचतांना किंवा त्यांतील विषयाचा विचार करितांना कवीस जे आयास होतात, ते प्रत्यक्ष आयासांहून बरेच क्षीण असतात. सुखदुःखांचा प्रत्यक्ष अनुभव आणि सुखदुःखांवर पुनःपुनः विचार करून तीं आपणांस होत आहेत, असा भास करून घेण्याचा प्रयत्न, यांत पुष्कळ अंतर आहे. धनलोभ्याचें धन एकाएकीं नष्ट झालें असतां त्याला ज्या यातना होतात, त्यांचें, कवि आपणास धनलोभी समजून व आपलें सारें वित्त एकाएकीं नष्ट झालें आहे असें समजून द्रव्यनाशानें खऱ्या धनलोभ्याला होणाऱ्या दुःखाचें प्रतिबिंब आपल्या मनावर उठवून घेण्यासाठीं, एकसारखें चिंतन करितो व त्यामुळें कांहीं वेळानें त्याच्या मनाची वृत्ति धनलोभ्याच्या वृत्तीसारखी होऊन धनलोभ्याला होणाऱ्या यातनांची बरीच छाया त्याच्या मनावरही पडूं लागते. अशा प्रकारें उत्पन्न केलेल्या दुःखाच्या छायेस अप्रत्यक्ष दुःख असें म्हणतां येईल. ज्याला ही छाया हवी तितकी दाट पाडून घेतां येत असेल, त्याच्या अंगीं कवित्वगुणांपैकीं श्रेष्ठ गुण आहे,

असें म्हणतां येईल. विचारानें प्रत्यक्ष सुखदुःखांच्या तीव्रतेचें पूर्ण प्रतिबिंब आपल्यावर उठवून घेणें याचेंच नांव तादात्म्य, तंद्री, किंवा एकतानता. ज्याला सुखदुःखांचा प्रत्यक्ष अनुभव होत आहे, त्याच्या मनाप्रमाणें कवीच्या मनाची स्थिति झाल्याशिवाय त्याच्या काव्यांत तो तो रस पूर्णपणें उतरणार नाहीं. रसाची परिपक्वता अगोदर कवीच्या मनांत झाली पाहिजे. ती तशी झाली, तरच त्याला ती काव्यांत आणण्याचा प्रयत्न करितां येईल; कारण जर आडांत पाणी नसलें, तर पोहऱ्यांत कोठून येणार ? कवीला ज्या विषयाशीं आपल्या मनाची तंद्री लावून घ्यावयाची असते, तो विषय अनुकूलसंवेदनोत्पादक असो, कीं प्रतिकूलसंवेदनोत्पादक असो, त्याला जे कष्ट पडतात, ते उभयपक्षीं सारखेच असतात. कवीचें मन फोटोग्राफ घेण्यासाठीं तयार केलेल्या भिंगाप्रमाणें असतें. ज्याप्रमाणें हवा तेवढा प्रकाश अनुकूल असला, म्हणजे त्या पदार्थाचें हुबेहूब प्रतिबिंब त्या भिंगावर पाडतां येतें, त्याप्रमाणें ज्या कवीला आपली कल्पना हवी तितकी प्रज्वलित करितां येते, त्याला तिच्या रश्मींनीं आपल्या मनावर पाहिजे त्या विषयाची मुळाबरहुकूम छाया पाडतां येते. कल्पना प्रज्वलित होऊन कल्पनाविषयाशीं तादात्म्य होणें, यांतच कवींचा आणि काव्यवाचकांचा आनंद आहे. बीजगणितांतील किंवा भूमितींतील एखाद्या कूट प्रश्नांत बुद्धि व्यग्र होऊन गेली असतां तींत जें चांचल्य उत्पन्न होतें, तें तत्त्वशोधकांस जसें अत्यंत आनंददायक असतें, त्याप्रमाणेंच सुखदुःखोत्पादक विषयाचें हुबेहूब आकलन करण्यासाठीं भरधाव सोडलेल्या कल्पनेच्या चांचल्यापासून कवींना व काव्यवाचकांना अत्यानंद होतो. असें जर नसतें, तर दुःखपर्यवसायी काव्यें कवि मूळींच न लिहिते व वाचक तीं मुळींच न वाचते. तेव्हां सिद्ध काय

झालें कीं, काव्य दुःखपर्यवसायी असो, कीं सुखपर्यवसायी असो, त्यांतील रसापासून उत्पन्न होणारा आनंद सारखाच असतो; आणि याच कारणामुळें 'कॉमेडी ऑफ एरर्स' (भ्रांतिकृत चमत्कार) इतकींच 'अथेल्लो' वाचण्याला, किंवा त्याचा प्रयोग पाहण्याला आमचीं मनें उत्सुक असतात. तर मग दुःखपर्यवसायी आणि सुखपर्यवसायी काव्यांच्या वाचनांत किंवा प्रयोगदर्शनांत मुळींच भेद नाहीं काय, असा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो. त्यास इतकेंच उत्तर आहे कीं, भेद आहे, मुळींच नाहीं, असें नाहीं, पण तो थोडा आहे. काव्यवाचनांत किंवा त्याचा प्रयोग पहाण्यांत एकमेकांपासून अगदीं भिन्न असे दोन मानसिक व्यापार चाललेले असतात. एक, कल्पना-शक्ति प्रज्वलित होऊन ती मनाचें काव्यवस्तूशीं तादात्म्य करण्या-साठीं झटत असते; दुसरा, इंद्रियांपुढें प्रत्यक्ष असणाऱ्या, किंवा कल्पनेनें निर्माण केलेल्या काव्यवस्तु आपल्या स्वभावाप्रमाणें वाचकांच्या व प्रेक्षकांच्या अनुकूल व प्रतिकूल संवेदनांत अंशतः कारण होत असतात. यामुळें दुःखपर्यवसायी काव्य वाचीत असतां किंवा त्याचा प्रयोग पहात असतां वृत्तीला थोडीशी खिन्नता उत्पन्न होते, आणि सुखपर्यवसायी काव्य वाचीत असतां वृत्तीला थोडासा आनंद होतो. अप्रबुद्ध लोकांना पहिल्या व्यापारापासून होणाऱ्या आनंदाची मुळींच कल्पना नसते. यामुळें दुःखपर्यवसायी नाटक पहाणें त्यांना आवडत नाहीं.

---

# पाठ ३६ वा.



## कवि, काव्य आणि काव्यरति.

### भाग ३ रा.

आतांपर्यंत जें सांगितलें आहे, त्यावरून तत्त्वशोधकांप्रमाणें कवींचेंही, एका प्रकारच्या सत्यांचा निर्णय करणें आणि तीं सांगणें हें काम आहे. हें काम बजावण्यासाठीं कवींस आपली कल्पना प्रज्वलित करून काव्यवस्तूशीं मनाचें तादात्म्य करून घ्यावें लागतें. काव्यवस्तु कोणत्याही प्रकारची असो, या तादात्म्यापासून होणारा आनंद सारखाच असतो. कवींच्या वर्णनांनीं यथार्थ काव्यवस्तूंशीं वाचकांच्या आणि प्रेक्षकांच्या मनांचें तादात्म्य झालें, तर त्यांनाही कवीसारखाच आनंद होईल. काव्यवस्तु कोणत्याही प्रकारची असो, तिच्या चिंतनांत व्यग्र झालेल्या कवींच्या किंवा वाचकांच्या कल्पनेस जें चांचल्य येतें, तें आनंदमय आहे. काव्य वाचीत असतां किंवा त्याचा प्रयोग पहात असतां वृत्तींत कधीं कधी जी खिन्नता उत्पन्न होते, ती, वृत्ति एकीकडे एकतानतेच्या नादांत गढली असतां इंद्रियांपुढें प्रत्यक्ष असणाऱ्या, किंवा कल्पनेनें निर्माण केलेल्या भयंकर काव्यवस्तु दुसरीकडून तींत प्रतिकूल संवेदना उत्पन्न करीत असतात, म्हणून होते. साराश, काव्य दुःखपर्यवसायी असो, किंवा सुखपर्यवसायी असो, तें रचण्यांत कवीला, आणि तें वाचण्यांत वाचकाला आनंदच आहे. या आनंदांत काव्यवस्तूचें बाह्य स्वरूप रमणीय असल्यास थोडीशी भर पडते, व तें भयंकर असल्यास त्याला किंचित् छाट बसतो, इत्यादि गोष्टी वाचकांच्या मनांत येतील, अशी आशा आहे.

काव्याच्या वाचनापासून राजापासून रंकास, तत्त्ववेत्त्यापासून अत्यंत अल्पशिक्षित मनुष्यास सर्व स्थितींत आनंद होण्यास अनेक कारणें आहेत. एक तर कवीच्या वाणींतून जे बोल निघत असतात, त्यांच्या सत्यतेविषयीं प्रत्येक अंतःकरण साक्ष देत असतें. जीं सत्यें देशकालादिकांनीं मर्यादित, किंवा जीं सत्यें बहुश्रुतास-मात्र समजणार, अशीं सत्यें कवि कधींच सांगत बसत नाहीं. ज्या मनुष्याची रानटी अवस्था सुटली आहे, ज्याला मानवी स्वभावाचें किंचित् ज्ञान प्राप्त झालें आहे, ज्याच्या मनावर बाह्य सृष्टीच्या सौंदर्याचा परिणाम होऊं लागला आहे, असा मनुष्य कोणत्याही देशांत रहात असो, किंवा कोणत्याही शतकांत जन्मास आला असो, महाकवीच्या सत्यमय रसाळ उद्गारामृताचें सेवन करण्यास तो योग्य असतो. काव्यापासून आनंद होण्याचें दुसरें कारण असें आहे कीं, साधारण मनुष्यास ज्या गोष्टी अव्यक्त असतात, त्या कवि त्यास व्यक्त करून देतो. 'जितक्या मूर्ति तितक्या प्रकृति', अशी आपल्या लोकांत म्हण आहे. ह्या म्हणीचा अर्थ इतकाच कीं, प्रत्येक मनुष्याचा स्वभाव निराळा असल्यामुळें सर्वांच्या स्वभावाचें ज्ञान होणें अशक्य आहे. तथापि ज्या अर्थीं सर्व मनुष्यांस आपण 'मनुष्य' या एका वर्गाखालीं मोडतों त्या अर्थीं त्या सर्वांत साधारण असे कांहीं गुण असलेच पाहिजेत. या साधारण गुणांचें अतिस्वल्प ज्ञान बहु-तेकांस असतें व तें असतें म्हणून काव्यवाचनापासून त्यांस आनंद होतो. कित्येक मनुष्यें पराकाष्ठेचीं रागीट असतात, कित्येक शांत असतात, कित्येक मायाळू असतात, कित्येक लोभी असतात, कित्येक क्रूर असतात, कित्येक कामातुर असतात; तथापि राग, शांति, ममता, लोभ, क्रौर्य व काम इत्यादि सर्व मनोवृत्तींची प्रत्येकास थोडीबहुत ओळख असते. विशिष्ट व्यक्तींत एखादा गुण फार

असला, म्हणून बाकीच्या गुणांविषयीं तो अज्ञान असतो असें नाहीं. प्रत्येक मनुष्य सर्व मनुष्यतेचें सूक्ष्म प्रतिबिंब आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. असें नसतें, तर एकाचे मनोविकार दुसऱ्याला न समजते. साधारण मनुष्यांत आणि कवींत भेद इतकाच आहे कीं, साधारण मनुष्यास ज्या प्रकृतिवैचित्र्याचें आणि विकारवैचित्र्याचें ज्ञान अगदीं मंद असतें, तें कवीस कल्पनासामर्थ्यानें स्वतःच स्पष्ट करून घेतां येतें, इतकेंच नाहीं, तर काव्यद्वारा तें दुसऱ्यासही स्पष्ट करून देतां येतें. कवि हा कामरूपधारी पटाईत बहुरूपी आहे ! तो क्षणांत राजा बनून सिंहासनस्थ पुरुषाच्या अंतःकरणांतील विचार बोलूं लागतो; राजवेष घेऊन अर्धघटिका झाली नाहीं, तों तो वेष टाकून देऊन तो काळा पोषाख करितो, तोंडाला काजळ फांसतो, वस्त्राखालीं पाजळलेलीं शस्त्रें लपवून घेतो, आणि मध्यरात्रीच्या निबिड काळोखांत जिकडे तिकडे सामसूम झालें असतां द्रव्यासाठीं कोणाचा तरी जीव घेण्याचा बेत करीत मारेकरी होऊन बाहेर पडतो ! या स्थितींत पांचपन्नास पळें गेलीं न गेलीं, तों ती टाकून देऊन अभिसारिका बनतो व अभिसारिकेस योग्य असा पेहराव चढवून मेघांच्या गडगडाटाची, विजांच्या लखलखाटाची, किंवा तुफान वाऱ्याच्या सोसाट्याची पर्वा न करितां पावसाच्या मुसळधारेंतून एका चेटासह विद्याविहारोद्यानांतील नेमलेल्या लतामंडपांत प्रियाची भेट घेण्यास जातो! आतां तो पर्वताच्या शिखरावर किंवा समुद्राच्या किनाऱ्यावर असला, तर क्षणभरानें धनगराच्या परशापाशीं शेकत बसलेला, किंवा न्यायासनारूढ होऊन न्याय करीत असलेला दृष्टीस पडेल! वायूप्रमाणें तो सर्वगामी आहे; मनाप्रमाणें तो चंचल आहे; हवी ती वस्तु उत्पन्न करणारा तो वस्ताद जादूगार आहे; कल्पनाशंकूच्या जिवावर कालोदधींत पाहिजे त्या दिशेला सुकाणूं लावण्यास न डगमगणारा तो जरठ झालेला

तांडेल आहे; विश्वबीजाप्रमाणें त्याचे उद्गार अनंत व नित्य आहेत. कोणती वस्तु कितीही दूर असो, किंवा कितीही सूक्ष्म असो, त्यानें तिच्यावर आपली दुर्बीण किंवा सूक्ष्मदर्शक यंत्र लाविलें कीं, त्याला ती संनिध आणि स्थूळ होऊन हवी तशी पाहतां येते; व दुसऱ्यांना तिचें यथातथ्य आकलन होईल, अशा तऱ्हेचें तिचें चित्र काढतां येतें. जर तुम्हांला पातालांतील किंवा स्वर्गांतील वस्तुस्थिति पहावयाची इच्छा असेल, तर मिल्टनचा किंवा कालिदासाचा हात घट्ट धरून ते नेतील तिकडे जाण्यास तयार व्हा! अनंत प्रकृतींच्या हृदयडोहांत बुड्या मारून त्यांच्या तळाशीं काय आहे, हें जर तुम्हांला पहावयाचें असेल, तर मोलिअर, शेक्सपिअर, गेटी, किंवा भवभूति अशा जगत्प्रसिद्ध पाणबुड्यांच्या कमरेला मिठ्या मारा! सारांश, अंतर्बाह्य सृष्टींत अनुकूल किंवा प्रतिकूल संवेदना उत्पन्न करणारी अशी कोणतीही चीज नाहीं कीं, जिच्या सत्य स्वरूपाचें ज्ञान, आनंद होईल अशा रीतीनें कवींस तुम्हांला करून देतां येणार नाहीं. समजातीयांस हें ज्ञान करून देणें, हा कवींचा व्यवसाय होय. या व्यवसायांतच त्यांचा आनंद आहे. या व्यवसायामुळेंच त्याचें अंतःकरण अतिशय कोमल व दयार्द्र झालेलें असतें. या व्यवसायामुळें त्याची अनुकंपा इतकी वाढते कीं. तिच्या व्याप्तीस सकल मनुष्यवर्ग किंवा जीवकोटीसुद्धां पुरेशी न होऊन ती अखेरीस अचेतन सृष्टि व्यापूं लागते, व हा व्यवसाय वाचकांस सुखावह व्हावा, म्हणून पद्यरचना, प्रास, वृत्तें, अलंकार इत्यादि उपकरणांचा उपयोग कवि आपल्या काव्यरचनेंत करितात.

गो. ग. आगरकर. वि० वि० संग्रह.

---

## पाठ ३७ वा.



# हा काय चमत्कार आहे?

### भाग १ ला.

तेजोनिधि सविता पश्चिम-दिक्प्रांतीं विश्रांति घेण्यास जात आहे, आणि तेणेंकरून सकल व्यवसायी जनांस तसेंच करण्याविषयीं सुचवीत आहे, हें पाहून प्रातःकालापासून त्या सावित्यानें आपल्या नांवाप्रमाणें नानाप्रकारच्या उद्योगांविषयीं प्रेरित केलेला जन आपापला कामधंदा आटपण्यास लागतो. कोणी आपल्या वसतिस्थानाच्या इतस्ततः प्रदेशीं असलेल्या देवांच्या दर्शनास जात असतात. कोणी नदीतीरीं संध्यावंदनादिकांनीं ईशचरणीं मन लावून भक्ति-रसानें परमानंदसमुद्रांत मग्न होत असतात. कोणी समुद्रकांठीं, नदीतीरीं, किंवा मैदानांत हवा खाण्यास जाऊन दिवसभर थकलेल्या मनांस निसर्गदर्शनोपभोगादिकांनीं विश्रांति देत असतात. कांहीं वेळानें कोणी भोजनादिक आटपून घराबाहेर अंगणांत किंवा दुसऱ्या एकाद्या उघड्या जाग्यांत बसून किंवा शत-पावली करीत करीत ईश्वरगुणानुवाद गात असतात. कोणी काव्यशास्त्रकलाविनोदांत निमग्न असतात. कोणी मित्रांसह इकडल्या तिकडल्या गप्पा छाटीत असतात. सर्वांचेंच असें भाग्य कोठलें? कोणी एका व्यवसायांतून सुटून उदरभरणार्थ दुसऱ्या व्यवसायास लागतो. कोणी पाकनिष्पत्ति करीत असतो. कोणी चिंतामग्न असतो. तथापि असाही मनुष्य मुद्दाम म्हणा किंवा साहजिक म्हणा, रात्रीच्या पूर्वभागीं क्षणभर विश्रांति घेतोच घेतो. व अशा अनेक प्रकारांनीं विश्रामसुखास्वाद घेणाऱ्या मनुष्याचे आकाशाकडे एखादें

वेळीं तरी सहज लक्ष जातें. तशांत भगवान् रजनीवल्लभ उदय पावलेला असला, तर तो आपल्या आनंददायक चांद्रिकेनें मनुष्याचें मन आपल्याकडे सहज आकर्षितो. प्रतिपदा-द्वितीयेची चंद्रकोर पाहून ज्याचें मन आनंदभरित होत नाहीं, असा कोण आहे ? रमणीय पूर्णचंद्र पाहून क्षणभरही ज्यास दुःखाचा विसर पडत नाहीं, इतका हतभागी कोण आहे ? लहान मुलेंही मातेच्या कटिप्रदेशीं आरोहण करून चांदोबाकडे पाहून आनंदभरित होतात. कोणी " चांदोबा चांदोबा भागलास का ? " इत्यादि चुटके म्हणत नाचत-बागडत असतात. चंद्रबिंबावरून ढग धावत असलेले पाहून 'चंद्र धावत आहे', असें कोणी मुलें म्हणत असतात, व कोणी 'चंद्र धावत नाहीं, ढगच धावत आहेत', अशी त्यांची समजूत करीत असतात. कोणी आकाशकटाहांत सर्वत्र पसरलेलीं हजारों नक्षत्रें पाहून 'परडीभर फुलें, तुझ्यानें वेंचवतना, माझ्यानें वेंचवतना', अशा उखाण्यांनीं त्यांचें अनंतत्व, अपारत्व व चिरस्थायीत्व दर्शवीत असतात. सारांश, केव्हां ना केव्हां थोडाफार वेळ तरी आकाशांतील तेजांचे विलास पाहून आनंदाश्चर्यसमुद्रांत पोहत नाहीं, असा कोणी नाहीं.

सहस्ररश्मीस राग येऊन त्यानें आपल्या तीव्र करांचा मारा सुरू केल्यामुळें गर्भगलित होऊन त्यापुढें तोंड वर काढण्यासही भिऊन गेलेली, व गार वाऱ्याची एखादी झुळूक येऊन ती क्षणभर तरी या तापापासून मुक्त करील काय, अशाविषयीं उत्कंठित झालेली आमची कांहीं मित्र मंडळी, तो उष्णरश्मि तपन गेला कीं आहे, गेला कीं आहे, हें हळूच पहात पहात तो कोठें दिसेनासा झाल्यावर कांहीं वेळानें बाहेर पडून एका नदीच्या तीरीं गेली. नदीच्या रमणीय उदकानें त्यांच्या तापविमोचनाशेला पाझर फुटूं

लागला. इतक्यांत पश्चिमेच्या बाजूस सुंदर तेज चमकूं लागलें, तिकडे त्यांचें लक्ष गेलें. किती तरी आनंददायक तेज तें ! त्याला पाहून सर्व दिवसाचा ताप नाहींसा होत चालला. जसजसें त्याजकडे पहावें तसतसें अधिकाधिकच कौतुक वाटूं लागलें. त्याजकडे पहातच रहावें असें वाटलें. काळोख पडत चालला, तसतसें तें अधिकच चमकूं लागलें. त्याच्याभोंवतीं लहानमोठ्या अनेक तारा चमकत होत्या. गेल्या दहाबारा दिवसांत या बाजूस कधीं दृष्टीस न पडून आजच नवीन दृष्टीस पडल्यामुळें तें विशेषच चित्ताकर्षक झालें होतें. अनेक मनुष्यें त्याजकडे पाहून आनंदभरित होत होतीं. कोणी त्याला वंदन करीत होतीं. कोणी त्याकडे आपल्या वस्त्राची एक दशी फेंकून 'जुनें घे आणि नवें दे', म्हणत होतीं. ती द्वितीयेची नूतन चंद्रकला ईश्वरी तेजाची साक्षात् प्रतिमाच आहे काय, अशी वाटण्याजोगी आनंददायक खरीच ! उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें नदीतीरीं दोन घटका बसून करमणूक करण्याचा मंडळीचा क्रम चालला होता, त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशींही मंडळी गेली. कालच्यापेक्षां आज चंद्र पश्चिम-दिशेस बराच वर दिसूं लागला. आणि त्याची तेजस्वी कोरही सुमारें कालच्या दुप्पट आज दिसत होती. चंद्राच्या वरच्या बाजूस सुमारें अर्ध्या आकाशांत एक अतिमनोहर तारा दिसत होती. सगळ्या आकाशांत तितकी तेजस्वी आणि रमणीय दुसरी ताराच नव्हती. अहाहा ! काय तिचें तेज ! संस्कृतभाषेंत तेजाला शुक्र असें नांव आहे. आपण त्या तारेस शुक्र असें म्हणूं. चंद्र पहिल्या दिवशीं दिसला तेव्हा त्यापासून ती लांब होती. दुसऱ्या दिवशीं तिच्या बराच जवळ चंद्र आला. जणूं काय, शुक्राच्या तेजस्वितेमुळें चंद्राच्या मनात

स्पर्धा उत्पन्न झाली आहे, आणि आपल्या तेजाची एकेक कला वाढवून आपण शुक्राचें अतिक्रमण करावें, असें चंद्रानें मनांत आणिलें आहे, असें दिसूं लागलें. तिसऱ्या रात्रीं पाहतां तसेंच झालें. चंद्राचें तेज आणखी एक कला वाढलें असून तो शुक्रास मागें टाकून पुढें पूर्वेस गेला. याप्रमाणें चंद्र प्रतिदिवशीं वाढत झपाट्यानें पुढें पुढें पूर्वेकडे जात चालला. सुमारें पंधरा दिवसांनीं सायंकाळीं तो पूर्वेस उगवला. त्या वेळीं त्याचा आरक्तपणा काय सांगावा ! तो केवढा तरी मोठा दिसत होता ! पहिल्या दिवशींची लहानशी चंद्रकोर कोणीकडे, आणि त्या दिवशींचा तो पूर्णचंद्र कोणीकडे ! जसजसा वर येत चालला तसतशी त्याची आरक्तता कमी होत चालली; आणि त्याचें बिंब किंचित् लहान परंतु आल्हाद-कारक दिसूं लागलें. अहाहा ! किती तरी त्याचें तेज रमणीय आणि शीतल ! सगळा दिवसभर कितीही श्रम मनुष्यास झाले असले, तरी क्षणभर चांदण्यांत बसतांच त्या श्रमांचा परिहार होतो. फार तर काय, पण त्या आनंदांत तहानभूकही नाहींशी होऊन सर्व रात्र चांदण्यांतून उठूं नये, असें वाटतें. आमची त्या रात्रीं अशीच स्थिति झाली. किती काळ आम्ही या कौमुदीमध्यें मोद पावत होतों, ह्याचें आम्हांस भानही राहिलें नाहीं. परंतु काय सांगावें, हा आनंद त्या मत्सरी दैवास सहन झाला नाहीं, असें दिसतें. एका-एकीं चंद्रबिंब पूर्वेच्या बाजूस काळें दिसूं लागलें. पाहतां पाहतां अर्धें बिंब काळें पडलें; आणि उत्तरोत्तर तो क्रम चाललाच होता. चंद्रास कोणीं घेरिलें? त्याचा कोणी ग्रास करीत आहे कीं काय ? असे विचार आमचे चालले आहेत, इतक्यांत बिंबाच्या बहुतेक भागाचें ग्रहण झालें. आतां सगळ्या चंद्राचा ग्रास होतो कीं काय, अशी आम्हांस भीति पडली. बहुतेक भाग ग्रस्त झाला. आमच्या

सुदैवानें सुमारें द्वितीयेच्या चंद्राहूनही फार कमी इतकी कोरमात्र नैर्ऋत्येकडची शिल्लक राहिली, व बाकीचें सर्व बिंब आरक्त दिसूं लागलें. तो आरक्तपणा चंद्रोदयींच्या आरक्तपणाहून निराळा होता. शेष राहिलेला तेजस्वी भागही जातो कीं काय, अशा चिंतेंत बराच वेळ आम्ही होतों; इतक्यांत तेजस्वी भाग वाढत चालला, तेव्हां आमच्या जिवांत जीव आला. कांहीं वेळानें बरेंच ग्रहण सुटलें. इतक्यांत चंद्राचा ग्रास झाला आहे, त्यास सोडवावें म्हणूनच कीं काय, पूर्वेस त्याचा मित्र वर येत आहे, अशीं चिन्हें दिसूं लागलीं. त्याच्या प्रभावानें कीं काय न कळे, तो येण्यापूर्वींच बहुतेक ग्रहण सुटलें. इतक्यांत सूर्यानें मस्तक वर केलें; व तो त्या चंद्राकडे निरखून पाहत आहे, असें आम्हांस दिसलें. तरी त्या वेळीं ग्रहण पूर्ण सुटलें नव्हतेंच. तेव्हां मित्र प्रत्यक्ष आला असतांही आपलें संकट दूर होत नाहीं, असा मित्र काय कामाचा ? असें वाटून व हा आपला अपमान झाला, अशी समजूत होऊनच कीं काय, चंद्र लागलाच क्षितिजाच्या आड खालीं गेला. ग्रहणांतून चंद्र मुक्त होईल, अशी आशा आम्हांस लागली असून ती पूर्ण होण्याचा संभव दिसत आहे, तोंच ग्रहणमोक्ष न होतां चंद्र दिसेनासा झाला. यामुळें दुःखित होऊन कित्येकांनीं त्या दिवशीं अन्नपाणीही घेतलें नाहीं. सायंकाळीं सूर्यास्त झाला, तरी रोजच्याप्रमाणें चंद्र दिसेना; तेव्हां त्यास पाहण्याविषयीं सर्व लोकांचे नेत्र अधिक उत्सुक झाले. इतक्यांत ग्रहणापासून मुक्त झालेला चंद्र दिसूं लागला. तेव्हां सर्वांचा आनंद गगनीं मावेना. पण दुसऱ्या दिवशीं सूर्यास्ताबरोबर चंद्र दिसेना. तिसरे दिवशींही तसेंच झालें. एक दिवस झाला, दोन झाले, तीन झाले, तरी चंद्र पूर्वींप्रमाणें सायंकाळीं सूर्यास्ताबरोबर दिसेना तेव्हां चंद्रावर असें संकट तरी

काय आलें आहे, आज चंद्रदर्शन झाल्यावांचून अन्न ध्यावयाचें नाहीं, असा पुन: चतुर्थ दिवशीं पुष्कळांनीं निश्चय केला. तेव्हां या संकटनाशनव्रतानेंच कीं काय, त्या दिवशीं [चतुर्थीस] चंद्र सुमारें आठ घटका रात्रीस प्रसन्नवदन उगवलेला दिसला; तरी पण त्यावर कांहीं तरी संकट आलें होतें खरेंच, असें दिसून आलें; तो पौर्णिमेच्या रात्रीप्रमाणें पूर्ण नव्हता. त्याचा बराच भाग नाहींसा झाला होता.

---

## पाठ ३८ वा.



### हा काय चमत्कार आहे ?

#### भाग २ रा.

याप्रमाणें मंडळीचा क्रम बरेच दिवस चालला. तितक्या अवकाशांत आकाशांत पुष्कळ उलाढाली झालेल्या दिसल्या. त्यांत, चंद्र हा रोज दोन दोन घटका मागाहून उगवतो, असें अनुभवास आलें. पुढें दहाबारा दिवशीं सहज आकाशाकडे दृष्टि गेली तों पूर्वेकडे चंद्रकला दिसली. तेव्हां पहिल्या दिवशीं सायंकाळीं पश्चिमेस चंद्रकोर दिसली होती, तिचें स्मरण झालें. दुसरे दिवशीं तर चंद्र अवशीस दिसला नाहीं, व पहांटेसही दिसला नाहीं. अर्थात् सर्व रात्रींत मुळींच उगवला नाहीं. हा चंद्र गेला तरी कोठें ? तो आकाशांतून अगदीं नाहींसा झाला कीं काय, अशा विवंचनेंत आम्ही आहों, तों काय आश्चर्य सांगावें ! दुसरे दिवशीं तो पश्चिमेस मागल्याप्रमाणें दिसूं लागला. त्या चंद्रदर्शनानें झालेला आनंद काय सांगावा ! शुक्र प्रथम जेथें दिसत होता, तेथेंच पुढेंही पुष्कळ दिवस दिसत होता. त्याच्यासारख्या तेजस्वी दोन तारा दक्षिणेस प्रथम दिसत होत्या, त्या शुक्राहून

कांहीं लहान दिसत होत्या; तरी त्यांची चकाकी कांहीं विलक्षण होती. यामुळें त्यांजकडे सहज लक्ष जाई. त्यांतली एक प्रथम बरीच म्हणजे सुमारें शुक्राइतकी उंच दिसत होती. दुसरी तिच्या दक्षिणेची बरीच खालीं दिसत असे. उत्तरोत्तर त्या दोहोंचीही उंची कमी दिसूं लागली. त्या सूर्याच्या जवळजवळ जात आहेत असें दिसलें. त्यांत दक्षिणेस जी होती, ती तर प्रथम आम्हांस पश्चिमेस चंद्रदर्शन झालें, त्यानंतर सातआठ दिवसांनीं मुळींच दिसेनाशी झाली; व दुसरीही तिच्या भेटीस जात आहे, असें वाटलें. आणि त्याप्रमाणें सुमारें एक महिन्यानें तीही दिसेनाशी झाली. हें काय आहे, असें आमच्या मनांत येऊन अंमळ लक्षपूर्वक पाहूं लागलों, तों संशय खरा झाला. तारा एकमेकींपासून जितक्या अंतरावर दिसत होत्या, तें अंतर तर मुळींच कमजास्त झालें नाहीं, पण उत्तरोत्तर त्या सर्वांचें पश्चिमक्षितिजरेषेशींमात्र अंतर कमी होऊं लागलें. उत्तरेस ७ तारा चांगल्या तेजस्वी दिसत होत्या. त्याही प्रथम जेथें दिसल्या, त्याच्या कांहींशा डाव्या बाजूस महिन्याभरानें दिसूं लागल्या. पूर्वेकडे काय हवाल आहे, म्हणून लक्षपूर्वक पहावयास लागलो, तों तिकडे उलट स्थिति झाली. म्हणजे प्रथम सूर्यास्तानंतर लवकरच ज्या तारा उगवत होत्या, त्या एक महिन्यानंतर सूर्यास्त झाल्यावर पुष्कळ वर दिसूं लागल्या; व त्यांचे ठिकाणीं नव्याच तारा आल्या; पश्चिमच्या तारा गेल्या तर त्यांच्याऐवजी पूर्वेस नवीन आल्या, ही ईश्वरी योजना पाहून आश्चर्य व समाधान वाटलें.

शुक्र एका जागींच दिसत होता, तरी त्याच्या जवळच्या तारा पश्चिमेस जात चालल्या होत्या. अर्थात् त्यांच्यासंबंधानें पाहिलें असतां तो पूर्वेस चालला होता. सर्व आकाशांत या वेळीं दुसरी एकही तारा अशी दिसली नाहीं.

एके दिवशीं सायंकाळीं याप्रमाणें आमची करमणूक चालली असतां, अकस्मात् एक तारा आकाशांतून तुटून खालीं येत आहे, असें दिसलें. तिचें तेज फार असल्यामुळें तिजकडे लागलेंच सर्वांचें लक्ष लागलें. तिची चपलता काय सांगावी ! पाहातों न पाहातों इतक्यांत डावीकडून आमच्या डोक्यावरून उजवीकडे खालीं येऊन ती दिसेनाशी झाली. त्या वेळीं मोठी गर्जना झाली. त्या तारेचें तेज माणकासारखें होतें. व तें क्षणभर इतकें जाज्वल्य दिसलें कीं, माणकाच्या रंगाचा चंद्र उगवून त्याचें हें चांदणें पडलें आहे कीं काय, असें वाटलें. कोलीत फिरविलें असतां जशी तेजाची रेषा दिसते, तशी त्या तारेच्या जाण्याच्या मार्गांत तेजोरेषा दिसत होती. जणूं काय, आकाशरूप कसोटीवर तारारूपी सुवर्ण घासलें, त्याची ती रेषाच उमटली आहे. त्या तारेची अतर्क्य त्वरा, पृथ्वीवर पडून कांहीं प्रदेशास दग्ध करिते की काय, असें दिसणारें तिचें विलक्षण तेज, भीति वाटविणारी तिची ती गर्जना, या गोष्टींनीं मनावर एककालीच आश्चर्य, विस्मय, भीति, इत्यादि मनोविकार उद्भवून मन चकित झालें. सगळ्या तारा तुटून आकाश शून्य होतें कीं काय, व पृथ्वीवर कोसळून प्रलय करितें कीं काय, अशीही शंका येऊं लागली. त्यामुळें पुढें या गोष्टीकडे विशेष लक्ष लागून रोज एखादी लहानमोठी तारा तुटलेली दिसूं लागली.

कांहीं दिवसांनीं आमच्या मंडळीपैकीं एकास कोणा गृहस्थाचें लिहून आलें कीं, पहाटेस एक बारीक तारा दिसते, तिला शेंडी आहे. म्हणून आम्हीं पाहूं लागलों, तों ती त्याप्रमाणें दिसली. तिचें धूम्रपुच्छ लहानच होतें; परंतु तें पाहून नऊदहा वर्षांपूर्वीं पाहिलेल्या अशाच एका चमत्काराची आठवण झाली; व तेव्हांच्या तारेची

आकाशांत लांबवर पसरलेली ती शिखारूप पताका आणि तिचें तें विस्मयावह तेज, हीं डोळयांपुढें उभीं राहिलीं. अशा प्रकारचे धूमकेतू पतन पावणाऱ्या तारांपेक्षांही मनाची स्थिति चमत्कारिक करितात.

एकदां पूर्णिमेच्या रात्रीं चांदण्यांत आम्ही कांहीं मंडळी बोलत बसलों असतां सहज चंद्राकडे दृष्टि गेली. त्याच्या त्या नेत्रांस आनंद देणाऱ्या अतिमनोहर कांतीकडे सर्वांचें चित्त वेधून गेलें. आम्हीं बराच वेळ तिकडे पहात असतां त्याजवर एक डाग दृष्टीस पडला. तेव्हां असें मनांत आलें कीं. पूर्णासही कलंक असावा काय ! परंतु त्याविषयीं आमचा कोणी मित्र म्हणाला, चंद्रावर मोठा डाग आहे इतकेंच नाहीं, तर सूर्यावरही लहान लहान डाग दिसतात. अग्नीसारखा तेजोगोल, ज्याकडे डोळ्यांनीं पहावत नाहीं, त्यावर डाग असावे हें किती आश्चर्य ! आम्हांस तर प्रथम हें खोटेंच वाटलें; परंतु दुर्बिणींतून आमच्या मित्रानें ते डाग दुसरे दिवशीं आम्हांस प्रत्यक्ष दाखविले. ते पाहून फार विस्मय वाटला. मग आणखी कांहीं असेच चमत्कार दिसतात कीं काय, म्हणून त्या दुर्बिणींतून रात्रीं पाहूं लागलों, तों शुक्राच्या ठिकाणीं चंद्र दिसूं लागला. नुसत्या डोळयांनीं पहावें तों शुक्र; दुर्बिणीत पहावें तों चंद्र ! बरें, दुर्बिणींतून शुक्र न पाहतां खरोखर चंद्रच आम्हीं पाहिला असें म्हणावें, तर चंद्र त्या वेळीं मुळींच नव्हता. तारांकडे दुर्बीण लाविली, तों त्या पूर्वींपेक्षां विलक्षण तेजस्वी दिसूं लागल्या. दुर्बिणींतून पाहण्यापूर्वीं तारांची चकाकी आम्हांस आश्चर्यकारक वाटे. परंतु दुर्बिणींतून दिसणाऱ्या तेजापुढें ती कांहींच नाहीं, अशी आमची खात्री झाली. आम्हीं तारा न पाहतां हिरे, माणकें, पाच, इंद्रनील इत्यादि रत्नांचे मोठाले समुदायच पहात आहों कीं काय, असें वाटे. कोठें एका

तारेच्या दोन तारा दिसत; कोठें तीन, कोठें चारही दिसत; आणि कोठें कोठें तर नुसत्या डोळ्यांनीं जेथें पूर्वीं एखादीच तारा दिसावयाची, तेथें दुर्बिणींतून हजारों तारा दिसत. हे दुर्बिणींतून दिसणारे विलक्षण चमत्कार पाहून आम्हांस भूल तर पडली नाहींना, असें वाटूं लागलें.

याप्रमाणें कांहीं दिवस गेले असतां, वातावरणांत एकाएकीं विलक्षण फेरबदल झाला. वाऱ्याची दिशा बदलली, समुद्र खवळला, झंझावात ( पर्जन्ययुक्त मोठा वारा ) वाहूं लागला, आकाशांत रात्रीं जेथें हजारों तारा चमकत होत्या, तेथें अभ्रें फिरूं लागलीं व विजा चमकूं लागल्या. नक्षत्रराजादिकांनीं आपला अधिकार मेघराजाकडे दिला. तेव्हां कोठचें नदीतीर, कसचें हवा खाणें, आणि कसचे आकाशांतील चमत्कार ! सर्वच कांहीं बदलून गेलें. कांहीं दिवस अशी धामधूम चालल्यावर पुढें हळुहळू आकाशांत शांतता दिसूं लागली. उन्हाळ्यांत पश्चिम-क्षितिजाजवळ दक्षिणच्या बाजूस दोन तारा दिसतनाशा झाल्या म्हणून सांगितलें; त्यांपैकीं अगदीं दक्षिणची अगस्तीची तारा सुमारें तीन महिने तर मुळींच दिसत नव्हती. ती पुढें मग पहाटे पूर्वेकडे दिसूं लागली.

**प्रससादोदयादंभः कुंभयोनेर्महौजसः।**

" महातेजस्वी अशा कुंभसंभवाच्या ( अगस्तीच्या ) उदयानंतर उदक स्वच्छ झालें." या कालिदासोक्तीला फार काळ लोटल्यामुळें, तितक्या काळांतील तारांच्या गतिविशेषाच्या योगानें अगस्त्युदयानंतर लागलींच नाहींत तरी सुमारें दोन महिन्यांनीं उदकें स्वच्छ झालीं. जिकडे तिकडे वनश्री प्रफुल्लित होऊन गगनश्रीशीं स्पर्धा करूं लागली. आम्हांसारख्या चमत्कारप्रियांस वनश्रीनें गगनश्रीस शोभा आली, कीं हिनें तिला आली, अशी भ्रांति पडून ही पहावी कीं

ती अवलोकन ..रावी, असें होऊन गेलें. शारदचद्र कुमुदांसही आनंद देऊन प्रफुल्लित करूं लागला, मग तो आम्हांसारख्यांस आनंदकारक होईल, यांत नवल काय ? सहा महिन्यांपूर्वीं सायंकाळीं पश्चिमक्षितिजाजवळ ज्या तारा दिसत असत, त्या हल्लीं सायंकाळीं पूर्वेस दिसूं लागल्या; इतकें त्यांचें दूर गमन झालें, तरी त्यांचें परस्परांचें अंतर बदललें नाहीं. तेव्हां तारांस गति आहे कीं नाहीं, असा आम्हांस संशय आला, व तारांबरोबर पश्चिमेस सायंकाळीं शुक्र दिसत होता, तोही पूर्वेस आला कीं काय, म्हणून पाहूं लागलों, तों तोमात्र दिसेना ! तो काय झाला ? नाहींसा झाला कीं काय ? असें गूढ पडलें.

असो. तर याप्रमाणें कांहीं तारा पश्चिमेस नाहींतशा होत जातात, व पूर्वेस नव्या तारा उगवूं लागतात. सहा महिन्यांनीं पश्चिमेच्या तारा पूर्वेस दिसूं लागतात, तरी त्यांचें अंतर बदलत नाहीं. शुक्रासारख्या कांहीं तारा इतरांसारख्या स्थिर न राहतां त्यांतून चालतातशा दिसतात. चंद्र तर विलक्षण झपाट्यानें चालत असतो; इतकेंच नाहीं, तर पंधरा दिवस लहानाचा मोठा होत जाऊन पुन्हा लहान होऊं लागतो; व शेवटीं दोन दिवस तर मुळींच दिसत नाहीं. कांहीं तारा पतन पावतातशा दिसतात. कांहींना तेजाचें भव्य पुच्छ असतें. कांहीं दिवस तारांच्या ठिकाणीं अभ्रें आणि विजाहींच संचार करितात. सूर्यचंद्रांसारख्या तेजोगोलांवर डाग दिसतात. दुर्बिणींतून शुक्र चंद्रासारखा दिसतो. हीं गूढें पाहून सहज कोणीही मनुष्य आपले मनास विचारूं लागतो कीं, हा काय चमत्कार आहे !

शं. बा. दीक्षित. ज्योतिर्विलास.


समाप्त.